

# दाजी

भाग १ ला

लेखक

ना. धों. ताम्हनकर

आवृत्ति ४ थी

*

किंमत ५ रु.



औंध संस्थानाधिपति
श्रीमंत राजे बाळासाहेब
पंतप्रतिनिधि, बी. अे.
यांच्या सेवेसीं
आदरपूर्वक अर्पण



" व्यक्ति काय किंवा ग्रंथ काय, त्याची योग्यता स्वतः पारखून पाहून ज्याची त्याने ठरविली पाहिजे. या बाबतींत स्वतःचें मतच प्रमाण. लोकांनी केलेल्या प्रशंसेने माणसाची थोरवी मान्य करणें आणि प्रस्तावनेवरून ग्रंथाच्या चांगुलपणाचा अजमास बांधणें हें परावलंबी वृत्तीचें द्योतक आहे. " दाजीचें हें म्हणणें मला आठवत असल्यामुळे त्याचा हा चरित्रग्रंथ प्रस्तावनेवांचून मी वाचकांच्या हातीं देत आहें. या पुस्तकाला स्वतःची अगर दुसऱ्या प्रथितयश लेखकाची जाडजूड प्रस्तावना मला जोडता आली नसती असें नाही; पण सुदैवाने दाजीचा पुनर्लाभ झाला आणि त्याच्या नजरेला हा प्रकार पडला, तर तो आकाशपाताळ अेक करील अशी मला भीति वाटते !

दाजीचें चरित्र माझ्या लेखणीपेक्षा श्रीयुत शं. वा. कि. यांच्या टाकानेच अधिक सुंदर चित्रिलें आहे. कारण लेखकास हजार शब्दांनी देखील जी यथार्थता आणता येत नाही, ती यथार्थता अेका चित्राने निर्माण करण्याचें सामर्थ्य चित्रकाराच्या अंगीं असतें. चित्रकार श्री. ना. कुलकर्णी यांचाहि या कार्याला हातभार लागला आहे. आम्हां सर्वांचा हा अेकत्रित प्रयत्न महाराष्ट्र-वाचकांपुढे मी ठेवीत आहें. त्यांनी आमच्या दाजीचे गुणदोष परीक्षावे आणि आपलें मत निःसंकोचपणें कळवावें अशी विनंती आहे. जाणत्यांच्या सूचना दाजीची पुनर्भेट झाल्यास त्यास कळवितां येतील व त्या त्याला मार्गदर्शकहि होतील.

१ ऑगस्ट १९३६ — ना. घों. ताम्हनकर

० ० ०

दाजीवर वाचकांचा लोभ खरोखरच मोठा ! त्याशिवाय त्याच्या चरित्रग्रंथाची पहिली — वस्तुतः दुसरी — आवृत्ति अितक्या लौकर कशी संपली असती ? आणि ही नवी आवृत्ति त्यांना सादर करण्याचा सुयोग तरी कसा आला असता ?

१ मार्च १९३८ — ना. घों. ताम्हनकर

० ० ०

जून १९४४, तिसरी आवृत्ति.

० ० ०

अेप्रिल १९५२, चौथी आवृत्ति प्रसिद्ध.



# १—

दाजींचें नांव 'दाजी' नव्हे असें मीं सांगितलें, तर तुम्हांला आश्चर्य वाटेल. पण खरोखर दाजी हें दाजींचें खरें नांव नव्हे. त्याचें खरें नांव मधुकर.

राव, पंत, तात्या, आप्पा आदिकरून अुपपदें आहेत तसेंच दाजी हें अेक आहे. पण सारीं अुपपदें सान्याच नांवांशीं शोभिवंत दिसत नाहीत. पंत हें भूषण 'हरी'ला जसें शोभतें तसें राव हें शोभत नाही. अैकला आहेत का कधी 'हरिराव' असा शब्दप्रयोग? दाजीचेंहि तसेंच आहे. नरबासारख्याशीं दाजीची गट्टी चांगली दिसते. नरबादाजीप्रमाणे मधुकरदाजी ठसकेबाज दिसत नाही.

पण मधुकर लोकांच्या दिसण्याची थोडीच पर्वा करतो? त्याला आपला अुद्देश साधायचा होता. त्यासाठी तर त्याने डोकें खाजवलें आणि दाजी हें नवीन नांव आपल्यासाठी निवडलें.

पुष्कळदा तो माझ्याकडे जेवायला येतो तसा त्या दिवशींहि आला होता. तो जेवायला असला म्हणजे जेवणाला मोठी मजा येते, तशी त्या दिवशींहि आली होती. दाजींचें वाचन दांडगें. परिक्षेचीं नियमित पुस्तकें त्याने वाचलीं तर विशेष नाही, पण दुसरीं विविध विषयांवरील पुस्तकेंहि त्याच्या नजरेंतून जात असतात. पुस्तक दिसलें की तें वाचून काढायचें हा त्याचा जन्मस्वभावच.

'मराठी पोवाडे' हें नुकतेंच प्रसिद्ध झालेलें पुस्तक त्याने वाचलें होतें व तें त्याला आवडलें नव्हतें. तो म्हणाला, "पोवाड्यांची अुपयुक्तता सिद्ध करण्याचा ग्रंथकाराने खटाटोप केला आहे. पण माझ्या मतें पोवाडे ही अत्यंत निरुपयोगी आणि हानिकारक बाब आहे."

"मला नाही वाटत तसं. अितिहास जिवंत आणि सर्वतोमुखीं ठेवण्याचं तें अेक सुंदर साधन आहे असं माझं मत आहे." मी म्हणालों.

"अहो, पण दादासाहेब—" तो आवेशाने म्हणाला, "खऱ्या अितिहासापेक्षा खोटं वर्णनच त्यांत भरलेलं असतं की! त्या पानपतच्या पोवाड्यांत 'प्रत्येक मराठा सरदार कर्दनकाळ होता' असं म्हटलंय. तसा होता तर अेकूण अेक सरदार मेला कसा?"

"पण भाअूजी—" ती मध्येच म्हणाली, "त्यांचे तसे पराक्रम असतील म्हणूनच ना त्यांचे पोवाडे झाले? दुसरीं सटरफटर माणसं जगांत होतींच की! त्यांच्यावर नाही केले पोवाडे कुणी? ज्या नांवाबरोबर पराक्रमाचं स्मरण होतं, त्यांचेच पोवाडे होतात."

तिच्या युक्तिवादावर त्याला चटकन् अुत्तर सुचेना. पण तिच्यासारख्या अेखाद्या अशिक्षित बाअीपुढे आपल्यासारख्या कॉलेज-स्टूडंटने हार खाणें म्हणजे नामुष्कीच, असें त्याला वाटलें आणि मूळ मुद्द्याला थोडी कलाटणी देअून तो म्हणाला, "पराक्रम आणि पोवाडे यांचा कांहीच संबंध नाही. शाहीराची लहर लागली की वाटेल त्याचं नांव तो पोवाड्यांत दडपतो."

"मग तुमच्या नांवाचाहि पोवाडा होअील की!" तिने खोचून म्हटलें.

"हो हो, होअील. काय अशक्य वाटतं तुम्हाला त्यांत? माझं नांव पोवाड्यांत अैकलंत तर काय द्याल?"

"माझ्या शक्तीप्रमाणं तुम्ही मागाल तें देअीन."

"कांद्याचीं भजीं? मी खाअीन तितकीं?"

"हात्तिच्या! अेवढंच ना? दोनदा देअीन हवीं तर!"

अशा पैजा आजपर्यंत कितीतरी ठरल्या. पण पानावरून अुठल्यावर त्यांचें स्मरण आम्हांपैकी कुणाला सहसा होत नसे.

मधुकर कॉलेजांत गेला. त्याचें अेकदा पत्र आलें. त्यावर ‘ मधु धडपडे ’ अशी नेहमीची सही नसून ‘ दाजी (मधु) धडपडे ’ अशी सही होती. मला नवल वाटलें आणि तिलाहि. मधूच्या दाजीपणावर आम्ही तर्कवितर्क करूं लागलों.

“ मला वाटतं, ते आता कविता लिहूं लागलेत. ” ती म्हणाली.

“ कशावरून ? ”

“ कवि झालं म्हणजे नांव बदलायची लहर येते. ”

“ की दत्तकबित्तक गेला कुणा दूरच्या नातलगाला ! दत्तक-घरींसुद्धा नामान्तर होतं. ”

“ पण मला नाही हें खरं दिसत. तसं कांही असतं तर कळवल्याशिवाय कधीच राहिले नसते भाअूजी. ”

असे तर्क करीत बसण्यापेक्षा आम्ही तरी काय करणार होतों ? त्याला पत्राने खुलासा विचारला, पण कांहीच अुत्तर नाही ! खुशालीचीं पत्रें येत आणि त्यावर ‘ दाजी धडपडे ’ अशी सहीहि असे.

आम्ही अेकदा पुण्यास गेलों तेव्हा गणेशोत्सव चालू होता. आणि त्याच दिवशीं शिवाजी मंदिरांत पोवाडेगायन होतें. मधूबरोबर आम्हीहि गेलों. कार्यक्रम बहारीचा झाला. परत आल्यावर दाजीने विचारलें,

“ कसं काय वैनीसाहेब ? काय अैकलंत ? ”

“ पोवाडे. ” ती हसून म्हणाली.

“ आणखी कांही ? ” त्याने फिरून विचारलें.

“ नाही बाअी आठवत. ”

“ कुणाकुणाचे पोवाडे अैकलेत ? ”

“ तानाजीचा, लक्ष्मणबाअीचा, बाजी देशपांड्याचा- ”

“ आणि माझा ? ”

" काय तुमचा ! आणि पोवाडा ! " तिला हसूं आवरेना.

" हो हो, मामा ! तुमचं लक्ष असतं तर लक्षांत आलं असतं तुमच्या. बाजीचा असो नाहीतर तानाजीचा असो, माझ्याशिवाय त्यात मजा कुठं येत होती ? पोवाड्याला रंग भरण्याकरिता प्रत्येक शाहीर ' अरे दाजी ' म्हणून ओरडत होता. अन् माझ्यापुढं ' जी जी ' करीत होता. आलं ध्यानांत ? काढा आता कोयाचीं मजी ! "

दाजी खूप मोठ्याने हसला. त्या दिवशींच्या जेवणांतल्या गप्पा, ती पैज आणि ती जिंकण्यासाठी दाजीने— हो आता दाजीनेच— योज-लेली शक्कल, या गोष्टी पाहून आम्हांलाहि हसूं आवरेना.

मधु हा असा प्रकारचा प्राणी आहे. हुशार आहे, शीलवान आहे. तरुण लोकांत क्वचित् दिसणारे दुसरेहि पुष्कळ सद्गुण त्याच्यामध्ये आहेत. पण—पण दुसरे कित्येक नको असलेले गुणहि त्याला चिकटल्यामुळे त्याचा म्हणण्यासारखा जमच कुठे बसत नाही. तो बी. अे. नापास व्हायचें कारण तरी हेंच.

आतापर्यंत सेकंड क्लासांत पास होत आलेला; पण या वर्षी त्याच्या डोक्यांत कशी लहर आली कोण जाणे, त्याने प्रश्नांचीं अुत्तरें विद्यार्थी-पद्धतीने न लिहितां साक्षीदार-पद्धतीने दिलीं. अितिहास हा त्याचा अैच्छिक विषय. " महायुद्धाचा जगावर काय परिणाम झाला ? " या पंचवीस मार्कांच्या विस्तृत प्रश्नाचें अुत्तर त्याने अवघ्या दहावीस शब्दांत लिहिलें— " माणसें मेलीं, पैसा नासला, राज्यक्रांत्या झाल्या, मोठीं राष्ट्रें फसलीं, कावेबाज राष्ट्रांनी डाव जिंकला. "

दुसऱ्या प्रश्नाचेंहि असेंच. अितर अुमेदवारांनी पन्नासपन्नास कागद खरडूनहि जी अुत्तरें संपलीं नाहीत व ज्यांना वेळ अपुरा पडला तीं अुत्तरें अवघ्या दहावीस मिनिटांत संपवून तो हॉलमधून बाहेर पडला. ही हकीकत कळल्यावर तो नापास झाल्याबद्दल मला वाअीट वाटलें, तरी आश्चर्य वाटलें नाही. आपल्यास नापास करणाऱ्या परीक्षकांना अक्कलच नाही असें दाजीचें मात्र म्हणणें आहे.

परिक्षेतील अपयशामुळे दाजी हवालदील झाला असेल या समजुतीने त्याला सहानुभूति दर्शवावी आणि प्रोत्साहन द्यावें म्हणून मीं म्हटलें, "जाऊं दे दाजी, पुन्हा प्रयत्न कर. पुढल्या वर्षी तूं खात्रीनं पास होशील."

"नांव काढूं नका आता पास होण्याचं." दाजी अेकदम अुसळून म्हणाला. "आजन्मांत मी परिक्षेला बसायचा नाही पुन्हा. ज्ञानाकरिता शिकायचं हें माझं ध्येय होतं. तें मीं साध्य केलं आहे. डिग्रीची किंमत मी कस्पटासमान मानतों. बी. अे. या अक्षरांच्या अभावींसुद्धा मी पुष्कळ काम करून दाखवीन."

दाजीचा हा आत्मविश्वास मलाहि कौतुकास्पद वाटला. मीं विचारलें,

"बरं तर, पुढं काय करावं म्हणतोस?"

"काय साधेल तें. कुठं पाहिजे तिथं जाअीन, काय पाहिजे तें करीन."

"अरे, तें खरं, पण कुठं जायचं आणि काय करायचं याचा विचार करशील की नाही? तुझ्या मामांचं मत घे– "

"मामांचं मत केव्हाच घेतलंय् मीं. आजपर्यंत त्यांनी मला लहानाचं मोठं केलंय्. यापुढं आपला भार त्यांच्यावर थोडासुद्धा घालायचा नाही असं ठरवून मीं त्यांना तसं सांगूनहि टाकलं. मीं हवं तें करावं याला मामांची पूर्ण संमति आहे."

"ठीक आहे. कर विचार आणि मग मला काय ठरवलंस तें."

"जरूर. पण मला योग्य असं अेखादं काम आढळलं तर तुम्हीहि वर्दी द्या मला." असें बजावून दाजी चालता झाला.

त्याचें नशीब मला खरोखरच बलवत्तर वाटलें. त्याचें माझें बोलणें झाल्यावर दोनतीनच दिवसांनी मला दयाराम जेठाराम यांच्या पेढीवरील बोलावणें आलें. मी शेठजींना भेटलों. शेठजींचे अेक चिरंजीव पूर्व आफ्रिकेंत आपल्या दुकानाची व्यवस्था पाहाण्यास जाअून राहिले होते व त्यांनी आपल्या मुलांना अिंग्रजी शिकविण्यासाठी अेक मास्तर

पाठविण्याबद्दल लिहिलें होतें. या कामीं अुपयोगी पडण्याजोगा कोणी अिसम आहे काय, असें शेठजींनी मला विचारलें.

माझ्या डोळ्यांसमोर दाजी अुभा राहिला व मीं त्याची माहिती शेठजींना दिली. त्याच्याविषयी त्यांचें अनुकूल मत झालें. त्यांनी त्याला समक्ष मुलाखतीस पाठविण्यास सांगितलें.

दाजी हें काम करायला अेकदम तयार होअील अशी माझी जवळ-जवळ खात्री होतीच. कारण सगळा खर्च परभारे भागून दरसाल अेक हजार रुपये हें लहानसान आमिष नव्हतें. माझा अजमास बरोबर ठरला. तो तात्काळ कबूल झाला. मीं त्यास शेठजींची मुलाखत घेण्यास सांगितलें व शेठजींसारख्या बड्या माणसाशीं विचारपूर्वक बोलण्याची अिशारतहि दिली.

चार दिवसांत दाजींची आमच्या घरीं खेप कां नाही याचा मला अचंबा वाटत होता. दयाराम शेठजींच्या कामावर तो आफ्रिकेंत निघून गेला की काय, असें तिने मला गमतीने विचारलें. शनिवारी ऑफिस लवकर सुटणार असल्याने येतांयेतां त्याचा शोध घेअून येण्याचें मीं ठरविलें.

मी गेलों तेव्हा दाजी स्वस्थ घोरत पडला होता! मीं त्याला गदगदा हालवून अुठविलें. त्याने लाल डोळ्यांनी मजकडे पाहिलें.

"हें रे काय गृहस्था? निजलास काय दिवसाढवळ्या?"

"हिंडण्यापेक्षा निजणं बरं, भांडणापेक्षा अबोला बरा" या व्यावहारिक सुभाषिताचा मला आहेर करीत दाजी अुठून बसला. जांभया व आळस देत त्याने मला विचारलें, "पण तुम्ही या वेळीं मोकळे कसे? आज रविवार तर नव्हे?"

त्याला तारीखवारांची बिनजरुरीची माहिती पुरविण्याअैवजीं मीं म्हटलें, "बरं पण, तूं दयारामशेठना भेटलास का जाअून?"

"नाही अजून."

"म्हणजे! कुठं घोडं अडलंय्?"

"अडतंय् कसलं म्हणा? जाअीन लवकरच."

"तुझ्या या चालढकलीचा अर्थ नाही समजत मला! गरज कुणाला आहे? तुला की त्यांना?"

"दोघांनाहि."

"त्यांना मुळीच गरज नाही तुझी." मी थोडें चिडून म्हणालों, "तुझ्यासारख्या दाजीऐवजी छप्पन बाजी मिळतील त्यांना."

"आणि त्या दयारामाऐवजी सत्तावन मायाराम मिळतील मलासुद्धा!" अगदी शांतपणें दाजी म्हणाला आणि खूप मोठ्याने हसला.

मलाच मुकाट्याने नरमावें लागलें.

"हें पाहा दाजी, ही तुझी दिरंगाओी काम बिघडून टाकील ओखाद वेळ. निजून राहतोस त्यापेक्षा जाअून आला असतास तर?"

"गेल्याचा शोक वृथा न करावा. आता दिरंगाओी होणार नाही. बरं काय, चहाला येअू म्हणतां? बरं बुवा. आता वैनींच्या हातचा चहा नि सैपाक खाअून घेतला पाहिजे पोटभर. आफ्रिकेंत गेल्यावर गुजरात्यांचा आळणी खाना राशीला लागणार."

दयारामशेठ दाजीवर खूष झाले आणि त्यांनी त्याची नेमणूकहि केली. किती तारखेच्या बोटीने त्याने निघायचें हेंहि ठरलें. त्याचा पासपोर्ट आणि पोशाख त्यापूर्वी सज्ज ठेवण्याबद्दल त्यांनी आपल्या दिवाणजीस हुकूम सोडला.

शेठजी दाजीवर ताबडतोब खूष होण्याचें कारण म्हणजे त्याची हुशारी असें कोणास वाटल्यास तें सर्वस्वीं बरोबर नाही. दाजीची मूर्ति व वृत्ति त्याच्या खरी अुपयोगी पडली. दाजी दिसायला बऱ्यापैकी. त्याचे ओकेक अवयव वेगळे करून पाहिले तर बऱ्यापैकीच ठरले असते. नाक सरळ, टप्पोरे आणि पाणीदार डोळे, वर्ण किंचित् काळसर असला तरी कळकट नव्हे, अुंची मध्यम, बांधा सडपातळ वगैरे सर्व गोष्टी ठीक आहेत. खोड काढायची झाली तर ओवढीच काढतां येओील, की त्याचें डोकें थोडें मोठें आहे आणि कपाळ टेंगळासारखें पुढें सरकलेलें दिसतें. चेहऱ्यावरील जिनसांच्या अशा प्रमाणहीनतेमुळे बघितल्याबरोबर छाप पाडण्याचें काम तो करूं शकत नाही.

दयारामशेठना असाच माणूस हवा होता. बाहेरील नोकमोका-अितकी कर्तबगारी माणसामध्ये असत नाही. अुलट बावळा मनुष्यच कामाला चांगला असतो, असें त्यांचें मत होतें. अितरांच्या दृष्टीला दाजी कसलातरी दिसला तरी शेठजींच्या नजरेंत तो भरला आणि त्याचा मुखदुर्बळपणाहि त्याला अुपकारक झाला. आमच्या घरीं तिच्या-माझ्याशीं हुज्जत घालतांना दाजी भीमदेवी अवसान आणीत असला, तरी अनोळखी माणसापुढे, विशेषतः बड्या माणसापुढे, त्याचें तोंड म्हणून अुघडायचें नाहा!

शेठजींच्या मुलाखतीच्या वेळीं असेंच झालें. त्याने जयगोपाळ केला, शेठजींनी " बसा " म्हटलें. अेवढ्या मोठ्या प्रस्थापुढे बसायचें कसें? दाजी बुचकळ्यांत पडला. शेठजींनी पुन्हा खुर्चीकडे बोट दाखवलें आणि मग दाजी स्थानापन्न झाला.

शेठजींनी प्रश्न विचारावे आणि दाजीने शक्य तितकीं मानेने आणि निरुपायच झाला तर अेखादद्दुसऱ्या शब्दाने अुत्तरें देअून वेळ मारून न्यावी. त्याला घाम सुटला होता आणि बसल्या जागेवरच त्याचे पाय लटपटत होते! शेठजींना हा प्रकार दिसला; पण तो दुर्गुण वाटण्याअैवजी विनय वाटला!

परवा दिवशींच्या बोटीने दाजी हिंदुस्थान सोडणार म्हणून आजच मुंबअीला निघाला. आम्हीं त्याला निरोपाची मेजवानी दिली. मी आणि ती त्याला जपून राहण्याबद्दल आणि दुसऱ्या कसल्या नादीं न लागण्याबद्दल बजावीत होतों.

पण आमची ही सावधगिरीची सूचना त्याला कुठली पटायला! तो म्हणाला, " संधीचा जास्तींत जास्त फायदा करून घेतला पाहिजे. द्वीपान्तराची ही संधि मी नुसत्या पंतोजीगिरींत दवडणार नाही. त्याबरोबर आयात-निर्गतीच्या व्यापाराची माहिती मी मिळवणार आणि आताचा पांच वर्षांचा करार पुरा होतांच दाजी मास्तराचा 'धडपडे अँड को.'चा प्रोप्रायटर म्हणून मुंबअी बंदरावर अुतरणार. "

दाजीच्या या महत्त्वाकांक्षेचें कुणास कौतुक वाटणार नाही ? संध्याकाळच्या मेलनें दाजी मुंबअीला गेला.

तीन दिवसांनंतरची गोष्ट. आम्ही सकाळीं चहा घेत बसलों होतों. हिंदुस्थान आणि दाजी यांच्यामध्ये आता किती मैलांचें अंतर पडलें असेल याबद्दल आमचें बोलणें चाललं होतें. अितक्यांत दरवाजांत टांगा थांबल्याचा आवाज अैकू आला. मीं पुढे होअून पाहिलें तों काय ? दाजी !

" म्हणजे ! हा काय प्रकार ? " मी म्हटलें.

" प्रकार कसला ! मरतांमरतां वाचलों ! " कोट काढीत त्याने अुत्तर दिलें.

" कसल्या अपघातांत सापडला होतास ? "

" सापडलों होतों, पण दैव अनुकूल म्हणून वाचलों. मुंबअीला मोघे ज्योतिष्याची जाहिरात वाचली. गेलों सहज, दाखविली कुंडली. मकरेचा शनि अनिष्ट ठरला ! 'जलपर्यटनांत गोता, कार्यसिद्धींत अडथळा, दुःख आणि पश्चात्ताप असा योग आहे,' असं सांगितलं त्यांनीं. चरकलोंच मनांत. अहो, शनि आहे तो शनि ! विक्रमराजाची मात्रा नाही चालली त्याच्यापुढं, मग माझी काय कथा ! म्हटलं, शिर सलामत तर पगड्या पचास ! आणि परतलों अिकडे."

" दीड शहाणा आहेस झालं ! " मीं निराशेने म्हटलें.

" काय ! ज्योतिषावर विश्वास नाही तुमचा ? " दाजीने विचारलें.

" नव्हता विश्वास आजपर्यंत; पण आता वाटूं लागलाय्. तुझ्या मकरेच्या शनीनं तुझ्या जलपर्यटनाला गोता दिला, कार्यसिद्धीला अडथळा अुत्पन्न केला, तुझ्यावर पश्चात्तापाची पाळी आणली, या गोष्टी मी प्रत्यक्ष बघत असून मोघेशास्त्र्यांच्या भविष्यकथनावर गैरविश्वास कसा करूं ? "

★ ★ ★



# दाजीचें ग्रंथलेखन

मकरेच्या शनीनें दाजीच्या जलपर्यटनाला गोता दिला तरी त्याच्या कपाळींची मास्तरकी मात्र त्याने चुकविली नाहीं. स्वावलंबनावर आयुष्य काढण्याचें त्याचें ध्येय ठरलें होतें आणि परीक्षेच्या फंदांत पुन्हा न पडण्याचा त्याचा निश्चयहि कायम होता. मग कोठेतरी नोकरी धरण्यावांचून त्याला काय करतां येणार होतें ? सुशिक्षित ब्राह्मण तरुणाला साजेशी मास्तरकी दाजीला मिळाली आणि ती त्याने पत्करलीहि.

शेजारच्या सोनगांवला अेक अँग्लो व्हर्नाक्युलर स्कूल होतें. तेथे दाजी असिस्टंट मास्तर झाला. पगार दरमहा पंचवीस. कालमानाचा विचार केला तर दाजीचें नशीब शिकंदरच म्हटलें पाहिजे. दाजी स्वतःच तसें समजत होता. मी मात्र त्याने आफ्रिकेची संधि केवळ मूर्खपणाने गमावली म्हणून खूप हळहळलों पण दाजी म्हणाला, "ती संधि मीं गमावली हेंच चांगलं झालं. त्यामुळं माझं वैशिष्ट्य तरी सिद्ध झालं. पन्नास अर्जदारांतून बोर्डानं या पठ्ठ्याचीच निवड केली ती काय वैशिष्ट्य दिसल्याशिवाय ?"

दाजीचें म्हणणें मीं मुकाट्याने अैकून घेत असें कारण त्याच्याशीं युक्तिवाद करणें म्हणजे अकारण कालहरण होय, असा मला अनेकदा अनुभव आला होता. तो नोकरीवर हजर होण्यास निघाला तेव्हा मित्रत्वाच्या नात्यानें मीं त्याला सूचना दिली,

" दाजी, मास्तरकीच्या मोजक्या मिळकतीवर तूं संतुष्ट राहूं नयेस असं मला वाटतं. आता तुला शाळेचं मोजकं काम अुरकलं म्हणजे रगड फुरसत मिळेल आणि या फुरसतीचा अुपयोग केलास तर अधिक किफायतीचा दुसरा अेखादा धंदाहि हस्तगत करतां येअील. हायकोर्ट वकिलीचा अभ्यास कर तूं. "

सनातनी दुराग्रहयापुढे अस्पृश्यतानिवारणाची भाषा काढल्यावर तो जसा डोळे वटारील, तसेच डोळे वटारून दाजी कडाडला, " असा व्यभिचार मी कालत्रयीं करणार नाही. अहो, अेका वेळीं अेकच गोष्ट हें साधं तत्त्वसुद्धा तुम्ही विसरलांत ? मास्तरकी म्हणजे काय समजतां तुम्ही ? प्राप्ति कमी म्हणून या अुच्च व्यवसायाला हीन लेखूं नका. अहो, राष्ट्र बनविण्याचं सामर्थ्य मास्तरच्या हातीं आहे. माझा विद्यार्थी अुद्या स्वतंत्र हिंदुस्थानच्या अध्यक्षपदावर विराजमान न होअील किंवा सर सेनापति न होअील म्हणून कशावरून ? मला पैसा कमी मिळेल किंवा जास्ती मिळेल; पण माझ्या पैशावरून माझी योग्यता कधीच कमी ठरणार नाही. विष्णुशास्त्री चिपळूणकर होअून गेले, गुरुवर्य आण्णा कर्वे आजहि तुमच्या डोळयांपुढं आहेत. अध्यापन हेंच व्रत त्यांनी स्वीकारलं आणि आजन्म पाळलं. श्रीमान् झाले नाहीत, अेखाद्या वकील-बॅरिस्टरा-प्रमाणं त्यांनी नोटांच्या पुडक्यांनी तिजोऱ्या भरल्या नाहीत. पण कीर्ति आणि मान्यता त्यांनी मिळवलीच ना ? स्वीकृत कार्याशीं अेकनिष्ठ राहिल्यामुळंच ना त्यांची कीर्ति वाढली ? त्यांना वकील होतां आलं नसतं का ? ...छे, माझ्यापुढं त्यांचा आदर्श आहे. मी त्यांच्या पावलावर पाअूल टाकूनच माझं काम करणार. तुमची सूचना मला अगदी तुच्छ वाटते. "

मी नुसता हसलों आणि घरांत गेलों.

दाजी सोनगांवला गेला आणि स्वतंत्र हिंदुस्थानचे भावी अध्यक्ष आणि सेनापति पढवूं लागला. रविवारची सुटी आमच्याकडे घालवून सोमवारीं सकाळीं सोनगांवास जाण्याचा त्याचा क्रम असे. शनिवारीं संध्याकाळपासून त्याच्या सहवासाचा लाभ आम्हांस मिळे.

दाजींची ही साप्ताहिक वारी आम्हांला मोठीच मनोरंजक होअी. कारण ज्या अवस्थेचा आम्हांस अेकदाच अनुभव आला होता आणि ज्या वेळची आठवणहि आम्ही विसरत चाललों होतों, ती विद्यार्थी-अवस्था निरनिराळया गोष्टी सांगून दाजी आमच्या डोळ्यांपुढे अुभी करी. विद्यार्थ्यांच्या त्रिकालाबाधित खोडी, शिक्षकवर्गाचे गुणदोष आणि त्या बाबतींत आपलें धोरण या विषयावर दाजीचें वक्तृत्व अेकसारखें चाललेलें असे.

दाजी सारखा बडबडला तरी कंटाळा यायचा नाही. त्याचे कांही विचार खरोखरच बरोबर असत. आणि कंटाळा न येण्याचें दुसरें कारण म्हणजे, मधूनमधून त्याला चमत्कारिक प्रश्न विचारून विनोद करायला वाव असे. बोलण्याच्या ओघांत तिने विचारलें, "काय हो भाअुजी, तुम्ही मास्तरलोक मुलांना आपलं असं काय हो देतां ? दुसरेच कुणी पुस्तक लिहितात आणि त्यांतलं कांहीतरी तुम्ही शिकवतां. टपालवाल्यागतच नाही का हें तुमचं काम ?"

"बरोबर आहे तुमची शंका, वैनी. परवा आमच्या हेड-मास्तरांना मीं हेंच सांगितलं. अभ्यासपत्रकांत ज्याचा नामनिर्देश नाही आणि ज्याची आयुष्यक्रमांत पदोपदीं आवश्यकता आहे, असं कांहीतरी आपण विद्यार्थ्यांना शिकवलं पाहिजे, त्यांना चांगल्या सवयी शिकविल्या पाहिजेत, त्यांना प्रामाणिक बनवलं पाहिजे."

"मग काय म्हणाले तुमचे हेडमास्तर ?" तिने विचारलें.

"'बरोबर आहे,' म्हणाले. दुसरं काय म्हणणार ? बाकी, मीं सांगून टाकलं लगेच, की 'मास्तरसाहेब, मुलांना चांगल्या सवयी शिकवायपूर्वी तुम्ही मास्तरांनी त्या शिकल्या पाहिजेत. तुमची बत्तिशी विडा खाअून सदा रंगलेली आणि तंबाकूच्या घाणीमुळं जवळांहि येववत नाही तुमच्या. मग तुम्ही आपल्या विद्यार्थ्यांना स्वच्छतेच्या सवयी कसल्या लावणार बोडक्याच्या !'"

"असं म्हणालास तूं हेडमास्तरांना !" मीं मनांत घाबरून विचारलें.

" विचारलं म्हणजे ! खोटं आहे की काय ? नुसते दातच नव्हेत, तर मिशासुद्धा रंगल्या आहेत बिचाऱ्याच्या ! अेखादे दिवशीं येअून बघा हवं तर ! शेळी पाला खाते तसाच हा गृहस्थहि पाला खातो अेकसारखा ! मी अेकदा त्यांना गमतीनं म्हणालों, ' मास्तर, तुम्ही मागल्या जन्मीं बोकड असाल. ' "

" अरे, पण ते तुझे वरिष्ठ– हेडमास्तर ना ? "

" असतील. म्हणून मीं माझं प्रामाणिक मत बोलून दाखवूं नये की काय ? अशा सरळ आणि रास्त गोष्टीला जर आम्ही कचरूं लागलों तर धारिष्ट हा गुण आम्ही आमच्या विद्यार्थ्यांना कसा शिकवणार ? मास्तर म्हणजे विद्यार्थ्यांचा कित्ता. जसा मास्तर तसा बरहुकूम विद्यार्थी निपजायचा. मी तुम्हांला सांगतों वैनी, आमच्या पांचवीवरले दाते मास्तर दातांनीं नखं कुरतडतात, तर पांचवींतल्या बहुतेक पोरांना ती खोड आहे "

" मग तुझ्या वर्गांतल्या मुलांचं कांहीतरी वैशिष्ट्य असेलच की ! तुझा कित्ता आहे ना त्यांच्यापुढं ! "

" होय तर ! " माझ्या बोलण्याचा डाव लक्षांत न येअून दाजी म्हणाला, " माझ्या वर्गांतलीं मुलं पुंड आहेत नुसतीं. अभ्यासात चोख आणि डरायचीं नाहीत कुठं. मुलांच्या धिटाअीला मी कधी विरोध करीत नाही. अुलट नेहमी अुठावणी देत असतों. "

दाजीचें हें आत्मपुराण आणखी कितीतरी चाललें असतें. अितक्यांत आमच्या गावीं नवीनच आलेल्या मास्तरीणबाअी तिच्याकडे आल्या.

" यावं, यावं मास्तरीणबाअी ! " तिने नव्या मैत्रिणीचें स्वागत केलें व त्यांना घेअून ती आंत जाअूं लागली.

" बसाना अिथंच. आमच्या या दाजींची ओळख देअूं करून. " मीं म्हटलं. दाजीने बुजऱ्या बैलासारखें माझ्याकडे पाहिलें. मीं त्याच्या दृष्टीचा अर्थ ओळखला. अनोळखी माणूस आणि त्यांत स्त्री ! आटोपलाच कारभार ! आमच्यापुढे दाजी वाघ असला, तरी नवख्या माणसा-

पुढे शेळी! मला हें माहीत होतें आणि दाजीची ही बूज मी कधीतरी काढणारच होतों.

"सोनगांवच्या शाळेंत मास्तर आहेत हे." बाओींना परिचय करून देत मी म्हणालों, "आणि चांगले गृहस्थ आहेत."

"असं का?" दाजीला नमस्कार करीत बाओी म्हणाल्या, "आनंद झाला या नवीन परिचयामुळं."

पण बाओींचा नमस्कार कोण स्वीकारणार? दाजी समोरच्या भिंतीवरील हजारदा पाहिलेल्या तसबिरी पुन्हा पाहण्यांत गर्क झाला होता.

"बरं का भाअूजी–" मैत्रिणीचा परिचय करून देण्यासाठी तिने हाक मारली, "या आमच्या अिथल्या नव्या मास्तरीणबाअी. चांगल्या पास झालेल्या आहत या."

तिचें वाक्य पुरें झालें. दाजीने पुन्हा तोंड तसबिरीकडे वळवलें.

"बसायचं हं, मी चहा करतें आता." ती आंत जात म्हणाली.

"तुमच्या शाळेबद्दल काय मत झालं तुमचं?" मीं विषय सुरू केला.

"काय मत व्हायचंय्? मुलींची संख्या आणि शिक्षकिणींची संख्या प्रमाणशीर नाहीत. अिथं शंभर मुली आणि दोन मास्तरणी! अेका मास्तरणीला फारफार म्हटलं तर वीस मुली."

"मी म्हणतों, यासुद्धा फार झाल्या. काय मत आहे तुमचं या बाबतींत, दाजी?"

"काय म्हटलंत?" आपला त्वेष दडवीत दाजीने विचारलें.

"अेका मास्तरणीला किती मुली?..."

माझें वाक्य पुरें होअूं न देताच दाजी म्हणाला, "अेकसुद्धा झाली नाही तरी चालेल."

"मुली व्हायचं नाही विचारीत आम्ही! अेका शिक्षकिणीस किती विद्यार्थिनींना शिकवतां येअील असा प्रश्न आहे यांचा!" माझ्या व मास्तरीणबाअींच्या हशाने दाजी अधिकच लाजला.

"थांबा हं, आधुनिक शिक्षणावरील अेक पुस्तक आहे माझ्यापाशी तें घेअून येतों मी." त्या दोघांना अेकटे सोडून मी बाजूस गेलों.

"आपली शाळा लोकल बोर्डाकडे आहे की म्युनिसिपालिटी-कडे?"

"बोर्डा-हं-म्युन्सिपालिटी –"

"स्टाफ अेफिशिअंट आहे की वशिल्याचीं तट्टं?"

"तट्टं–मास्तर आहेत...पांचसहा...बरे आहेत... साधारण–"

"आपलं घर कुठं? सोनगांवलाच का?"

"हो-नाही–अिथं-मामा–"

"मंडळी कुठं असतात आपली?"

"मंडळी नस–नाहीत–"

"माझ्या बोलण्याचा त्रास वाटतो का आपल्याला?"

"तसं–अगदी–त्रास कशाचा आनंद-नाही–"

शाळेंतलीच अुपमा घेअून सांगायचें तर असें म्हणतां येअील, की अिन्फंट क्लासांतील मुलें प्रायमरमधील शद्ब जसे अडत भडखळत वाचतात तसेंच दाजीचें बोलणें चालू होतें. प्रायमरांतल्या धड्यांत क्रियापदें फारशीं नसतात, तर दाजीच्या बोलण्यांतहि त्यांचा तुटवडाच होता. आणि दाजीच्या बोलण्याचा दुसरा अेक विशेष म्हणजे, शद्बांतील अेक अक्षर स्पष्ट आणि दुसरें न कळण्याअितकें अस्पष्ट निघत होतें!

मीं पुढे येअून म्हटलें, "नाही बुवा सापडत कुठं. दाजी, तूं नेलं आहेस का?"

"मी कशाला घेअूं तुमचं पुस्तक?" दाजीच्या क्रोधाचा स्फोट झाला. "मला दुसऱ्याच्या पुस्तकांची पर्वा नाही. छप्पन पुस्तकं घेअीन मी विकत." दाजीच्या डोळ्यांतून जणू ठिणग्या पडत होत्या.

मीं आणखी कांही बोलण्यापूर्वीच तिने पेले भरून चहा आणला. प्रत्येकाने अेकेक कप अुचलला. दाजी कप घेत नाहीसें पाहून मास्तरीणबाअी म्हणाल्या, "आपण नाही का घेत? घ्या ना."

आधीच जर्जर झालेल्या दाजीवर हा नवा घाव पडला. लटपटत्या हातानें त्याने कप घेतला. कप थरथरत होता त्यानेहि दाजीचा सूड अुगवला. बशींत चहा ओततांना तो त्याच्या हातांतून निसटला आणि जमिनीच्या भेटीला गेला. चहा चोहोंकडे अुसळला.

दाजीचा चेहरा पांढरा फटफटीत झाला! मला वाटलें, आता त्याला मूर्च्छा येणार! नशीब आमचें, तसें कांहीं झालें नाही. आणि मास्तरीणबाओ लवकरच निघून गेल्या. दाजीचा पुनर्जन्म झाला!

आम्हां दोघांची हसतांहसतां मुरकुंडी वळली. मीं विचारलें,

" दाजी, काय रे हें तुझं शौर्य! आणि म्हणे तुझ्या हातून हिंदुस्थानचे भावी अध्यक्ष आणि सरसेनापति तयार होणार! बरं, चल आता वर."

ओशाळेपणावर अेसपेस होत दाजी म्हणाला, " मी भ्यालों असं नका समजूं तुम्ही. बाओ कोण आहेत हें लक्षांत घ्या अन् मग बोला."

" हं..." मला त्याचेंच म्हणणें अेकायचें होतें.

" अहो, बाओ या स्त्री आहेत हें विसरूं नका."

" आणि तूं पुरुष आहेस!"

" त्याची मला जाणीव आहे. पुरुषानं स्त्रीपुढं आदबीनं वागलं पाहिजे या मताचा मी आहें."

" थोरपणा आहे तुझा हा. पण काय रे दाजी, आदबी म्हणजे घाबरगुंडी वाटतं? मला नाहीं वाटत तुझं म्हणणं खरं. तूं बाओंना भ्यालास. बायकांपुढं तूं लाजतोस ही तुझी खोड मी जाणून आहें."

" होय बाओ." माझ्या म्हणण्यास तिने पुष्टि दिली. " वाटतं खरं असं. त्या दिवशीं आगगाडींत झालं तरी असंच. अेक बाओ सबंध बाक अडवून बसली होती आणि हे आपले अुभे! तिनं जागा दिली, मीं 'बसा' म्हटलं, पण यांनीं दारांत अुभं राहून प्रवास संपविला सारा!"

" पण त्याचं कारण निराळें होतं, वैनी. मी प्रवास करतों तो अेका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जायचं अेवढ्या अेकाच अुद्देशानं करीत नसतों. प्रवास हें ज्ञानार्जनाचं साधन आहे ही गोष्ट तुमच्या लक्षांत कशी येणार? डोळे आणि कान अुघडे ठेवून प्रवास करण्याची माझी पद्धत आहे. ज्या प्रदेशांतून आपण चाललों आहों, तेथील जमीन कशी आहे, तेथील शेतकरी सुखी दिसतो की कंगाल दिसतो,

त्या प्रदेशांत निसर्गशोभा कशी काय आहे,—हें पाहाण्यासाठी मी दाराशीं अुभा असतों."

"बाकावर बसूनसुद्धा तुमचा हा हेतु साधला असता की. तिथंहि खिडकी होतीच."

"पण बैठ्या ज्ञानार्जनापेक्षा खड्या ज्ञानार्जनाचंच दाजीला महत्त्व वाटलं असेल." मी अुपरोधिकपणें म्हणालो.

दाजी तसा चाणाक्ष आहे. कांहीं झालें तरी बाजू अंगावर येणारच हें ओळखून त्यानें सफाईदार विषयांतर केलें. तो म्हणाला, "अरे हो! बरी आठवण झाली. मला अेका बाबतींत मत हवंय् तुमचं. बैठ्या ज्ञानार्जनाबद्दल तुम्ही म्हणालांत खरं, पण बैठ्या धनार्जनाची मात्र अेक संधि आली आहे मला. बोला, मी पतकरूं का?"

"अरे, कसली संधि तें तरी कळूं देशील? पण काय रे दाजी, अेका वेळीं अेकच काम करायचं, अध्यापनाशिवाय दुसऱ्या विषयाकडं लक्ष द्यायचं नाही, हें आपलं ध्येय तूं विसरलास वाटतं?"

"माझं ध्येय मी कधींहि विसरायचा नाही. माझ्यापुढं आलेलं हें कार्य म्हणजे अध्यापनाचीच अेक शाखा आहे. आमच्या कॉलेजच्या कांही प्रोफेसर्सनी 'विविध ज्ञानभांडार' नांवाची अेक ग्रंथ-प्रकाशन-संस्था स्थापन केली आहे. आंग्ल वाङ्मयांतील विविध अुपयुक्त ग्रंथांचं मराठींत रूपांतर करून प्रकाशित करायचं कार्य ही संस्था करणार आहे. कॉलेज मॅगेझिनमधील माझ्या लेखांवरून अर्थशास्त्रावरील ग्रंथांचं रूपांतर मी चांगलं करीन असं प्रो. दंडवते यांना वाटलं आणि त्यांनी प्रो. स्ट्रॅांगमनचं नुकतंच प्रसिद्ध झालेलं पुस्तक माझ्याकडं पाठवून मी त्याच्या आधारानं ग्रंथ लिहून द्यायला तयार आहे की नाही असं मला विचारलं आहे. सातशे रुपये मोबदला द्यायला तयार आहेत ते. मग पतकरूं हें काम?"

"बेलाशक पतकर. बैठेसे बिगार भली." मीं सांगून टाकलें.

"वा भाअूजी! लग्नाचा खर्च तर परभारें काढलांत!"

" पैशाची मातब्बरी मला नाही वाटत, वैनी. पण लेखक म्हणून विद्वान लोकांत माझं नांव होणार हा फायदा मी मोठा समजतों." दाजीने वेदान्ती स्वरांत अुत्तर दिलें.

" तूं वाटेल तो फायदा समज. पण हें काम पतकर आणि कर." मीं आग्रह केला.

दाजीने ही कांहीतरी बात झोकली नव्हती. चारदोन दिवसांनी विविध ज्ञानभांडार ग्रंथमालेची जाहिरात वर्तमानपत्रांत फडकली आणि आगामी ग्रंथांच्या लेखकांत दाजीचें नांवहि झळकलें. वाऱ्यावर वाहत चाललेल्या दाजीच्या आयुष्यांत अेक भरीव आणि किफायतशीर कार्य होणार याचें मला मोठें समाधान वाटूं लागलें.

अेका रविवारीं दाजी दोन प्रकरणांचीं हस्तलिखितें घेअून आला. त्याने मला तीं वाचून दाखविलीं. मूळ ग्रंथहि मीं आधी वाचून पाहिला असल्याने दाजीने केलेलें रूपांतर बरें झालें की वाअीट याचा मला निर्णय करतां येत होता. मी मनांतून अगदी थक्क होअून गेलों. दाजीची भाषा ओघवती होती, विवेचनपद्धति तर्कशुद्ध आणि सुबोध होती आणि कित्येक ठिकाणीं तर मूळ ग्रंथापेक्षा दाजीचें रूपांतर बहारदार झालें होतें ! मीं मनांत म्हटलें, ज्याला आम्ही अर्धवट म्हणतों, लोकहि ज्याला विक्षिप्त म्हणतात, त्या दाजीच्या डोक्यांत केवढी जाडी विद्वत्ता भरली आहे ही ! वरून काटेरी आणि ओबडधोबड दिसणाऱ्या फणसाच्या अंतर्भागीं मधुर व पिवळ्याजर्द गऱ्यांचा साठा असतो, तसेंच नाही का हें ?

दाजीचीं वीस प्रकरणें पुरीं झालीं. अेकाहून अेक सरस ! आता पांच झालीं की पुस्तक पूर्ण !

अेका शनिवारीं घरीं येतांना मीं ताजा ' प्रकाश ' विकत घेतला, अुघडला आणि ठळक शीर्षकावर दृष्टिक्षेप केला. " धडपड्यांनी दगा दिला ! " हा मथळा वाचतांच मी चमकलों. धडपडे म्हणजे दाजी तर नव्हे ? अशी शंका आली आणि मीं तो मजकूर आधाशासारखा वाचून काढला.

माझी शंका बरोबर होती. धडपडे म्हणजे दाजीच आणि त्याने विविध ज्ञानभांडार ग्रंथमालेला खरोखर दगा दिला होता! मालेसाठी लिहिलेलें पुस्तक त्याच्याकडून मिळत नसल्यामुळे दुसरें पुस्तक थोड्या अवकाशाने प्रकाशित होओील अशी सूचना मालेच्या चिटणिसांनी दिलेली होती.

कुठे माशी शिंकते की काय अशी मला धास्ती होतीच. पण कोणती माशी कुठे शिंकली याचा अुलगडा होओीना. मीं बरेंच डोकें खाजवलें, पण व्यर्थ!

संध्याकाळीं दाजी येतांच प्रकाश त्याच्याकडे फेकून मीं विचारलें, " काय आहे रे ही भानगड, दाजी?"

" कसली आलीय् भानगड? चोरांचा डाव आहे सगळा! त्यांना वाटत असेल आपण प्रोफेसर आहों अन् या पोराला सहज फसवूं! पण म्हणावं, हें पोर तुमच्या बापाचं बारसं जेवलंय्. आता बसलेत की नाही शंख करीत?"

" अरे, पण त्यांनी केलं तरी काय असं?" मीं अधीरतेने विचारलें.

" काय केलं? नअू हजार तीनशेला गोता द्यायचा डाव टाकला होता त्यांनी. हे लेकाचे पांच हजार प्रति काढणार. किंमत दोन रुपये ठेवणार. मला मात्र सारे सातशे! बाकीचे सारे पैसे म्हणे या चोरांचे!"

" अरे, पण खर्च आहे ना?"

" सारं माहीत आहे मला. अठराशेपेक्षा कवडीदेखील जास्त खर्च नाही येत. केलाय् मीं हिशेब. त्या नूतन ग्रंथमालेच्या पाचऱ्यांनी डोळे अुघडले माझे. ते म्हणाले, आपण हजार रुपये देतों माझ्या पुस्तकाला."

" मग त्यांना तरी देअून टाका." तिने सुचविलें.

" छट्! ते दगलबाज झाले तरी मी नाही दगलबाजी करणार. आणि वैनी, हा ज्ञानयज्ञ आहे यांत शुद्धता हवी, पावित्र्य हवं. लिहिलेलं पुस्तक हें सरस्वतीदेवीला अेकदा वाहिलेलं फूल, अेकदा

दाखविलेला नैवेद्य, तोच मी दुसऱ्याच्या पूजेला घेऊं? अितकी का कंगाल आहे माझी लेखणी? वैनी, दाखवलेला नैवद्य हा मुलाबाळांना वांटून टाकतात ना? मींहि हा नैवेद्य वांटून टाकला. शाळेंतल्या मुलांना गणिताच्या वह्या घालण्यासाठी मीं साऱ्या हस्तलिखितांचे पाठकोरे कागद दिलेसुद्धा. वैनी, अशी मजा आहे! दाजी रे ऽ जी जी ऽ ऽ ऽ"

"अरेरे! खरा पढतमूर्ख!" असे अुद्गार माझ्या तोंडून नकळत निघाले.

★ ★ ★



# दाजीचा गणेशोत्सव

शाळेचें काम तरी दाजी धडपणें करतो की तेथेहि त्याचा विक्षिप्त स्वभाव अुसळी मारतो, अशी मला कित्येक दिवस धाकधुकी वाटत होती. पण वर्ष दीड वर्षांत तसें कांहीं झालें नाही. अुलट, मुलांचा आवडता शिक्षक असा लौकिक त्याने संपादन केला. विद्यार्थीवर्गांत शिक्षणाबरोबर शिस्तीची आवडहि त्याने अुत्पन्न केली. निरनिराळ्या खेळांची गोडी त्याने आपल्या विद्यार्थ्यांना लावली. परीक्षकांनीं शाळेला दिलेल्या शिफारसपत्रांत दाजीच्या कामाचा गौरवयुक्त निर्देश केला गेला आणि साहजिकच दाजीची हंगामी म्हणून झालेली नेमणूक कायम करुन स्कूल कमिटीने त्याला दहा रुपयांची बढतीहि मंजूर केली.

दाजीच्या या बढतीपेक्षाहि मला आनंद देणारी गोष्ट म्हणजे त्याचा अेकलकोंडा आणि बुजरा स्वभाव बदलून तो जगाशीं मिळून-मिसळून वागूं लागला हीं मनुष्य अनुभवाने शहाणा होतो म्हणतात याची दाजीच्या या परिवर्तनावरुन मला प्रचीति आली. सोनगांवास बालदिन साजरा झाला. त्यांत दाजीने सुंदर आणि सुविचारपरिप्लुत व्याख्यान दिलें. त्याचा वृत्तपत्रांत प्रसिद्ध झालेला अहवाल वाचून मला समाधान वाटलें; आणि आता दाजी माणसांत आला, त्याला अेखादी चांगलीशी जोडीदारीण गाठ घालून देअून त्याचा संसार अुभा करावा असे विचार मी तिला बोलून दाखवूं लागलों.

तिनेहि मला दुजोरा दिला, अेवढेंच नव्हे, तर आपल्या चुलत-चुलतीच्या भाचीची नणंद दाजीला अुत्तम बायको शोभेल अशी माहितीहि दिली.

अजून लग्नसराअीला खूप अवकाश होता. नुकता श्रावण सुरू झाला होता. तरीपण दाजीसारख्याशीं प्रसंग असल्याने आतापासूनच तयारीला लागणें मला अवश्य वाटलें. "तें तुमचं तुम्ही पाहा" असें म्हणून त्याचे मामा मोकळे झाले होते आणि दाजीला चतुर्भुज करण्याची जबाबदारी माझ्यावर पडली होती. आता दाजीने "हूं" म्हटलें की वधूसंशोधनास लागायचें मीं ठरविलें आणि त्यासाठीच श्रावणीच्या निमित्ताने मीं त्याला बोलविलें.

दाजी आला, पण श्रावणीसाठी नव्हे, तर श्रावणी करण्यांत अर्थ नाही असें आपलें मत मला सांगण्याकरिता! गोमूत्राची त्याने टर केली. रानावनांत फिरून निरनिराळया वनस्पति खाणाऱ्या गायींचें मूत्र कदाचित् औषधी असेल; पण शिळया, नासक्या अन्नाचें आंबोण खाणाऱ्या गायींचें पंचगव्य खात्रीने तसें नाही. आणि वाटेल तसलीं शुद्ध आणि खात्रीचीं औषधें आता अुपलब्ध असतांना गोमूत्रासारखें अमंगळ औषध "बाबा-वाक्यं प्रमाणम्" म्हणून पोटांत ढकलणें शुद्ध गाढवपणा होय, असें तो ठासठासून सांगत होता. साबण, शिकेकाअी सहज मिळत असून भस्म, गोमय आणि मृत्तिका लावून स्नानें करीत बसणें म्हणजे सुधारलेल्या अवस्थेतून परत रानटी अवस्थेंत शिरण्यासारखें आहे, असें त्याचें म्हणणें होतें.

दाजीचे हे विचार यापूर्वी दुसऱ्या कित्येक लोकांनी प्रकट केलेले असल्याने मला त्यांचें आश्चर्य वाटलें नाही; पण अेकसारखें वटवटण्याऱ्या त्याच्या सरबत्तीला आळा घालण्यासाठी मी म्हणालों,

"किती वटवटतोस रे! तुझं तोंड कातड्याचं आहे म्हणूनच निभाव आहे, नाहीतर फाटून गेलं असतं अेव्हापर्यंत. आजपर्यंत मी बायकांना वटवट्या म्हणत होतों–"

" स्त्रीजातीचा अपमान आहे हा ! " माझें वाक्य पुरें न होतांच दाजी अुसळला. " अडाणी पुरुषांनी स्त्रीजातीवर वाटेल तसले आरोप केले, तरी तुमच्यासारख्या शहाण्यासुर्त्या माणसानं ते करावे, ही शरमेची गोष्ट आहे. "

" मग काय, बायका मुखदुर्बळ असतात असं तुझं म्हणणं ? "

" तुम्हाला मधली स्थिति दिसतच नाही का ? अेक तोंडाळ म्हणून दोष द्यावा, नाहीतर मुखदुर्बळ म्हणून नांवं ठेवावीं मितभाषणी म्हणून मधली पायरी नाही हो तुम्हाला दिसली ? स्त्रीवर्गासंबंधी तुमची दृष्टि किती विकृत आहे, याची साक्ष आहे ही. अहो, बायका तोंडाळहि नाहीत आणि मुखदुर्बळहि नाहीत. मितभाषण हा त्यांचा नैसर्गिक धर्म आहे. "

" बरोबर सांगितलंत तुम्हीं, भावजी. " तिनेंहि दाजीला पुष्टि दिली.

" या विषयावर तुझं मत मंजूर नाही–" मी म्हणालों, " बायका बायकांचा कैवार घेणारच. "

" मग या बाबतींत तुमचं मत तरी कां ग्राह्य धरावं ? प्रतिवादी-बद्दल वादी खरं बोलेल का कधी ? " दाजीने मला पेच घातला.

या पेचांतून निसटण्यासाठी मीं म्हटलें, " पण काय रे, तूं म्हण-तोस तसं मितभाषणी स्त्रीचं अेखादं अुदाहरण दाखवशील का मला ? आता आमच्या हिचं नको सांगूं हं. ही आहे– "

" काय नको अितकं टोचून बोलायला ! " पाअूण वर्तुळाचा वळसा मानेला देअून ती म्हणाली.

" जाअूं दे दाजी– " सावरून घेत मीं म्हटलें, " हें आमचं रोजचंच आहे. पण खरं सांग, आहे का आढळांत तुझ्या अेखादी बिन-बोलकी बायको ? "

" हो, नसायला काय झालं ! आमच्या रंगोपंत सावकारांची मुलगी शांता अगदी नमुनेदार मुलगी आहे. घरांत आहे की नाही कळायचं-दिखील नाही कुणाला. विणणं, टिपणं, नाहीतर वाचन. पांचसहा यत्ता

अिंग्रजी झाल्या आहेत; पण थिल्लरपणा नांवाला नाही. बाळबोध मुलगी आहे अगदी. ”

“ बिचारा नवरा भाग्यवान्. म्हणायचा. ” मीं मध्येच सहेतुक शेरा दिला.

“ नवरा ! अहो, पण लग्न कुठं झालंय् तिचं ? ”

“ हं ? ”

“ मग तिची न् तुमची काय ओळख भाअूजी ? मुलीबाळींच्या ओळखी करायला लागलां वाटतं आ न ? ” तिने हसतहसत विचारलें.

“ हॅः ! तुम्ही मोठ्या ह्याच आहां, वैनी ! मी शिकवायला जातों शांताला. ”

“ अरे, पण तुला यांत अितकं बावरायला काय झालं ? वयच आहे तुझं. आणि तरुण मुलानं अुपवर मुलीशीं परिचय केला, तर मी नाही वावगं म्हणत. कुठलीतरी अनोळखी बायको गळयांत बांधून घेण्यापेक्षा आपलं हें बरं. ” मीं मुद्दामच हा विषय दाजीला चिकटविला.

दाजी बावरला. त्याने बिचकलेल्या मुद्रेने अेकदा माझ्याकडे आणि अेकदा तिच्याकडे पाहिलें.

“ कांहीतरी पाणी मुरतंय् ग ऽऽ बाअी ! ” असें म्हणून ती अेकदा मोठ्यानं हसली. “ पण भाअूजी, जपून हं ! तुमचे ते रंगोपंत का चिंतोपंत म्हणतां, त्यांना आहे का यांतली माहिती ? नाहीतर चोरटा कारभार अंगशीं यायचा– ”

“ तूं आपली कोणतीहि गोष्ट अगदी शेवटच्या टोकाला नेतेस ! दाजी अितका आचरट आहे थोडाच ! ” दाजीचा अुडालेला गोंधळ कमी व्हावा आणि त्याला माझा विश्वास वाटावा म्हणून मीं त्याची कड घेतली.

“ शांता रूपानं बरी असेल, नाही रे ? ”

दाजीने होकारार्थी मान हालविली.

“ आणि प्रकृतीनंहि धडधाकट असेल ? ”

दाजीने पुन्हा मानेनेच अुत्तर दिले.

" बरं, पण रंगोपंत सावकारांनी शांताबद्दल विचारलं होतं का कधी? आडपडद्यानं तरी?"

" तुमच्या लग्नाचा काय विचार आहे, असं ते विचारीत होते अेकदा."

सातआठ टप्प्यांनी दाजीने या अेका वाक्याचा शेवट गाठला.

" मग काय सांगितलंस तूं ?"

" माझा अजून काहीच विचार नाही, असं सांगितलं मीं." दाजीने निराशेचा अेक सुस्कारा सोडला.

" बरं मग ?"

" मग ते कांहीच बोलले नाहीत." दाजीचा कंठ दाटून आला आणि "ते आता दुसऱ्या अेका स्थळाच्या शोधांत आहेत-" हें वाक्य बोलतांना तर त्याच्या डोळ्यांत अश्रु चमकल्याचाहि मला भास झाला.

" पण भाअूजी, यांत तुम्हाला अितकं हें काय वाटतं? जगांत ती अेकच का मुलगी आहे."

" जगांत कोट्यवधि मुली असतील वैनी, पण शांताची सर दुसरीला नाही यायची. शांता ती शांता!" दाजीला पुन्हा अवसान चढूं लागलें

" लगीन होअीपर्यंत असंच म्हणतात सारीजणं. लगीन झालं म्हणजे मात्र तीच बायको पोतेऱ्यासारखी लागते वाटायला." तिचा हा टोमणा दाजीपेक्षा माझ्यावरच फेकलेला होता.

" पण मी अशांपैकी माणूस आहे असं वाटतं का तुम्हाला? ... वैनी, मी बायकोला बटीक समजणारा अरेराव नाही. बायकोला बरोबरीचा जोडीदार समजून तिला योग्य तो मान मी देअीन. शांता मला मिळाली तर तिला-"

" मग मिळवा की! नवऱ्याला बायको मिळत नाही म्हणजे काय गोष्ट आहे?"



“ दुसरी मुळगी ? नांव नको दुसऱ्या मुळीचं ! ” (पान २७)

" तुझं राहूं दे आता– " मीं शिष्टपणाचा स्वर काढून म्हटलें. " दाजी, सावकारांच्या शांतावर तुझं मन बसलं आहे यांत वाअीट कांहीच नाही. ती तुला मिळाली तर अुत्तमच; पण समज, तें नाही साधलं, तर दुसरी अेखादी मुलगी पाहूं का तुझ्यासाठी ? "

" दुसरी मुलगी ! नांव नको दुसऱ्या मुलीचं ! "

त्या वेळीं हा विषय येथेच संपला. मात्र मी तेवढ्यावरून समजून चुकलों, की दाजीला लग्नाची आतुरता अुत्पन्न झाली आहे. त्याचें भाबडें मन सावकारांच्या शांताभोवती पिंगा घालीत असलें, तरी ती त्याला मिळेलच अशी मला खात्री नव्हती. आणि आज दाजी जरी दुसऱ्या मुलीचें नांव काढायला तयार नसला, तरी पुढे तयार होअील असा मला विश्वास वाटला आणि म्हणूनच मीं त्याच्यासाठी वधू-संशोधन करावयाचें ठरविलें.

खटपटीला लागलें म्हणजे अेकेक गोष्टी आपोआप जुळून येतात. माझ्या ऑफिसांतले रामभाअू आपल्या पुतणीसाठी स्थळ शोधीत आहेत असें मला आठवलें. मीं तिला पाहिलेलें होतें व ती मुलगी बरी होती. त्यांना दाजींचें स्थळ सुचवावें असें मीं ठरविलें आणि अेके दिवशीं मी मुद्दाम त्यांच्याकडे गेलों.

रामभाअू चहा पितांपितां ताजा ' प्रकाश ' वाचीत होते, त्याच वेळीं मी तेथे गेलों. साहजिकच माझेंहि चहानें आदरातिथ्य झालें. बशी तोंडाला लावतांलावतां मीं विचारलें, " काय म्हणतोय् प्रकाश ? "

" काय म्हणतोय् दगड ! " नापसंतीनें प्रकाश माझ्याकडे फेकून रामभाअू म्हणाले, " गणेशोत्सव बोकाळलेत ना आता ? दुसरा विषय असेल तर शपथ ! "

चहा संपवून मीं प्रकाश अुघडला. मधल्याच पानावर–

' सोनगांवचा अभिनव गणेशोत्सव ! धडपडे मास्तरांची प्रशं-सनीय कामगिरी ! जुन्याच्या कपाळीं नव्याचा बडगा ! ' अित्यादि शीर्षकें वाचतांच– ' म्हणजे ! हा काय प्रकार आहे आणखी ! " असे आश्चर्योद्‌गार माझ्या तोंडून निघाले.

"काय आहे हो! कसला प्रकार?" रामभाऊंची जिज्ञासा जागृत झाली. आणि मी वाचीत असलेला मजकूर ते लक्षपूर्वक अैकूं लागले.

दाजीने खरोखरच प्रशंसनीय कार्य केलें होतें. सोनगांवला सावकारांच्या वाड्यात दरसाल गणेशोत्सव होअी व त्याला 'सार्वजनिक' असें म्हणण्यांतहि येअी. गावकऱ्यांकडून वर्गणी वसूल करण्यांत येअी, पण अुत्सवाचे कार्यक्रम मात्र सावकार करतील ते! बहुतेक कळवंतिणीचें ( कलावंतिणीचें नव्हे ) गाणें होअी, गावच्याच टाळवाल्यांच्या भजनाचा गोंधळ होअी आणि याच्यावर गावकऱ्यांना चुरमुरे-खोबऱ्याची खिरापतहि मिळे. झाला सगळा अुत्सव! बहुतेक लोक सावकारांचे मिंधे असल्याने सावकारांना वर्गणीच्या हिशेबाचा तपशील विचारण्याच्या फंदांत कोणी पडत नसत आणि त्यांतूनहि जे कोणी पुंड म्हणून ओळखले जात, त्यांना अुत्सवसमाप्तीनंतर अेक श्रमभोजन देअून सावकार गप्प बसवीत.

दाजीने हा प्रकार अुघडकीला आणला आणि गणेशोत्सव म्हणजे नाचरंगाची सुगी नसून तें अेक ज्ञानसत्र आहे आणि त्या दृष्टीनेच त्याचा अुपयोग केला पाहिजे असें सोनगावास सांगितलें व तो अुपयोग कसा करावा हें सप्रयोग दाखविलें. त्याने कुणापाशी कवडीचीसुद्धा याचना न करतां सारा खर्च पदरचा केला. त्याच्या अुत्सवांत स्पृश्यास्पृश्य असा भेद नव्हता. हिंदु म्हणवणाऱ्या कोणत्याहि मनुष्याचा तेथे सुखाने प्रवेश होअी. रोज नवनव्या प्रसिद्ध पुरुषांचीं व्याख्यानें, चांगल्याचांगल्या हरिदासांचीं कीर्तनें, स्त्रीवर्गासाठीं हळदकुंकू व स्वतंत्र व्याख्यान, मुलांमुलींचे खेळ व शर्यती अशा अनेकविध कार्यक्रमांचें वर्णन आणि तेंहि वृत्तपत्रीय रसभरित भाषेंत रंगविलेलें वाचून मला आश्चर्य वाटलें, आनंदहि झाला.

"मोठा कळकळीचा आणि तडफदार गृहस्थ दिसतो हा!" रामभाअू म्हणाले. माझ्या कार्याचा आयताच नारळ फुटला.

" झाकलं माणिक आहे हें. वीसबावीस वर्षांचा कोणता मुलगा अितकं कार्य करतोय् ? "

" तुमच्या माहितींतले आहेत वाटतं हे धडपडे ! अन् अितके तरुण आहेत ? "

" होय तर ! त्यांच्या लग्नाच्या तजविजींत आहें मी. आहे आपला खाअूनपिअून सुखी. बी.अे.पर्यंत शिक्षण झालंय्. आज मिळवतो आहे. " अित्यादि प्रस्तावना करून दाजीचे असतील नसतील ते गुण मीं राम-भाअूंना अैकविले. होयच नाहीतरी. मी अेका अुपवधू मुलाचा पुढारी म्हणून अेका अुपवर मुलीच्या पालकाबरोबर बोलत होतों ना ?

" मग आमच्या अिंदूबद्दल विचारा की त्यांना. माझ्या अैपती-प्रमाणं खर्चेहि करीन मी. " आर्जवी स्वरांत रामभाअू म्हणाले.

मला हवें होतें तें मिळालें. मग वरपक्षाची आढ्यता मला कां येअूं नये ?

" बरं, पाहतां येअील पुढं– " असा आशीर्वाद देअून मीं म्हटलें, " आता अुद्याचा कार्यक्रम काय ठेवलाय् त्यानं पाहा बरं. जुळलं तर पाहून यावं म्हणतों. अैती सुटी आहे अुद्या. "

" अुद्या ना ? रविवार–" 'प्रकाशा'त कार्यक्रम शोधीत रामभाअू म्हणाले.

" रविवार– सायंकाळीं ५ ते ८– जगप्रवासी विश्वंभर यांचें व्याख्यान. "

" अरे वा ! " मी हर्षभराने म्हणालों, " मोठी नामी संधि आहे हीं ! जायचंच अुद्या सकाळच्या गाडीनं कांही झालं तरी. अशीं शलकीं माणसं कशीं गोळा केलीं यानं ? "

" मग मीहि येअीन आपली हरकत नसेल तर. सहज परिचय होअील त्यांचा. " रामभाअू म्हणाले.

त्यांना मीं ताबडतोब मान्यता दिली हें निराळें सांगावयास नकोच.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं रामभाऊ टांगा घेऊनच माझ्याकडे आले. मी कपडे करून निघणार तोंच दुसरा टांगा दारांत उभा राहिला आणि त्यांतून खुद्द दाजीच उतरला ! आणि आश्चर्य हें, की आज तो रोजच्या-सारखा सुटसुटींत नसून आपला बाडबिस्तरा घेऊन आलेला होता !

" अरे ! हा काय प्रकार ! या वेळीं सोनगांव कसं सोडलंस ? " मी उद्गारलों.

" आग लावा त्या सोनगांवला ! " दाजी कडाडला !

" अरे, पण तुझा गणेशोत्सव चालू आहे ना ? "

" टाकला संपवून काल रात्रींच ! माझ्यावर शिरजोरी करतात हरामखोर ! पैसा खर्च करणार मी, अन् काय म्हणून ऐकून घेईन या उपटसुंभांचं ? म्हणे सार्वजनिक उत्सवांत प्रत्येकाला मत द्यायला हक्क आहे आणि म्हणे बहुमताप्रमाणं सारे कार्यक्रम व्हायला पाहिजेत !"

" अरे, पण कोण काय करायला सांगतात तें ऐकून तरी घेतलंस का ? "

" काय म्हणून हा त्यांचा जुलूम पण ? मीं विश्वंभरचं व्याख्यान ठरवलं यांत यांच्या बापाचं काय खर्च झालं ? द्यायचं नव्हतं फार तर ! आणि कुबडेबुवाचं कीर्तन करायचा आग्रह. मीं साफ सांगितलं, ' नाही ' म्हणून. मग चोर म्हणतात काय– ' आम्ही तुमच्यावर अन् तुमच्या उत्सवावर बहिष्कार घालूं. ' कुणीतरी अडाणी माणूस बरळला असता, तर मला कांही वाटलं नसतं त्याचं. पण आमचा हेडमास्तर अन् तो रंगोपंत सावकार लागले मला तंबी द्यायला ! मीं खूप उडवली दोघां-चीहि आणि म्हटलं, हवंय् कशाला या हरामखोरांचं इतकं ! त्यांच्या देखत गणपति उचलला अन् काल चौथ्या दिवशींच केला विसर्जन तळ्यांत. म्हटलं, घ्या लेकांनो ! ज्या मंडळींना निमंत्रणं दिलीं होतीं त्यांना केल्या तारा 'येऊं नका' म्हणून; आणि आलों मी निघून इकडे. "

" थोडी घाईच केलीस तूं ही माझ्या मतानं. चार समजुतीच्या गोष्टींनी वळले असते की ते. इतका गाजलेला उत्सव, अशी डोक्यांत राख घालून नासलास, काय मिळालं तुला यांत ? "

" काय मिळालं ? माझा स्वाभिमान मीं कायम राखला हें काय थोडं झालं ? मी गणपतिविसर्जन करायला अुठलों, तेव्हा लागले दुढ्ढाचार्य मला अुपदेश करायला ! म्हणतात काय तोंड लांब करून, की ' जळांत राहून असं माशांशीं वैर करूं नये. ' मीं म्हटलं, ' मला तुमचं जळहि नको अन् तुमच्यासारख्या माशांचीहि पर्वा नाही मला. येअूनजाअून तुमची अैट माझ्या नोकरीबद्दलच ना ? मला तुमच्या या नोकरीचीसुद्धा फिकीर नाही. ' असं म्हणून मीं तिथल्यातिथं राजीनामा खरडून फेकला त्या हेडमास्तरच्या अंगावर. "

दाजीचा हा पराक्रम अैकून मी सर्दच झालों ! मी केलेल्या कल्पना आणि रचलेले बेत असे अकस्मात् गडगडलेले पाहून " जित्याची खोड मेल्याशिवाय जात नाही " असे अुद्गार माझ्या तोंडून निघाले आणि केविलवाण्या नजरेने मीं रामभाअूंकडे पाहिलें.

माझ्या पाहण्याचा आशय रामभाअूंना कळला आणि पायांत जोडा अडकवीत ते म्हणाले, " जातों आता टांगा घेअून परत. "

" कोण हो हे ? " दाजीने रामभाअू गेल्यावर विचारलें.

" तुझ्या मूर्खपणाचे आणखी अेक साक्षीदार ! " चिडलेल्या आवाजांत मीं अुत्तर दिलें आणि कोटटोपी अुतरून ठेवली.

★ ★ ★



# दाजीची संस्थानी कारकीर्द

संस्थानी वातावरण दाजीच्या स्वभावाला फार करून मानवणार नाही, असें माझी मनोदेवता सांगत असूनहि मीं गोंधळपुरच्या राजेसाहेबांकडे शब्द टाकला. आणि आश्चर्याची गोष्ट ही, की (दाजी-बद्दल माझ्याच शब्दांवर भरवसा ठेवून) त्यांनी दरमहा चाळीस रुपयां-वर स्वतःचा 'रीडर' म्हणून दाजीची नेमणूक करण्याचें मला आश्वासन दिलें. संस्थानी पगार म्हणजे कैद्यांचा भत्ता असा लोकप्रवाद मीं अैकला होता व तो खोटाहि नव्हता. कारण, खुद्द गोंधळपुरांतच बारा वर्षे नोकरी केलेल्या माझ्या माहितींतल्या अेका कारकुनाचा पगार पंधरा रुपये होता! आता मशारनिल्हे कारकून त्या पंधरा रुपयांवरहि हजारो रुपये अुत्पन्नवाल्या लक्ष्मीपुत्राअितक्याच अैष-आरामांत राहतात, ही गोष्ट मात्र मीं प्रत्यक्ष पाहिली होती.

तें कसेंहि असलें तरी राजेसाहेबांनी पहिल्याच दणक्यास चाळिसाची जागा दाजीला कशी देअूं केली याचें मला आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाही. त्यापेक्षाहि आश्चर्य मला दाजीच्या शिकंदर नशिबाचें वाटलें. नोकरीसाठी हवालदील व्हावें न लागतां नोकरीच त्याच्याकडे चालून आली आणि तीहि अधिक पगाराची व त्याच्या आवडीप्रमाणे विद्याव्यासंगाची! आंधळ्याने अेक डोळा

मागावा आणि त्याला दोन्ही डोळे मिळावे त्यांतलाच हा प्रकार मला वाटला.

सांगितल्याबरोबर संमति देअील तर तो दाजी कसला? त्याने शेकडो शंकाकुशंका प्रदर्शित केल्या. संस्थानिक लहरीच असतात, त्यांच्या अिथे तोंडपुज्या लोकांचा वरचष्मा असतो आणि ते सरळ माणसाची केव्हा तोंडफोड करतील याचा नेम नाही, अशा तक्रारी पुढे मांडून दाजीने आपल्या अैकिवांतलीं कांही अुदाहरणेंहि मला अैकविलीं. कुठल्याशा अेका संस्थानांत अेक घोडेघाशा मोतद्दार तिथल्या राजेसाहेबांच्या मर्जीत अुतरला आणि त्यांनी त्याला पहिल्या दर्जाचा मानकरी बनवून खुद्द दिवाणसाहेबांनीहि त्याला खडी ताजीम दिली पाहिजे व मुजरा केला पाहिजे असें फर्मान सोडलें! याचा रसभरीत अितिहास पुष्कळशा लागट शद्बांचा मसाला भरून दाजीने आम्हांला सांगितला; आणि दुसऱ्या अेका संस्थानांतील अेका बड्या अधिकाऱ्यास अेकाच दिवसांत हुजूरची खप्पा मर्जी झाल्यामुळे तुरुंगाची हवा खावी लागली, अशीहि अेक आख्यायिका अक्षरशः खरी असल्याबद्दल दाजीने शपथपूर्वक सांगितलें; व क्षणांत सौभाग्यवती व क्षणांत गंगाभागीरथी करणाऱ्या संस्थानी ताबेदारीपेक्षा चौपदरी घेअून 'ॐ भवति' म्हटलेलें काय वाअीट, असा आम्हांला त्यानें सवालहि घातला.

वादविवाद करून दाजी कधी अैकायचा नाही हें मला माहीत असल्याने मी त्या फंदांत पडलों नाही. मीं त्याचाच सूर प्रथम ओढला आणि त्याला माझा विश्वास दाखवून विचारलें, "अरे, पण भल्या माणसा, वाअीटांतून चांगलं काढण्यांतच खरा पुरुषार्थ नाही का? ज्याच्या अंगीं कुवत नाही अशा लेच्यापेच्या माणसांनी संस्थानी नोकरीला भिअून मागं सरावं हें साहजिकच आहे. पण तुझ्यासारख्या खंबीर गड्यानं तसंच डरावं यांत तुझा काय मोठेपणा? मी तर म्हणतों, संस्थानी अंदाधुंदींत तू जाणूनबुजून शिरावंस आणि तिथंच

आपली कर्तबगारी दाखवून वाहवा मिळवावीस, यांतच पुरुषार्थ नाही का? अितरांसारखा तूंहि भ्यालास–"

"मी भिणार! शक्यच नाही हें." दाजी गर्जेला.

माझी मात्रा बरोबर लागू पडली हें पाहून मला खूपच आनंद वाटला; पण तो चेहऱ्यावर यत्किंचित्‌हि न दाखवितां मीं म्हटलें,

"मग पंधरा दिवसांनी येतोय् म्हणून पत्र लिहितों अुद्या राजे-साहेबांना."

"छट्! अुद्याच निघणार मी. अेकदा ठरल्यावर वेळ दवडणं पसंत नाही आपल्याला."

"बरं बुवा, मर्जी तुझी!"

म्हटल्याप्रमाणे दाजी दुसऱ्या दिवशीं गोंधळपुरास माझें पत्र घेअून रवाना झाला आणि सहासात दिवसांनी त्याचें हळूहळू बस्तान बरें बसत असल्याचें पत्रहि आलें. या पत्रांत त्याने तेथील परिस्थितीचें थोडेंसें वर्णनहि केलें होतें. श्रीमंत स्वभावाने बरे आहेत, पण थोडे विलासी आणि सुखलोलुप आहेत. कोणी कांही सांगितल्यास त्यांना अेकदम खरें वाटतें; पण दुसऱ्याचें म्हणणें अैकून घेण्याअितका समंजसपणाहि ते कधीकधीं दाखवितात. राजवाड्यांत सर्वांना "आज्ञा" या शद्बाचा जप सारखा करावा लागतो; कारण, श्रीमंत किंवा राणीसाहेब यांच्या तोंडून निघणाऱ्या दरेक गोष्टीस "आज्ञा" म्हणून हजर असणाऱ्या प्रत्येकाने रुकार दिला पाहिजे, अशी हकीकत लिहून दाजीने प्रत्यक्ष पाहिलेली पुढील गोष्टहि नमूद केली होती.

"श्रीमंतांच्या पंक्तीस गुरुजी नांवाचा अेक अिसम आहे. तो कोणाला काय शिकवतो हें अद्यापपर्यंत तरी मला कळलेलें नाही. तो बहुतेक सोवळा असतो. तथापि त्याचें सोवळें थोडें लवचिक दिसतें. कारण गोविंदा शागीर्दाच्या चंचींतील चिमूट घेतांना मीं त्यास परवा पाहिलें व त्याच सोवळ्यावर तो पाटावर बसला याची मीं खात्री करून घेतली. हा गुरुजीनामा होयबा श्रीमंतांच्यापुढे नंदीबैलाप्रमाणे माना डोलवीत असतो. काल जेवणाच्या वेळीं पुढील मौज झाली–

" काय हो, परवा पांदिचरीला मोठं वादळ झालं म्हणे ! "

" आज्ञा. "

" आणि घर कोसळून पुष्कळ माणसं आणि जनावरं जायबंदी झालीं ? "

" आज्ञा. "

" आपल्याकडं नाही सहसा वादळ होत. "

" आज्ञा. "

" बाकी आपल्याकडं सापांचा अुपद्रव भारी आहे. "

" आज्ञा. "

" सर्पदंशावर अजून कांही अिलाज सापडत नाही. सर्पदंशा-अितकी भयंकर गोष्ट कोणती राहिली आहे आज ? "

" आज्ञा. "

" वास्तविक श्रीमंत मला अुद्देशून बोलत होते आणि मी यथा-मति अुत्तरें देणारहि होतों. पण गुरुजींचा ' आज्ञेचा ' ठेका अशा द्रुतगतीने चालू होता आणि श्रीमंतांचें भाषणहि अितकें अविलंबित होतें, की मला ओठ हलवण्याअितका अवसरच मिळेना ! "

दाजीच्या नवलाअींत भर घालणारा राजवाड्यांतील दुसरा प्राणी म्हणजे स्वारी-कारकून. मळकट आणि अस्ताव्यस्त पोषाक, विड्याने रंगलेलें तोंड, विसकटलेली शेंडी आणि वाढलेली दाढी, असें तें अेक अैसपैस धूड होतें. श्रीमंतांपुढे चोर आणि अितरांपुढे शिरजोर असा त्याचा दुहेरी खाक्या असे. ज्याला त्याला दम देत सुटायचें आणि कोणीं दाद न दिल्यास ' स्वारींना सांगीन ' म्हणून धाक घालायचा हा त्याचा शिरस्ता ! हा प्राणी सूर्योदयाबरोबर वाड्यांत घुसला की रात्रीं अकराला बाहेर जातांना रिकाम्या खिशाने कधी जायचा नाही. कोरडे पदार्थ नाही मिळाले तर भाजी-अुसळीसारखे ओलेकोरडे पदार्थहि खिशांत कोंबायचे ! वाडा आणि घर याबाहेरचें जग याला ठाअूक नाही. ' केसरी ही पुण्याच्या पर्वतीसारखी अेक पेठ आहे ' असें सांगण्याअितकें याचें ज्ञान अफाट !

राणीसाहेबांबद्दल ज्याअर्थी दाजीने कांही लिहिलें नव्हतें त्या-अर्थी त्यांच्याशीं त्याचा अजून फारसा संबंध आला नसावा. त्याच्या अेकंदर लिहिण्यावरून मीं अनुमान काढलें, की दाजी त्या अनोळखी वातावरणांत गांगरला नाही. याचें मला अेक परीने समाधान वाटलें.

आणि पुढच्या महिन्यांत आलेल्या त्याच्या पत्रावरून त्याच्या-बद्दल मला वाटणारी काळजी अेक प्रकारें दूर झाली व अेक प्रकारें वाढलीहि. "रीडर म्हणून श्रीमंतांनी जरी मला खास आपल्या तैना-तींत नेमलें असलें, तरी त्यांना कांही वाचून दाखवण्याचा योग अजून अेकदाहि आला नाही. तथापि स्वतः रीडर राहण्याचें काम मीं चांगलें चालविलें आहे. माझा बहुतेक काळ – मामासाहेबांसारख्या राजशालकाच्या खेळखंडोबामधून अुरेल तितका – मी वाचनांतच घालवितों. येथील ग्रंथसंग्रह चांगला मातब्बर आहे आणि त्यांतील बरेच ग्रंथ अद्यापपर्यंत पानेंहि न फाडलेल्या स्थितींत मला आढळले! अेवढें ज्ञानभांडार हाताशीं असतांना व मुबलक निष्काळजी आयुष्य कंठण्याची शक्यता असतांना मामासाहेबांसारख्या गृहस्थाने पांचटपणांतच समाधान मानावें हें आश्चर्य नव्हे काय? दिवसभर सुपारी चघळावी, विड्या फुंकाव्या आणि आचारी, पाणके किंवा हुजरे, कुणबिणी यांच्या मैफली भरवून चकाट्या पिटाव्या हा मामासाहेबांचा व्यवसाय! मला हा प्रकार किळसवाणा वाटतो; पण राणीसाहेब आपल्या बंधुराजांचें कौतुक करीत म्हणतात—

"'आमचे दादा म्हणजे देवमाणूस. मोठेपणाचा दिमाख त्यांच्या अंगीं मुळ्ळी मुळ्ळी नाही! साऱ्यांच्याबरोबर कसे बरोबरीनं वागतात अगदी!' बहिणीच्या या शिफारशीने मामासाहेब अधिकच हुरळतात आणि हुजऱ्याच्या गळ्यांत हात घालून सलगी करण्यापर्यंत त्यांची मजल जाते!

"मी हल्ली अिंडियन पिनल कोड वाचीत आहें. नुकतेंच क्रिमि-नल प्रोसीजर कोड वाचून काढलें. मी वकिलीचा अभ्यास करतों आहे असें मात्र समजूं नका हो. कायद्याची ओळख मी येवढ्यासाठीच करून

घेत आहें, की मला सेकंड क्लास मॅजिस्ट्रेटचे अधिकार चारदोन दिवसांत मिळावयाचे आहेत आणि जर कदाचित् माझ्यापुढे अेखादा कज्जा आलाच, तर माझी तिरपीट अुडूं नये."

या बातमीने मला अेकदम हसूं आलें. मला हसतांना पाहून तिने म्हटलें, "यांत अितकं नव्वल कसलं वाटतंय् अिकडं? रीडर म्हणून नेमलेल्या माणसाला न्यायाधीश नेमलं यांत कांहीच आश्चर्य नाही. पुस्तकांच्या मदतीनं तरी तो काम करील आपलं. पण आमच्या सुंद्रीचा नवरा आहे ना त्या संस्थानांत? तो आहे गवअी. त्याला म्हणे 'अोरशीर' नेमलंय् तिथल्या महाराजांनी!"

सुंद्रीच्या नवऱ्याचें हें अुदाहरण अैकून दाजीच्या मॅजिस्ट्रेटीचें मला मुळीच आश्चर्य वाटेनासें झालें. मात्र दाजी न्यायाधीशाची ही भूमिका कशी वठवतो त्याबद्दल मला थोडी चुटपूट लागून राहिली.

पण मॅजिस्ट्रेटी खुर्चीवर बसून अपराध्याला चतुर्भुज करण्यापूर्वी स्वतः चतुर्भुज होण्याची दाजीवर पाळी आली! संस्थानी वातावरणांत केव्हा काय प्रकार घडतील याचा नेम नाही हीच गोष्ट खरी! संस्थानच्या राजघराण्याची कृपामुद्रा प्रसंगीं कशी अपकारक ठरते याचा या अनपेक्षित प्रकारावरून मला चांगला अनुभव आला.

स्त्रीसौंदर्याबद्दल पुरुषांच्या दृष्टींत आणि स्त्रीच्या दृष्टींत स्वाभाविकच तफावत असते. ज्या स्त्रीकडे पाहून पुरुष नाक मुरडतील तिचीच 'आहे आपली दहा जणींतली' अशी शिफारस स्त्री करील. असें असूनसुद्धा दाजीने पाठविलेल्या फोटोंतील मुलीबद्दल माझ्याअितकीच तिनेहि नापसंती प्रदर्शित केली. आणि 'कुरूपतेची शंभर नंबरी प्रतिमा' असें म्हणून तिने तो फोटो दूर भिरकावला.

दाजीने तो फोटो आमच्याकडे कां पाठविला याबद्दल आम्ही सुचतील ते तर्क करीत होतों. 'कुठल्यातरी सिनेमा कंपनीने शूर्पणखेच्या कामासाठी ही मुलगी पैदा केलेली असेल' असें मीं म्हटलें, तर 'निग्रो मुलीला मराठी साडीचोळी नेसवून ही छबी काढलेली असेल' असें मत तिने प्रदर्शित केलें; व केवळ नवलाअी म्हणून दाजीने

ती आपल्याकडे पाठवलेली असेल असें तिला वाटलें. अेक ना दोन, शेकडो तर्कवितर्कांचा गोमगाला आम्हां अुभयतांत माजून राहिला. पण दुसऱ्याच दिवशीं दाजीचें अवचित आगमन झाल्यामुळे आमच्या सर्व कल्पना फोल ठरल्या आणि नव्याच अेका चिंतेनें आमच्या मनांत ठाणें दिलें!

आपल्यासाठी आलेल्या अेका अुपवर मुलीचा फोटो दाजीनें आमच्या अवलोकनार्थ किंवा पसंतीसाठी आगाअू पाठविला होता! हें कळतांच ती अुद्‌गारली,

"अिश्श! डोकंबिकं फिरलं की काय भाअूजींचं!"

"आश्चर्य वाटतं मलासुद्धा! फुकट मिळाली तरी मोलकरीण म्हणूनसुद्धा जिला मी घरीं घ्यायचा नाही, असं हें ध्यान झिडकारून टाकायला आमच्या मताची वाट तरी कसली पाहतोस तूं?"

"पण माझं म्हणणं तरी आधी अैकून घ्या..." अशी सुरवात करून आमच्या होय-नकोची वाटहि न पाहतां दाजी सांगूं लागला,

"श्रीमंतांच्या अेका आश्रित घराण्यापैकी ही अेक पोरकी मुलगी असून अगदी लहानपणापासून राणीसाहेबांनीच तिचा प्रतिपाळ केला आहे. राजवाड्यांत लहानाची मोठी झाल्यामुळं शिक्षण तर नाहीच, पण वाचाळपणा, थिल्लरपणा आणि अैदीपणा अित्यादि तिचे दुर्गुण माझ्या नजरेस आले आहेत. तरीपण ही मुलगी– हिला राणीसाहेब बगडी म्हणतात– त्यांच्या पूर्ण मर्जीतली असून त्या आता तिला अुजवून टाकण्याच्या प्रयत्नांत आहेत.

"गेलीं दोन वर्षे शंभर तरी ठिकाणीं बगडीचं प्रदर्शन झालं. पण 'मागाहून कळवूं' म्हणून सांगणाऱ्या या शंभरांनी आतापर्यंत कांहीच कळवलं नाही असं मला कळलं आहे. आता मात्र राणीसाहेब अगदी जिकिरीस आल्यासारख्या दिसतात. कारण 'बगडीला जन्मभर दरसाल दोनशेची तैनात आणि तिच्या नवऱ्याला पांच हजारांचा अेक मळा देअीन' असं त्या परवा बोलल्याचं मला अेका खास तैनातींतल्या अिसमानं सांगितलं.

" मी अेक अुपवधू आणि विवाहेच्छु तरुण आहे, असं मीं होअून राणीसाहेबांना कधींच सांगितलं नाही, तरीहि माझे ते गुण त्यांच्या कानावर गेले आणि त्यांनी खाजगी कारभाऱ्यामार्फत मला बगडीच्या पाणिग्रहणाबद्दल विचारलं. अेवढंच नव्हे, तर मी रोज पाहात असलेल्या बगडीला वधू म्हणून मला रीतसर दाखवण्याचा विधीहि नुकताच अुरकून घेण्यांत आला. मींच पत्करल्यास मघाशी सांगितलेली देणगी तर राणीसाहेब देतीलच, पण आणखीहि कांही हजारांचा हुंडा त्या मला देतील. आणि या त्यांच्या मेहेरनजरेचा परिणाम माझ्या नोकरीच्या कायमपणांत आणि कायमच्या बढतींत होत राहील, असं खाजगी कारभाऱ्यांनी मला आश्वासन दिलं आहे. मात्र हजारीं शंभराप्रमाणं आपल्या कमिशनची आपण आकारणी करूं, असंहि त्यांनी बजावलं आहे.

" मग मी काय करूं ? माझं मत विचाराल, तर मी या मागणीस होकार द्यावा अशा विचाराचा आहें. तुमचा व सौ. वैनींचा गैरसमज होअूं नये म्हणून मीं आधींच सांगतों, कीं पैशाच्या किंवा नोकरीच्या लोभानं मी ही घोरपड गळ्यांत घेत नाही. अुलट, बायकोच्या किंवा माझ्या नांवानं मंजूर होणारी कोणतीहि देणगी मी आभारपूर्वक नाकारणार आहें. "

" घोरपड गळ्यांत बांधून घेणारा लक्ष्मीला सहजच लाथाडील. " मीं म्हटलें.

" पण या संबंधाला अनुमति देअून मला दोन गोष्टी दाखवून द्यायच्या आहेत. तरुणांची दृष्टि केवळ रूपनिष्ठ किंवा द्रव्यनिष्ठ कां असावी ? कातडीचा गौरवर्ण आणि अवयवांचा रेखीवपणा अेखाद्या मुलीच्या वांट्यास विधात्यानं घातला नाही, तर त्यांत तिचा काय दोष ? आणि ज्यांत तिचा दोष नाही, त्याबद्दल तिचा अव्हेर कां व्हावा ? माझ्या मतानं ही वृत्ति समर्थनीय नाही आणि हें माझं मत समाजाला पटविण्यासाठी मी त्यास कृतीनं खंबीरी आणूं अिच्छितों.

" बगडीच्या अंगांत गुण नाहीत आणि दोष आहेत; पण ही गोष्टहि मला अेक प्रकारें अुपकारकच वाटते. दोषांचं अुच्चाटन करून मीं माझ्या पत्नीच्या अंगीं गुणांची निर्मिति केली– आणि ती मी करीन अशी माझी खात्री आहे– तर माझं कौशल्य तर दिसून येअीलच, पण माझं वैशिष्ट्यहि प्रकट होअील. "

" कौशल्य आणि वैशिष्ट्य प्रकट करायला ही अेकच का गोष्ट आहे? बरं, पैसे कां नाकारायचे? " तिनें पृच्छा केली.

" मिळणाऱ्या देणग्या नाकारण्यांत ' विकत घेतलेला नवरा ' असा आक्षेप मजवर येअू नये हा तर माझा अुद्देश आहेच; पण दुसराहि अेक अंतस्थ हेतु आहे. तो म्हणजे लोभी खाजगी कारभाऱ्याला चुरमुरे चारण्याचा. तेल्यातांबोळ्यांचीं बिलंसुद्धा कमिशनशिवाय चुकतीं करायचीं नाहीत अितका याचा द्रव्यलोभ जबर आहे. मग मला हजारांनी मिळणाऱ्या देणगींत याची दृष्टि गेली तर नवल नाही. या खासगी कारभाऱ्याला जिभल्या चाटीत बसविण्यासाठी मींच पैसा घेत नाही! बैस म्हणावं लेकाला शंख करीत! "

कितीहि आवरलें तरी आमचें हसणें दाजीला दिसलेंच. तेव्हा तो म्हणाला,

" मीं माझं मत तुम्हांला सांगितलं. सर्व गोष्टींचा विचार करून तुम्ही आपलं मत स्पष्टपणे कळवा. तुमच्या अिच्छेबाहेर मी जाणार नाही. "

" अेवढं तरी भाग्य म्हणायचं! नाहीतर लग्नपत्रिकाच धाडली असतीस, तर काय करणार होतों आम्ही! "

" काय तरी बाअी भाअूजी तुमचं नवल! रविवर्म्याच्या तसबिरींतसुद्धा व्यंग काढणारे तुम्ही असली घूस पत्करायला तयार झालां! मग मी नेहमी म्हणते तें काय? शहाणेशहाणे म्हणवणारेच आचरटपणा करतात! "

" दाजीच्या बाबतींत तूं काय म्हणशील तें कबूल! " मीं म्हटलें.

" बरं, पण पुढं काय ? काय देणार अुत्तर ? " दाजीने विचारलें.

" प्रश्न आहे. "

" अिश्श ! यांत कसला प्रश्न ? "

" दाजीच्या भवितव्याचा ! बगडीचा स्वीकार जसा हानिकारक, तसाच तिचा धिक्कारहि त्रासदायक होणार झाला. त्यामुळं त्याच्यावर राणीसाहेबांची अितराजी होणार ! आणि राणीसाहेबांची अितराजी म्हणजे– "

" कोरडी खरूज. दिसायची नाही अन् आग थांबायची नाही ! " दाजी म्हणाला.

मिने कोटी केली, " खरूज कधीतरी बरी होअील; पण बगडीची महाव्याधि मरेपर्यंत सुटायची नाही मागची ! "

" मग ? स्पष्ट काय तें सांगा. माझ्या विचाराला संमत तरी व्हा, नाहीतर त्यांतून निसटण्याची युक्ति तरी सांगा. "

दाजीच्या या अधीर सवालाला मीं अुत्तर दिलें, " ताबडतोब जा, राजीनामा दे आणि गोंधळपुरांतून चंबूगबाळं अुचल. "

" अच्छा ! " दाजीने गंभीरपणाने संमति दिली.

★ ★ ★



# दाजी शीघ्रकवि कसा झाला?

अेके दिवशीं तिसऱ्या प्रहरीं दाजी आमच्याकडे आला. तो आला तेव्हा ती 'स्त्री' मासिकाचा ताजा अंक वाचीत होती व पहिल्याच पानावरील 'बालबोध' कवीच्या 'माझा संसार' या कवितेवर तिचें लक्ष खिळलें होतें. तें लक्ष आपल्याकडे वेधण्यासाठी दाजीने ललकारी दिली,
"काय चाललंय् वहिनीसाहेब?"

"केव्हा आलां भाअूजी?"

"तुम्ही वाचनात गर्क झालां होतां तेव्हा. पण वैनी, कोणत्या विषयानं पछाडलं अेवढं तुमच्या मनाला?"

"ही कविता वाचीत होतें मी. पण भाअूजी, हे 'बालबोध' म्हणजे कोण हो?"

"असेल कुणी मोडीचा भाअू!"

"चेष्टा नका करूं, भाअूजी. खरोखरच गोड विचारांचा गृहस्थ दिसतो तो."

"कशावरून देतां हें सर्टिफिकेट तुम्ही अनोळखी माणसाला?"

"माणसाचं मन त्याच्या लेखणींत अुमटत असतं. या कवितेंत–"

"कवितेंत! आलिकडच्या कवितेंत! वैनी, अलिकडल्या कवितेंत कवीचं मनच काय, पण शद्बांचा अर्थसुद्धा अुमटत नाही. अर्थशून्य आणि भावशून्य बडबड म्हणजे कविता, असा सिद्धान्त ठरला आहे आता."

अितक्यांत मी तेथे दाखल झालों आणि दाजीच्या काव्यविवेचनाला अेक समंजस श्रोता मिळाला. कविता म्हणजे काव्य नव्हे, देह म्हणजे जसें जिवाचें आवरण तशीच कवितेच्या स्वरूपाची शब्दरचना म्हणजे काव्याचें नुसतें आवरण होय. जिवाशिवाय देह जसा निकामी तशीच काव्याशिवाय कविताहि कुचकामी ठरते, असें दाजीचें म्हणणें होतें व तें मलाहि रास्त वाटलें.

कविता व काव्य यांतील फरक दाजीने दाखवला. आणि हा फरक लक्षांत न घेतां वृत्तबद्ध रचनेला– कवितेला– काव्य समजण्याचा मूर्खपणा शहाणे म्हणविणारे संपादकहि कसा करतात या मुद्द्यावर दाजीचें वक्तृत्व आलें. अुदाहरणादाखल त्याने पुढील श्लोक म्हणून दाखवला–

**आअीच्या नवऱ्यास बाप म्हणती**
**मामा तिच्या बंधुला**
**ओढे जाति नद्यांस आणि सगळ्या**
**जाती नद्या सिंधुला**
**गंगास्नान करावयास निघती**
**सद्विप्र ते बोडके**
**गायी आणि म्हशीसवेंच चरती**
**तीं वासरें रेडके.**

हा श्लोक अैकून ती आणि मी अितके हसलों, की आमच्या डोळ्यांत पाणी आलें. हशाचा वेग थोडा ओसरल्यावर ती म्हणाली, "तुम्ही अेखाद्याची टर करायला लागलां की भारीच करतां भावजी!"

"ही टर नव्हे, वैनी ! ही अगदी वस्तुस्थिति आहे. त्या 'चंद्रकोर' मासिकाच्या खास दिवाळी अंकांत पहिल्या पानावर कविता आहे ही!"

"आश्चर्य आहे म्हणायचं! संपादकाला भुरळ पाडणारा हा कविवर्य तरी कोण बुवा?" मीं विचारलें.

"'काव्यकोदंड' कवीची ही कविता आहे महाराज! आणि त्या कवितेचं नांव काय हें आहे का माहीत? – 'बिजेची चंद्रकोर'!"

"अरे पण, बाप, मामा, बोडके ब्राम्हण आणि वासरां-रेडकां-सकट गायीम्हशी यांचा या बिजेच्या चंद्रकोरेशीं संबंध तरी कसा जोडला या कविश्रेष्ठानं?"

"हीच तर महाराज कविरायाची मेख आहे! जें कोडं ब्रम्ह-देवाच्या बापालाहि अुलगडायचं नाही, तें काव्यकोदंडानं आपल्या सुणाटा-(सॉनेट)च्या शेवटच्या दोन ओळींत असं अुलगडलं आहे–

**अैशा गोष्टि सुरम्य नित्य घडती**
**लक्षावधी भूतलीं**
**पाहाया बघ चंद्रकोर गगनीं**
**ही लाडके पातली.**

आलं ना आता लक्षांत?"

हास्याचा दुसरा पूर हटल्यावर मीं विचारलें, "कविवर्यांनी ही कविता आपल्या प्रिय पत्नीला संबोधून लिहिली आहे वाटतं? 'लाडके' या शब्दावरून स्पष्टच होतंय् हें!"

"तुमचा तर्क कांही चुकीचा नाही. कुणालाहि असंच वाटेल. पण खरी गोष्ट अशी आहे, की कवीची ही कवितेंतली लाडकी काल्प-निक आहे. असलेल्या बायकोला अर्धचंद्र देअून नसलेल्या बायकोला हे चंद्रकोर दाखवीत आहेत!"

यानंतर काव्यकोदंडाबद्दल मिळवलेली माहिती दाजीने आम्हांला अैकविली व असा दुष्ट वृत्तीचा मनुष्य सात्विक भावनांची कविता कर-ण्याचा बेमुर्वतखोरपणा कसा करतो हें आम्हांस सोदाहरण दाखविलें.

यानंतर मला वाटलें, की दाजीचें काव्यविवेचन आता थांबेल आणि आम्ही परस्परांच्या सुखदुःखाच्या गोष्टी बोलूं. पण तें कुठलें व्हायला! आजचे कवि व त्यांचें काव्य यांवर ताशेरा अुडवायला त्याला आज विलक्षण अवसान चढलें होतें.

आधुनिक कवितेचा मी जिव्हाळ्याचा भोक्ता नसलों तरी चाहता खास आहे. कांही कवींचें कवितागायन मीं अैकलें आहे आणि तें मला आवडलेंहि आहे. ते कवि नामवंत आहेत हेंहि मला अैकून ठाअूक असल्याने दाजीने त्यांवर केलेली टीका मला आवडली नाही आणि मी म्हणालों–

" पण काय रे, त्या ' चंडोल ' कवींनासुद्धा तूं त्याच पंक्तीला बसवणार का ? "

" असं अेखादं नांव नका सांगूं. " दाजी मला आडवून म्हणाला, " मी अेकंदरींत बोलतों आहें. आजचे कवि म्हणजे कोण हें माहीत आहे तुम्हाला ? शाळा-कॉलेजांतील खुशालचेंडू विद्यार्थी, गावठी शाळेंतले दरिद्री मास्तर आणि रावसाहेबांच्या शिव्या खाणारे कारकून हे आजचे कवि ! कोणत्याहि प्रकास दिसणाऱ्या कॉलेज स्टूडंटचं नोटबूक अुघडून बघा. त्यांत आडव्या रेघेपुढील ' स ' ची कविता तुम्हाला हटकून दिसेल. मासिकं चाळून त्यांतले काव्यप्रदीप किंवा काव्यकोंदण निवडून काढा. ते शाळोपंत तरी असणार किंवा कुणी खर्डेघाशे तरी असणार. "

" अरे, पण कवि कोणीहि असला तरी कवितेच्या चांगुलपणाला का कमीपणा येअील ? "

" अलबत येअील. कवित्व हें येरागबाळाचं कामच नव्हे मुळी. कवीच्या विद्वत्तेवर, त्याच्या परिस्थितीवर आणि मनाच्या घडणीवर कवितेचा भारदस्तपणा अवलंबून असतो. थोडं मागं जाअून पाहा आणि मोरोपंती आर्या, वामनी श्लोक आणि तुकोबाचे अभंग अुत्कृष्ट कां, हा प्रश्न स्वतःला विचारा. पंतांच्या अंगीं भाषाप्रभुत्व होतं, वामनापाशी पांडित्य होतं आणि तुकोबांच्या अंतर्यामीं भक्तीचा जिव्हाळा होता. आजच्या कविवर्गाच्या ठिकाणीं यांपैकी काय आहे ? पांडित्य तर नाहीच आणि मनाची कोमल वृत्ति नाही. काव्यामध्ये कवीचा आत्मानुभव प्रतीत झाला तरच काव्याला जिवंतपणा येतो. पण आजच्या कविवर्गाला आत्मानुभवाच्या सपशेल विरुद्ध अशा

कविता लिहिण्याची दुष्ट खोड जडली आहे. त्या काव्यकोदंडाचंच अुदाहरण घ्या. त्या लेकानं आमटींत मीठ जास्त झाल्याबद्दल सौभाग्यवतीला माहेर दाखवलं आणि अिकडे लाडकीला बिजेची चंद्रकोर दाखवण्याचा रंगेलपणा करतो! आहे की नाही अक्कल? परवा आणखी अेक अुदाहरण पाहिलं मीं. त्या काव्यखंदक कवीच्या अुत्साहगीतांनी तुम्हांला अगदी वेड लावलंय्, नव्हे? त्या गीतांत चैतन्य, जोम, धडाडी, धारिष्ट, पराक्रम यांचे फवारे अुडतात म्हणून तुम्ही टिमकी वाजवतां त्याची. पण हेच पराक्रमी पठ्ठे सर्कशींतल्या वाघासिंहाच्या डरकाळया अैकून मूर्च्छित पडले आणि पुण्यापर्यंतचा प्रवासहि त्यांना सोबतीशिवाय करतां येत नाही, हें अैकलं आहेत का तुम्हीं?"

दाजी तावातावाने आपलें म्हणणें पुढे मांडीत होता आणि आम्ही दोघें मधूनमधून हसत होतों. त्याच्या म्हणण्यावर आम्हाला आक्षेप घेतां आले असते तर आम्हीं घेतले नसते असें नाही. पण खरें सांगावयाचें म्हणजे आम्हांला दाजीला निरुत्तर करण्यासारखें कांही आठवलेंच नाही! कांहीतरी बोलावयाचें म्हणून ती म्हणाली, "मग याला अुपाय काय, भाअूजी? खरा कवि हजारपांचशे वर्षांत अेखादाच निपजायचा. पण देवानं तसा कवि जन्माला घातला नाही, तोंपर्यंत आहेत त्या कवींवरच समाधान मानून घ्यायला नको का?"

"खासा न्याय आहे म्हणायचा!" दाजीचें व्याख्यान नवीन अवसानाने सुरू झालें. "गाय पाहिजे; पण ती मिळत नाही म्हणून शेळीवर समाधान मानायचं की काय? तें कांही नाही, वैनी! या समाजांतील कवींचा कोंडा पाखडून टाकलाच पाहिजे! माझ्या हातांत सत्ता असायला हवी होती. मग दाखवलं असतं तुम्हांला!"

"मग कवींना फाशींच दिलं असतंस तूं!"

"छट्! भलतंच कांहीतरीं! खडीसाखरेनं मरणाऱ्याला अफू कशाला द्यायची?" असें म्हणत दाजीने खिशांतून अेक कागद काढून माझ्या हातीं दिला व म्हटलें, "मराठी वाङ्मय प्रासून टाकणारी

ही आधुनिक कवितेची व्याधि घालवण्यासाठी कवींचा बंदोबस्त कसा करावा याचाच विचार मीं आजच्या सफरींत केला, व हा बंदोबस्त केवळ कायद्याच्या धाकानंच होणं शक्य आहे असं मला दिसून आलं. साहजिकच हा कायदा कसा असावा याचा आराखडा करण्याची कल्पना आली आणि मीं हा ड्राफ्ट तयार केला. पाहा वाचून आणि सांगा तुमचं त्याबद्दलचं मत."

दाजीचा मसुदा मीं वाचून पाहिला.

श्रीयुत केळकर, कोल्हटकर, फडके वगैरे नामांकित भाषापंडितांची कमिटी सरकारने नेमावी. महाराष्ट्रांतील मोठमोठ्या शहरांत कमिटीचे सभासद असावेत व त्या भागांतील नवतर कवींनी आपली पैदास त्यांच्याकडे पाठवावी. अशा दोन तरी सभासदांच्या प्रशस्तिपत्राशिवाय कोणाहि कवीने कविता प्रसिद्धीस पाठवूं नये व प्रकाशकांनी ती प्रसिद्ध करूं नये. बिगरपरवाना काव्यप्रकाशनाबद्दल दंड, कैद किंवा दोन्हीहि अशी शिक्षा ठेवावी.

या कमिटीच्या सभासदांस (नव्या कविता वाचून डोकें फिरल्यास) त्यांच्या योग्यतेप्रमाणे सरकारने नुकसानभरपाई द्यावी.

कविताप्रकाशनास खीळ लागल्यामुळे कवींचा खट्याळपणा थांबेल असें नाही. ते खासगी कविमंडळें स्थापतील आणि उत्सवसमारंभांतून किंवा सभासंमेलनांतून काव्यगायनाचा धूमधडाका उडवून देतील. एवढ्यासाठी 'सर्टिफाइड' कवितांचेंच गायन केलें पाहिजे व ज्याच्या निदान पांच तरी कविता छापल्या गेल्या असतील अशा मनुष्यासच कविमंडळ स्थापण्याचा किंवा त्याचे सभासद होण्याचा अधिकार ठेवला पाहिजे. याविरुद्ध वर्तन करणारांसहि दंड-कैदेची शिक्षा देण्यांत यावी.

विवाहित असून बायकोला किंवा नवऱ्याला न सोडलेल्या पुरुषाला किंवा स्त्रीला प्रेमाच्या कविता करतां येतील.

पुरुषकवीने विधवेचे हाल रंगवूं नयेत किंवा स्त्रीकवयित्रीने विधुरावस्थेतील मनःसंतापावर कविता लिहितां कामा नये.

कवितेंतील भाषा व्याकरणशुद्ध असलीच पाहिजे. व्याकरणाच्या दरअेक चुकीबद्दल किमान अेक आण्यापासून कमाल अेक रुपयापर्यंत दंड करण्यांत यावा.

दाजीच्या मसुद्यांतील वरील सूचना जरी मला सर्वस्वीं पटल्या नाहीत तरी त्यांतील त्याच्या कल्पकतेची चमक पाहून मी थक्कच झालों. तिला मात्र दाजीच्या या अुपद्व्यापाचा थोडा राग आला. तिला कवितांची आवड ( गोड गळ्यावर म्हणण्यापुरती ) होती. आणि दाजीच्या मसुद्याप्रमाणे खरोखरीच कायदा पास झाला, तर आपल्या गळ्याला नव्यानव्या गाण्यांचा खुराक मिळायचा नाही, अशी तिला भीति पडली की काय कोण जाणे! ती म्हणाली, "तुम्ही जें कवींना अितकं हें करतां भाअुजी, तें तुमच्या अंगांत तशी कर्तबगारी तरी असायची होती! स्वतः चांगली कविता करायची धमक असून जर तुम्हीं म्हटलं असतंत तर मीं अैकलं असतं मुकाट्यानं."

दाजीसारख्या मानी स्वभावाला हें अेक प्रकारचें आव्हानच होतें! तिचें तोंड बंद करण्यापुरतें तरी दाजी काव्य करून दाखवणार अशी मला धास्ती पडली! पण अितक्यांत मला व्याख्यानाला बोलावण्यासाठी हरिभाअू आल्यामुळे चालू विषयाची दिशा बदलली.

शारदा विद्यालयांत विद्वद्वर्य कान्तारमणशास्त्री यांची व्याख्यान-माला चालू होती. शास्त्रीबुवांच्या वक्तृत्वाने आमच्या ग्रामस्थांना वेड लावलें होतें नुसतें. त्यांची विद्वत्ता जशी जबर, तशीच वाणी अस्खलित आणि प्रभावी. शास्त्रीबुवा जुन्याचे अभिमानी असूनहि नव्याचे निंदक नव्हते. देशकालवर्तमानाप्रमाणे नवविचारानुसार वागण्यांत हानि नाही असें ते निःसंदिग्धपणें सांगत. म्हणूनच श्रोतृसमुदायांत सर्व वयाच्या स्त्री-पुरुषांचा भरणा असे.

मीं होअून दाजीला व्याख्यानाला नेलें. 'आर्यसंकृतीचा आजचा ऱ्हास' या विषयावर व्याख्यान ठेवलेलें होतें व तें झालेंहि सर्वोत्कृष्ट. दाजी तर नागासारखा डुलत होता. त्याच्या बुद्धिजीवि मनाला असें चमचमीत खाद्य क्वचितच मिळालें असेल.

विवेचनाच्या ओघांत आम्ही हल्ली कसे श्रद्धाहीन व कर्तृत्वशून्य झालों, सांपत्तिक दुर्दशा, शरीरसामर्थ्याचा नाश व बुद्धीचें जडत्व आपल्या नशिबीं कसें आलें, हें व्याख्यात्यांनी सप्रमाण दाखविलें. अुदाहरणादाखल ते म्हणाले, "आपल्या बौद्धिक अधःपाताचें दुसरें प्रत्यन्तर पाहायचें असेल तर भोजराजाचा काल आणि आजचा काल यांची तुलना करा. भोजराजाच्या दरबारांत शेकडो अेकपाठी पंडित होते आणि बसल्या बैठकीस कवित्व रचणारे शीघ्रकवि होते. आज यांपैकी अेक तरी अेकपाठी आणि शीघ्रकवि पाहायला मिळेल काय ?" असें म्हणून अनुष्टुप वृत्तांतला अेक भारतामधील संस्कृत श्लोक शास्त्रीबुवांनी म्हणून दाखवला व पुन्हा विचारलें,

"हा श्लोक जशाचा तसा म्हणून दाखवणारा कोणी अेकपाठी या सभेंत आहे काय ?"

दाजी ताडकन् अुठला आणि त्याने शास्त्रीबुवांचा श्लोक जशाच्या तसा, अस्खलित आणि खड्या स्वरांत म्हणून दाखविला !

टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला ! साऱ्या श्रोतृसमाजाचे आणि खुद्द विद्वद्वर्य कांतारमणशास्त्र्यांचे डोळे दाजीकडे वळले. सर्वांच्या आदरास पात्र झालेला दाजी हा माझा मित्र आणि माझ्याबरोबरच तो अिथे आला, येवढ्या नुसत्या कल्पनेनेहि मला मूठभर मांस आल्यासारखें झालें.

"शाबास ! या आपल्या धारणाशक्तीबद्दल मी आपलं अभिनंदन करतों. आमच्या बुद्धिसामर्थ्याचा सर्वस्वीं लोप झाला नाही हें आपण प्रत्यक्ष दाखवलं ! आपल्या अेकपाठीपणाप्रमाणं शीघ्रकवित्वाचं माझं विधान मला कोणी मागं घ्यायला लावील तर मला दुप्पट आनंद वाटेल."

शास्त्रीबुवांच्या मुखांतून दाजीला दुसरें आव्हान मिळालें. योगायोग तरी काय विलक्षण ! ज्या गोष्टीबद्दल तिने त्याला घरीं सवाल टाकला, त्याच गोष्टीबद्दल आणि तसाच सवाल या सभास्थानीं दाजीने अैकला.



दाजी ताडकन अुठला आणि त्याने शास्त्रीबुवांचा श्लोक खड्या स्वरांत म्हणून टाकला ! (पान ४९)

" मी तेंहि करूं शकेन. " दाजी पुन्हा गर्जला !

टाळ्यांचा दुसरा कडकडाट झाला ! माझी छाती मात्र धडधडूं लागली.

" मग होअूं दे सुरवात. " शास्त्रीबुवा म्हणाले.

" पण विषय ? "

" विषय आताचाच. " शास्त्रीबुवांनी अुत्तर दिलें.

गवयाप्रमाणे अेकवार घसा साफ करून व श्रोतृवर्गाकडे चौफेर दृष्टि फिरवून दाजीने आपल्या कवित्वगायनाला प्रारंभ केला–

**पवित्र मंदिर सरस्वतीचें**
**सोहाळा तेथे–**
**भक्तगणांनी तिच्या मांडिला**
**ज्ञानवर्धनातें ॥**
**विद्वानांच्या वाक्‌गंगेचा**
**जिथे ओघ चाले**
**तेथे मजसम अज्ञ नराला**
**आज मोल आलें ॥**

या चार ओळी पुऱ्या होतांच टाळ्यांची पुन्हा फैर झडली. दाजी गांगरला नाही की अडखळला नाही. जणू पाठ केलेल्या कविताच तो म्हणून दाखवीत होता ! खणखणीत आणि स्पष्ट अुच्चार व अर्थानुरोधानें आवाज चढअुतार करण्याची त्याची खुबी श्रोतृवर्गावर कल्पनातीत छाप पाडीत होती. त्याच्या पंधरासोळा ओळी होअीपर्यंत दोनतीनदा तरी टाळ्या झडल्या. दाजीसारखें झाकलें माणिक हाताशीं असतांना त्याचे खरें तेज मला आजपर्यंत कसें दिसलें नाही याचीच मला मनांत शरम वाटूं लागली. अितक्यांत दाजीचें पुढील कवित्व माझ्या कानांत घुसलें–

असेंच चालो अखंड येथे
ज्ञानसत्र नित्य
सरस्वती ती अमर, अमर तें
ज्ञान हेंच सत्य ॥
ज्ञानयज्ञ हा असाच चालो
सालेंच्या सालें
अध्यक्षासह श्रोतेवक्ते
मरून जरि गेले ॥

" अहो, खाली बसा ! " पहिली आरोळी.

" धक्के मारून हाकलून लावा लेकाला ! " दुसरी गर्जना.

दाजीने डोळे वटारले, अस्तन्या वर सारल्या.

पुढे अेकच गोंगाट. अध्यक्ष व व्याख्याते सभास्थान सोडून जातात.

दाजीला धडपणें सोडवून घरीं आणतांना महापुरांतून पोहत असल्याप्रमाणे मला वाटत होते.

तो प्रसंग मी जन्मभर विसरणार नाही.

★ ★ ★



# दाजीने पृथ्वीच्या पायपिटीने काय मिळविलें ?

शीघ्र कवित्व दाजीच्या चांगलेंच अंगशीं आलें ! धक्काबुक्कीने ठेचून निघालेल्या अंगाची शेकभाज आठदहा दिवस केल्यावर त्याला बरें वाटूं लागलें. झालेल्या प्रकाराबद्दल ती दाजीची चेष्टा करी आणि मीहि मधूनमधून तिला साथ करी. पण आमच्या थट्टेने दाजी कधी चिडत नसे. अुलट तोहि हसून म्हणे,

" देहदंडावांचून ज्ञानाप्राप्ति नाही. "

आजहि तो तसें म्हणाला. तेव्हा तिने विचारलें, " पण भाअूजी, देहदंडानं कोणचं ज्ञान मिळवलंत तुम्हीं ? " .

" मूर्खापुढं पांडित्य दाखवूं नये, हा धडा मी शिकलों. " दाजीने ताडकन् अुत्तर दिलें.

" लोकांना ' मूर्ख ' म्हणून तुम्ही निसटूं पाहातां खरे, पण मी कांही तें कबूल करायची नाही. म्हणतात ना ' शुभ बोल रे नाऱ्या ' तर म्हणे ' मांडवाला लागली आग ! ' तसं झालं तुमचं भाअूजी. आणि अशा शुभबोल्या नाऱ्याच्या श्रीमुखांत जर अेखाद्यानं लगावली, तर त्याला मूर्ख म्हणाल का तुम्हीं ? "

हुज्जत घालण्यांत दाजी पटाअीत खरा, पण तिच्या या सवालाला त्यास नीटसें अुत्तर देतां येअीना. या त्याच्या अगतिक अवस्थेचा पुरेपूर फायदा घेण्यासाठी ती म्हणाली,

"या देहदंडानं ज्ञान मिळवण्यापेक्षा गावकऱ्यांच्याकडून कायमचा अनादर मात्र मिळवला तुम्हीं. या गावांत तरी जो तो तुमच्याकडे अुपहासानंच पाहाणार यापुढं."

"पाहूं देत. चारदोन दिवस अनादरानं पाहूं देत." दाजी कडाडला. "पण मी तुम्हाला बजावून ठेवतों वैनी, आज माझ्याकडं अुपहासानं पाहणारे हे तुमचे गावकरी अेके दिवशीं या गव्हूची पालखींतून मिरवणूक काढतील. आज माझा अपमान होत असला तरी तो मला अुपकारकच होणार आहे. अपमानाच्या पार्श्वभूमीशिवाय सन्मानाला अुठाव येत नाही."

"तूं पार्श्वभूमि तर सुंदर तयार केली आहेस!" मीं खोचक स्वरांत म्हटलें. "आता सन्माननीय चित्र तूं कसं रंगविणार आहेस याची माहिती तरी सांग?"

"छट्! कर्ते पुरुष बोलून दाखवीत नसतात. शिवाय तुमच्या गावकऱ्यांकडून जसा मला सन्मान करून घ्यायचा आहे, तशीच तुम्हां दोघांना चकित करून टाकण्याचीहि माझी मनीषा आहे. आधींच वाच्यता केली तर माझी मनीषा विफल होअील."

दाजीच्या या अुत्तराने समाधान वाटण्याअैवजी मला निराळी चुटपूटच लागून राहिली. कारण त्याचे अुद्देश आणि कार्यपद्धति कांहीतरी विलक्षण असायची आणि कांहीतरी करायला जाअून तो अेखादें घोंगडें गळ्यांत घेअून यायचा, हें माझ्या अनेकदा प्रत्ययास आलें होतें. म्हणून त्याची ही नवी मनीषा काय आहे, हें समजून घेअून त्याचें कांही चुकत असल्यास त्यास वेळींच सावध करावें असा अेक विचार माझ्या मनांत आला.

पण हें जुळावें कसें? अेकदा 'नाही' म्हटल्यावर दाजी आपलें मनोगत कुणालाहि सांगायचा नाही, हा त्याच्या स्वभावांतला हट्टीपणा मला माहीत होता. आणि मीं आग्रहाने विचारलेंच, तर त्याचें तोंड अुघडण्याअैवजी त्यास कायमची खीळ पडेल, अशी मला भीति वाटत होती. स्वस्थ बसवत नव्हतें आणि कांही करतांहि येत नव्हतें अशी माझी कुचंबणा चालू होती.

पण लवकरच दाजीने माझी मुक्तता केली. तो नेहमी आमच्या आधी अुठायचा. पण आज आमचा चहा तयार झाला तरी त्याची कांही हालचाल दिसेना ! त्याला अुठवून आणण्यासाठी मी त्याच्या खोलींत गेलों. बिछाना मोकळा आणि खुंटीला कोट-टोपीहि नाही ! लवकर अुठून हा गेला कुठे, या बुचकळयांत पडून मीं अिकडेतिकडे पाहिलें तों माझी नजर त्याच्या बिछान्यावरील अेका कागदाच्या कपट्याकडे गेली.

त्यावर दाजीने मलाच अुद्देशून लिहिलें होतें—

"मी आकस्मिक अदृश्य झालेला पाहून तुम्हां अुभयतांना आश्चर्य वाटेल. पण मी कुठे आणि कां गेलों हें तुम्हाला आता सांगू अिच्छित नाही. पुढेमागे आपोआप कळेल. माझी काळजी करूं नका. शक्य तर मला विसरून जाण्याचा प्रयत्न करा, म्हणजे माझ्याविषयी भलेंबुरें कांही कळलें तरी वाअीट वाटावयास नको. प्रणाम !"

दाजीचा आणखी अेक विक्षिप्तपणा आपल्या अनुभवास येणार अशी खूणगाठ बांधून मी स्वयंपाकघरांत गेलों आणि कपटा तिच्या-पुढे टाकून मीं आपला पेला अुचलला. माझें चहापान संपलें, तरी ती तें पत्र वाचीतच होती. तिने तें निदान पांचसातदा तरी वाचलें असेल. शेवटीं मी अुठलेला पाहून तिने केविलवाण्या नजरेने माझ्या-कडे वळून म्हटलें, "आता काय बरं करायचं ?"

"निवत चाललेला चहा अगोदर प्यायचा." मी म्हणालों.

पण चहा तिला आज गोड लागेना. अेकदोन घुटके आणि तेहि आळेबळेंच तिने घेतले असतील. तिचें हळवें मन खरोखर बावरलें होतें आणि स्नेहामुळे पापशंकी झालें होतें. चिठींत लिहिल्या-प्रमाणे दाजीचें खरेंच कांहीतरी भलेंबुरें होणार आणि त्याची पुन्हा या जन्मीं भेटहि होणार नाही, अशी तिची ठाम समजूत झाली होती. माझा हा कयास पडताळून पाहण्यासाठी मीं विचारलें, "तुला हें दाजीचं लिहिणं खरं वाटतं ? तूं तरी मला मोठी हीच दिसतेस !"

माझा हा शेरा तिला रुचला नाही. तिला माझा राग आला हें तिच्या मानेच्या झटक्यावरुन दिसलें. आणि तिच्या गहिवरलेल्या स्वरावरुन आणि डबडबलेल्या डोळ्यांवरुन तिच्या अंतर्यामीं दुःख होत असल्याबद्दल माझी खात्री होऊन चुकली. पदराने डोळे पुशीत आणि आवंढे गिळीत ती म्हणाली, "पुरुषांचीं मनंच घट्ट! पाळलेलं कुत्रं हरवलं तरी जीव तुटतो अेकेकाचा. पण पाठच्या भावासारखा मित्र नाहीसा झाला तरी ढिम् नाही मनाला! मेलीं हीं मनं की सोंगं?"

मी कांहीच बोललों नाही. मोठ्याने हसलों मात्र.

आणि याचा परिणाम व्हायचा तोच झाला. ती चिडक्या स्वरांत म्हणाली, "आता हसतां आहांत, पण ते भाअूजी आहेत हें लक्षांत ठेवा. फौजदारांच्या घोड्यासारखं ते कांहीतरी करतील आणि मग—"

तिने ही आठवण करुन देतांच मी मनांत दचकलों. पण त्या आठवणीने मला मौजहि वाटल्यावांचून राहिली नाही. 'फौजदारांचें घोडें आणि दाजी' हें प्रकरण झालेंच तसें मजेशीर! ओघाला आलें म्हणून मी तें सांगून टाकतों.

आमच्या शेजारींच फौजदारसाहेब राहतात. ते आमच्या वयाचे तर आहेतच, पण मंडळींतलेहि आहेत. पोलीसखात्याची गुर्मी किंवा हिरवटपणा त्यांच्यापाशी नाही, म्हणून पोलिस अधिकाऱ्यांच्या वांटणीस येणारा लोकांचा धिःकारहि त्यांच्या वांटणीस येत नाही. अुलट ते सर्वांना हवेहवेसे वाटतात. थट्टा करण्यांत आणि करुन घेण्यांतहि गृहस्थ खंबीर असल्याने ते असल्यावर मैफल चांगली रंगते. चोर, दरोडेखोर आणि संभावित सोदे अशा लोकांचे पोलिशी अनुभव त्यांच्या तोंडून अैकतांना तर देहभान विसरायला होतें.

परवा अेका चोराचा पाठलाग आपण कसा शिताफीने केला आणि आपल्या खोडकर घोड्याने अैन वेळीं गोता दिला नसता तर

सांगत होते. आपली सारी धडपड त्या नाठाळ तट्टाच्या पायीं कशी वाया गेली याबद्दल ते खूपच हळहळले.

"अहो, पण आपलं घोडं आपल्या हुकमतींत तुम्हाला कां ठेवतां येअू नये ?" दाजी मधेंच अुखडला !

"अरे भाअी ! माझं घोडं तसं आहेच अिरसाल." फौजदार म्हणाले.

"घोडं अिरसाल असलं तर मनुष्य सात अिरसाल आहे !" दाजीने अुत्तर दिलें.

"हें पाहा, घोड्याच्या गोष्टी घोडेवाल्यांनीच बोलाव्या. आहे का संस्कार कधी घोड्यांवर बसण्याचा तुम्हाला ? अजून लग्नहि झालं नाही वरातीला तरी घोड्यावर बसलां असाल म्हणावं तर !"

"संस्कार असो किंवा नसो; पण घोडं हें माणसापेक्षा जास्त नाहीं हें मी खात्रीनं म्हणूं शकतों. घोडं म्हणजे चालती घडवंची, यापेक्षा मी त्याला कांही किंमत देत नाहीं. ज्याला घडवंचीवर बसतां येअील त्याला घोड्यावरहि बसतां आलंच पाहिजे."

दाजीचा हा युक्तिवाद मंडळींना पटण्याजोगा नव्हता; पण त्यामुळे हशा मात्र खूप पिकला. पूर्वपक्ष करणारे फौजदारसाहेबहि दाजीला अुत्तर देण्याच्या भानगडींत न पडतां हसूं लागले व कोपरापासून हात जोडून म्हणाले, "तुमचं पांडित्य तुम्हाला लखलाभ ! पण मेहेरबानी करा आणि अेखाद्या चालत्या घडवंचीवर स्वतः बसूं नका; नाहीतर पंचनाम्याची पाळी यायची !"

त्या वेळीं दाजी कांही बोलला नाहीं; पण फौजदारसाहेबांचा हा टोमणा प्रत्यक्ष कृतीने परत फेकण्याचा त्याने निश्चय केला. आणि दुसऱ्याच दिवशीं साहेब ऑफिसांत गेल्याची संधि साधून त्याने त्यांचें नाठाळ घोडें जीन वगैरे जाम्यानिम्यासह ठाणावरून बाहेर काढलें. वेशीबाहेर पडेपर्यंत त्याने तें हातींच चालवलें आणि मग मात्र दाजीची स्वारी त्या चालत्या घडवंचीवर आरूढ झाली.

घोडें हें जनावर मोठें चाणाक्ष असतें. तें स्वाराची मांड तात्काळ ओळखतें असें म्हणतात. लेचापेचा स्वार आपल्यावर चढलेला आहे अशी शंका आल्यास तें त्याला खाली आणल्याशिवाय राहावयाचें नाही, ही आपल्या घोड्याची खोड फौजदारांनी स्वतःच सांगितली होती. असें असूनहि दाजीसारख्या अनोळखा माणसाला पाठीवर घेऊन तें अर्धा मैलपर्यंत बिनबोभाट गेलें. त्याला दौडत सोडण्याचें साहस दाजीने केलें नाही की घोड्यानेच आपली चाल बदलली नाही, हें सांगतां येणें कठीण आहे.

घोड्याच्या या साळसूदपणाने दाजी मनांतून अगदी खुशालला. आपलें हें अश्वारोहण पाहतांच फौजदारांचें तोंड चिमणीअेवढें होअील व त्यांच्या घोड्यासंबंधीच्या फौजदारी बाताहि कायमच्या बंद पडतील असे विचार दाजीच्या मनोभूमीवरून सरकूं लागले. पण काय चमत्कार झाला कोणास ठाअूक ! 'अबाअुट टर्न' म्हणतांच फलटणींतल्या शिपायाने जशी गिरकी घ्यावी, तशीच गिरकी त्या तट्टाने घेतली आणि आल्या रस्त्यावरूनच तें चौक सुटलें. घोड्याच्या अवचित गिरकीने आधीच घसरणीस लागलेला दाजी त्या घोडदौडीने अधिकाधिक कलंडूं लागला आणि अेकदोन मिनिटांतच त्याची पाठीवरील मांड पोटा-पर्यंत ओघळली.

कसें तें काय की, पण दाजी घोड्याच्या अंगाला चिकटून मात्र होता ! घोडें अुधळलें आहे हें त्याला कळलें, पण त्याच्या टापांखाली अेकदोन पोरें आणि वासरें तुडवलीं गेलीं हें त्याला दिसलें नाही. भीतीने त्याच्या अंगाला घाम सुटला होता आणि त्याची बोबडीहि वळली होती ! मात्र "घोरं धडा, धोडं घरा" अशा त्याच्या आरोळ्या अेकसारख्या चालू होत्या. सुदैव अितकेंच, की अुधळलेलें तट्टू थेट ठाणावर येअून आपोआप थांबलें !

दाजी दोन तासांनी शुद्धीवर आला. आमच्या तोंडचें पाणीच पळालें होतें त्याची ती दुर्दशा बघून ! पण शेवटीं त्याने शुद्धीवर येअून डोळे अुघडले आणि जवळच सचिंत बसलेल्या फौजदारांना



“ चोरं धरा, घोडं धरा... ” अशा आरोळ्या एकसारख्या चालू होत्या.

( पान ५८ )

अुद्देशून तो म्हणाला, " ज्या घोड्यावरून सराव असतांनाहि तुम्ही खाली येतां त्याच घोड्यावरून मुळीच सराव नसतांना मी न पडतां घरीं आलों! तुम्हाला मी आताच सांगून टाकतों फौजदारसाहेब, तुमच्या या नाठाळ घोड्याला आणखी चार दिवसांच्या आंत मी मअूसूत करून सोडतों!"

दुसऱ्या दिवशींच फौजदारसाहेबांनी आपलें बिऱ्हाड आमच्या शेजारून हलवलें व गावच्या दुसऱ्या टोकास नेलें.

पण तें जाअूं दे. अितर निरूपणांत कालक्षेप करून आख्यान कसेंतरी आटोपतें घेणाऱ्या कथेकऱ्यासारखीच माझी हां तऱ्हा झाली. दाजींचें मुख्य आख्यान मला सांगायचें आहे तें निराळेंच! पण या मध्यंतरीं अुत्पन्न झालेल्या अुपाख्यानाने माझा वेळ खाल्ला. असो.

सांगायची गोष्ट अितकीच, की दाजींचें अवाचित नाहींसें होणें तिला अत्यंत भीतिदायक वाटलें आणि घटकोघटकीं नवनव्या अशुभ शंका काढून ती डोळ्याला पदर लावूं लागली. मी बाहेरून येतांच ' केलांत का कांही तपास? लागला का कांही शोध भाअूजींचा?' हे तिचे दोन प्रश्न ठराविक होअून बसले व ' नाही ' हें अुत्तर देण्याचा मलाहि कंटाळा येअूं लागला.

अेक महिना अशा रीतीने गेला. आणि अेके दिवशीं दाजीच्या गुपिताचा स्फोट झाला. ' साहस ' मासिकाचा अेक ताजा अंक मजकडे पोस्टांतून आला. तो बहुतकरून दाजीच्या सूचनेवरूनच माझ्याकडे आला असावा. कारण, मी 'साहसा'चा ग्राहक नव्हतों. त्या अंकांत " पृथ्वीची पायपिटी " हें सदर दाजीच्या नांवावर सुरू झालें होतें आणि त्याचा पहिलाच हप्ता सचित्र देण्यांत आला होता.

स्थलवर्णनापूर्वी आपल्या प्रवासाचे अुद्देश लेखाच्या प्रारंभीं दाजीने दिले होते—

" प्रवासाच्या फायद्याचें वर्णन मी करीत नाही. पंडितमैत्री, सभासंचार अित्यादि फायदे देशाटनांत असतील; पण त्यांपैकी अेकहि गोष्टीसाठी मी ही पृथ्वीची पायपिटी करीत नाही. मला दुसरेंच अेक

गोष्ट सिद्ध करावयाची आहे. आणि ती म्हणजे कोणत्याहि माणसास पृथ्वीपर्यटन आणि तेंहि स्वावलंबी बाण्याने करता येणें शक्य आहे.

" जगप्रवासी म्हणून नावाजलेल्या पुष्कळ साहसी लोकांचीं नावें मीं अैकलीं आहेत आणि त्यांचीं प्रवासवर्णनें वाचलीं आहेत. त्यांच्या·विषयी मला आदर वाटतो, तो त्यांच्या प्रवासांतील पराक्रमाबद्दल नव्हे, तर हजारो घरबशा अजागळांपेक्षा त्यांनी निराळें कांही करून दाखवलें याबद्दल.

" मींहि मोठेसें शतकृत्य करतों असें नाही. पण अितरांपेक्षा माझ्या पृथ्वीपर्यटनांत कांही वैशिष्ट्य ठेवण्याचा माझा अिरादा आहे. माझ्या पृथ्वीपर्यटनास कोणाकडून पैचीसुद्धा मदत मी घेणार नाही व मी शाकाहारी ब्राम्हण आहे ही गोष्ट विसरणार नाही. मक्केला गेला, हो मुसलमान; जेरुसलेमला गेला, हो ख्रिस्ती नाहीतर यहुदी; रानटी बलुच्यांशीं गाठ पडली, खा मेंढीचें कच्चें मांस— असें मला करावयाचें नाही. राजा भेटला तरी मी मोटार मागणार नाही. आधी काम करीन आणि मग दाम घेअीन. कोणी म्हणतील, मीं घरची बरीच मोठी पुंजी बरोबर घेतली असेल. पण वस्तुस्थिति अशी आहे, की अंगावरच्या कपड्यांशिवाय अेक तांब्याचा तुकडाहि घरांतून मीं घेतलेला नाही. "

दाजीचा लेख वाचण्यापेक्षा त्याचा शोध लागल्याची शुभ वार्ता तिला कळविण्याची अुत्कंठा मला अधिक लागली होती आणि 'साहस' मासिकाचा तो अंक तिला नेऊन दाखविण्यासाठी मी अुठलोंहि. पण तितक्यांत तीच हसतमुखाने माझ्यापुढे येअून दाखल झाली आणि म्हणाली, " पाहिलं का हें भाअूजींचं करणं ! "

'साहसां'तील लेख आणि तिला आलेलं पत्र यांत फारसा फरक नव्हता. पुण्यापासून सातपुड्यापर्यंतच्या पायपिटीची समग्र माहिती त्यांत होती. अेका शेठजीला अिंग्रजी पत्रें लिहून देअून त्याने रुपया मिळविला, तर फिरतीवरील अेका मामलेदाराला पाणी आणून देअून त्याने पावलीची कमाअी केली ! खानावळींत वाढपी होण्यास किंवा मंडअींतील टोपलीवाला बनून अेक आणा मिळविण्यासहि तो कचरला नाही. लेखांत

म्हटल्याप्रमाणे कुणाचा छदामहि न घेतां त्याने आतापर्यंतचा पल्ला गाठला खरा. हालअपेष्टाहि त्याने कमी अनुभवल्या असें नाही. धर्मशाळा म्हणून तो मुडदे कापण्याच्या सरकारी अिमारतींत निजला, भर पावसांत तासच्या तास भटकला, खिशांत पैसे असूनसुद्धा सोय नसल्यामुळे त्यास अुपास काढावे लागले! अेक ना दोन. ज्याची त्याला अतिशय भीति वाटायची, त्या कुत्र्यांच्या भुंकण्यांत त्याला कित्येक रात्री झोपेवांचून काढाव्या लागल्या!

"सुखाचा जीव जाणूनबुजून दुःखांत घालायचा म्हणतात तो असा." तिने शेरा मारला. तरीपण दाजीच्या या पराक्रमाचें तिला कौतुकच वाटलें. पहिल्याच दणक्यास मीं मत बदलण्यास कबूल नव्हतों. पण माझें मौन तिला रुचलें नाही. आणि मी गुणग्राहक नाही असा शेराहि तिने मारून टाकला.

पुढच्या आठवड्यांत दुसरें पत्र आलें आणि त्याने आनंद किंवा कौतुक यांचें वातावरण नाहीसें होअून आमच्या घरीं दुःखाची अवकळा पसरली! कारण, दाजीने लिहिलें होतें—

"हें पत्र मी मृत्युदूतांच्या घोळक्यांत बसून लिहीत आहें. सातपुड्यांतील निबिड अरण्यांत या वेळीं मी आहें. रात्र पडली आहे. वाळलेला पालापाचोळा पेटवून मीं थोडा प्रकाश तयार केला आहे. आजूबाजूला साप सळसळताहेत, कोल्हेकुअीवांचून अेक सेकंद सुनें जात नाही. वाघाची डरकाळीहि मधूनमधून कानांवर येत आहे. मला अशा तीन रात्री आणखी काढायच्या आहेत. आठ आणे रोज देअून घेतलेला वाटाड्या भिल्लहि पुढे येण्यास तयार नाही. मात्र त्याने हें पत्र पोस्टांत टाकण्याचें वचन दिलें आहे आणि तसें तो टाकील असा मला भरवसा वाटतो.

"वैनी, तुम्ही म्हणाल, मी परत कां येत नाही? पण पुढे टाकलेलें पाअूल मागे घेणें मला नामर्दपणाचें वाटतें. मी मरण पत्करतों; पण नामर्दपणा मला असह्य वाटतो.

" या तीन दिवसांत शंभरांपैकी नव्याण्णव हिश्श्यांनी माझी अवतारसमाप्ति होईल. सहीसलामत बाहेर पडण्याची आशा असलीच तर अगदी थोडी ! पण तुम्हांला अखेरचा प्रणाम करण्यापूर्वी मी तुम्हां उभयतांना विनंती करतों, की तुम्ही माझ्यासाठी हळहळूं नका. मी स्वतः लग्नमंडपाकडे जाणाऱ्या नवरदेवाच्या उत्कंठेने या भीषण अरण्यांत पाऊल घालीत आहें. मला वाईट वाटतें तें एकाच गोष्टी-बद्दल. एका आईच्या पोटीं जन्म घेतलेलीं भावंडें जितक्या जिव्हा-ळ्याने व प्रेमाने वागणार नाहीत, तितकें प्रेम तुम्हीं उभयतांनीं मला दिलें. मी मात्र तुमच्या प्रेमाचा कोणताच मोबदला देऊं शकलों नाही. पण तुमच्या कनवाळूपणावर माझी सारी भिस्त आहे. माझे सहस्र अपराध तुम्हीं आतापर्यंत पोटांत घातले आहेत तसा हाहि घाला. वन्दे मातरम् ! आपला-

**दाजी.** "

पत्र वाचीत असतांना तिच्या डोळ्यांतून झरझर अश्रुधारा वाहत होत्या. ती आवंढा गिळून म्हणाली, " पाहिलंत भाऊजींचं मन ! तुम्ही त्यांना वेड्यांत काढतां, पण असा हिंमतवान् आणि कनवाळू माणूस दुसरा एक तरी दाखवा मला ! मी तरी काय मेली मठ्ठ ! जायच्या आदल्या दिवशीं कांद्याचं थालीपीठ मागितलं त्यांनी, तर म्हटलं ' उद्या करीन ' म्हणून ! "

तिला पुन्हा एकावर हुंदका आला.

तो दिवस आणि ती रात्र ती दाजीचे विविध गुण मला ऐकवीत होती. बायकांचें मन खरोखर प्रेमळ. दाजीबद्दल मला चिंता वाटत नव्हती आणि मी भ्यालों नव्हतों असें नव्हे. पण तिच्याप्रमाणे माझ्या डोळ्याला पाणी मात्र एकदाहि आलें नाही.

दुसरा दिवस उजाडला. शेजारच्या घरीं लग्न असल्याने ताशे-वाजंत्री वाजत होतीं. इतर वेळीं याच वाजंत्र्यांची तिला मौज वाटली असती; पण आज ती म्हणाली, " मेला उच्छाद आणला आहे या तडतडाटानं. लोकांना जरासुद्धा हायसं पडूं द्यायचं नाही म्हणजे काय ! "

हा तिटकारा वाजंत्र्यांबद्दल मुळीच नव्हता. तिच्या स्वतःच्या मनाची अस्वस्थता हेंच खरें कारण होतें.

अितक्यांत तारेचा शिपाअी आला. सही करून मीं तारेचा लखोटा हातांत घेतला. माझी छाती धडधडत होती. हात कापत होता. लखोटा फाडतांफाडतां तो दोनदा माझ्या हातांतून निसटला. तिचा चेहरा पांढरा फटफटीत झाला होता! आमच्यापुढे काय वाढून ठेवलें होतें तें आम्ही आता पाहाणार होतों.

तारेचा कागद अुलगडून पाहतांच माझ्या तोंडून अुद्गार निघाला, "अरेच्या!"

"काय झालं?" कोरडे ओठ जिभेने ओलवीत तिने विचारलें.

"खुद्द दाजीची तार!"

"भाअूजींची! बरं झालं बाअी!" मुक्ततेचा निःश्वास सोडून ती म्हणाली, "काय म्हणताहेत?"

"पाहातों तेंच कांही कळतंय् का!"

"म्हणजे?"

"अग, दाजी आहे तो! तो सरळ का लिहील?"

बक्षिसाचें कोडें सोडविण्याअितकेंच त्या तारेचा अर्थ लावणें अवघड होतें,

Mamana gheun tumhi doghehi tabadtob Lolakwadila Chingopant Joshanchya ghari ya. -Daji.

बराच वेळ डोकें खाजवल्यानंतर मला कोडें अुलगडलें. दाजीने मराठी-अिंग्रजींत तार केली होती!

दाजी सुखरूप— निदान जिवंत तरी— असल्याबद्दल जरी आमचा जीव खाली पडला होता, तरी आम्ही निश्चिंत मात्र झालों नव्हतों. लोलकवाडीला दाजी कां गेला? मामांसकट सर्वांना घेअून येण्याबद्दल अितकी निकडीची तार का? हे चिंगोपंत जोशी कोण? आणि ही लोलकवाडी आहे तरी कुठे? मागाहून कळलें, की ती माळव्यांत आहे म्हणून.

आपापल्या तर्कशक्तीप्रमाणे हे प्रश्न सोडवीत आम्हीं लोलकवाडीपर्यंतचा प्रवास पुरा केला आणि शंकाकुशंकांनी गोंधळलेल्या मनानें चिंगोपंत जोशांच्या घरांत शिरलों.

श्मश्रु केलेल्या डोक्याला तेल चोळीत अुभा असलेला दाजी आम्हांला दिसला!

दृष्टादृष्ट होतांच दाजी दौडत दरवाजांत आला आणि कोणी पाहात नाहींसें पाहून आम्हांला तिघांनाच अैकूं जाअील अितक्या हलक्या आवाजांत म्हणाला, "अुद्याचाच मुहूर्त धरताहेत चिंगोपंत—तुम्ही परवाचा धरायला सांगा. हो, कांहीं करायला सवड नको का?"

"पण भाअूजी, हे चिंगोपंत कोण? मुलगी कुणाची? पाहिली आहेत तरी का नीट?"

"चिंगोपंत हे अिथले सुखवस्तु गृहस्थ आहेत. मी फिरतफिरत अिथं आलों. अुतरायला जागा मागितली नि त्यांनी दिली हीच आमची ओळख. माझा पूर्व वृत्तांत त्यांना सांगितला, पुढचा अुद्देशहि सांगितला. पण चिंगोपंत म्हणाले, 'केला अेवढा प्रवासच पुष्कळ झाला. याच्या फार तर दोनशे पट चालाल की झालं पृथ्वीपर्यटन! आहे काय त्यांत? केलेल्या प्रवासांत काय पडलं पदरांत तुमच्या? शून्य! मग अशीं दोनशे नाहीं चारशे शून्यं घेअून तरी काय मिळणार तुम्हाला? यापेक्षा तुमचं वय आहे, लग्न करून संसार करा नीटनेटका.' मलाहि पटलं हें पंतांचं बोलणं आणि मीं 'ठीक आहे' म्हटलं."

"तें सारं खरं हो, पण मुलगी कुठली?"

"मुलगी चिंगोपंतांच्या बापाची. म्हणजे चिंगोपंतांची बहीण."

अितक्यांत चिंगोपंतच आमच्या स्वागतार्थ पुढे आले व आम्हांला घरांत घेअून गेले.

चार दिवसांनी आमचें वऱ्हाड परत निघालें. गाडींत बसल्यावर ती विनोदाने म्हणाली, "भाऊजी, जिवावर उदार होऊन एवढी पायपिटी केलीत, त्यांत तुम्हाला काय हो मिळालं?"

"बायको." दाजीने ताडकन् उत्तर दिलें.

"आणि तूं आपली प्रतिज्ञाहि खरी केलीस." मी म्हणालो. "तूं आम्हाला चकित केलंसच, पण आमच्या साऱ्या गावकऱ्यांनाहि तूं चकित करणार! आणि ते आता तुझी मिरवणूकहि खास काढणार."

★ ★ ★



# दाजीच्या संसारसुखाचा श्रीगणेशा

दाजीचें वऱ्हाड घेऊन आम्ही घरीं आलों. शिष्टाचाराप्रमाणे नवविवाहित वधूवरांनी माझ्यासारख्या स्नेह्याच्या घरीं येण्यापेक्षा मामांच्याच घरीं तळ टाकणें योग्य होतें आणि झालेहि तसेंच.

पण ही घटना दाजीला अनिष्ट वाटत होती. मामांचें घर लहानसें आणि त्यांतहि तिथे मामासारखा वडील माणूस. या दोन्ही गोष्टीपेक्षा दाजीला नडणारी मुख्य गोष्ट म्हणजे तिथलें जुनें वळण. बायकोबरोबर बोलण्याची गोष्ट दूरच राहिली, पण नुसतें परस्परांनी परस्परांजवळ येणें किंवा नेत्रसंकेत करणें या गोष्टीहि तेथे निषेधार्ह ठरत !

सासुरवास सरलाबाईला ( मिसेस् दाजीला ) जाचक होत होता की नाही हें कळण्यास मार्ग नसला, तरी मामरवास दाजीच्या मनांत खास डवचत होता. मामांच्या घरचें बिऱ्हाड हालवून माझ्या घरच्या मोकळया व समजूतदार वातावरणांत येण्याची त्याला उत्कंठा लागली होती; पण ती बोलून दाखवण्याइतकें मनोधैर्य त्याच्या अंगांत थोडेंच होतें ? नको असेल तेथे ताडकन् बोलून मोकळा होणारा दाजी स्त्री-विषयक प्रश्नांत अगदी भिडस्त, मुखदुर्बळ होता व ही त्याची जन्म-खोड त्याला आताहि नडत होती.

या दिवसांत मामांच्या घरांतून माझ्या घरीं आणि परत मामांच्या घरीं अशा त्याच्या सुळकांड्या अेकसारख्या चालू होत्या. मामांच्या घरीं तोंड दाबून बुक्क्यांचा मार अशी अवस्था होत असल्यामुळे तेथे करमेनासें होअी व तो आमच्याकडे येअी. पण आमच्याकडेहि तिकडची ओढ त्याला स्वस्थ बसूं देत नसे.

त्याची ही चलबिचल आम्हाला अुमगली नाही असें नाही. पण सभ्यपणाचा भंग होअील या भीतीने मीं ती बोलून दाखविली नाही. तथापि मनाची अितकी आवरशक्ति तिच्या अंगीं कोठून असणार ? अदमासाने वाटेल तीं विधानें दडपून देण्याची स्त्रीवर्गाची सार्वत्रिक वृत्ति तिच्याहि ठिकाणीं होती आणि दाजीच्या बाबतींत आपले विचार स्पष्टपणें बोलून दाखवायला तिला डरण्याचेंहि कारण नव्हतें.

स्टोव्हवर चहाचें आधण चढलेलें पाहूनसुद्धा दाजी लगबगीने अुठला आणि मामांच्या घरीं जाण्यास निघाला.

" कां ऽऽ ! आठवण झाली वाटतं ? " तिने टोमणा मारला.

" कां- कसली आठवण ? " दाजी समजून न समजल्याप्रमाणे चाचरत म्हणाला.

" अहो, आठवण राणीसाहेबांची ! " ' राणी ' या शब्दावर जोर देअून तिने खुलासा केला व म्हटलें, " आता कशाला आमचा चहा गोड लागतोय् म्हणा तुम्हाला ! "

तिच्या या खोचदार सवालाने दाजीला चांगलाच पेच घातला. अुठल्यासारखें चालूं लागावें तर तिचा आक्षेप सपशेल पदरांत घेतल्या-सारखें होणार आणि तसें करणें दाजीला मुळीच शक्य नव्हतें. आपला खंबीरपणा पटवून देण्यासाठी त्याने भिंतीशीं अुभा असलेला अेक पाट पायानेच सरळ केला व तो त्यावर ठाण मांडून बसला.

" तुम्हाला असं वाटत असेल वैनी, तर मी आता तुम्हीं केलला सगळाच्या सगळा चहा खलास करून दाखवतों. "

" मग मी माघार घेअीन असं वाटतंय् की काय तुम्हाला ? हाच काय, पण आणखी अितका चहा देतें मी करून ! ओतून चंद्रबळ

आणलंत तरी मी कांही हार जायची नाही हं तुम्हांला, भाऊजी ! बघूंयाच तर कोण हटतंय् तें ! सगळा चहा पिणार ना ? प्याच तर मग ! तीन कप आहे. त्याच्याबरोबर बिस्किटं देतें हवीं तर. "

त्यांची कांहीतरी वादावादी चाललेली अैकूं आल्यावर मला माझ्या खोलींत चैन पडतें थोडेंच ! मी बोलवायची वाट न पाहतांच स्वयंपाकघरांत गेलों व आश्चर्य प्रकट करून म्हटलें, " हें रे काय ! आज तूं अिथंसा चहा घेतो आहेस ? कांही वेगळाच प्रकार दिसतोय आज ! "

" वेगळा असायला काय झालं ! " दाजी कांहीतरी बोलायला पाहिजे म्हणून बोलला.

त्यावर आत्तापर्यंत झालेल्या हकीकतीची तिने माझ्यासमोर फिरून अेकदा अुजळणी केली व म्हटलें, " कोण हवं तें सांगेल, मी म्हणतें तें खरं की खोटं तें. "

तिला दुजोरा देण्यासाठी मींहि दाजीला विचारलें, " का रे, लग्नाहून आल्यापासून आज फावलं तुला चहाला यायला ? बायकोच्या नादांत गुंग होअून तूं आम्हांलाहि विसरलास ! "

" मला नको वैनी, तुला नको जाअू, तूं मी राहूं बायको ग ॥" लहानपणीं शिकलेल्या गाण्यांतलें अेक कडवें तिने डोळे मिचकावीत म्हटलें व विचारलें, " तुम्ही आम्हांला विसरलांत की काय, असा आक्षेप आम्हीं घेतला तर खोटा होअील का तो ? "

" बायकोच्या नादांत आपल्या माणसांना विसरणारा अुल्लू माणूस मी नव्हे. " दाजी आवेशपूर्ण स्वरांत आत्मसमर्थन करूं लागला. त्याने चहा घेतां घेतां स्वतःच्या मनाशीं जुळणी करून ठेवली होती.

" मग कां हो आलां नाही, भाऊजी ? " तिने विचारलें.

" तुम्हांला त्रास देअूं नये हाच माझा शुद्ध हेतु होता. वैनी, तुम्ही अेकट्या. रोजचं काम करतांकरतांच तुम्ही मेटाकुटीला येत असाल. त्यांत माझ्यासारख्या आल्या-गेल्याची भर घालणं म्हणजे

शुद्ध मूर्खपणा आहे. थोर मनानं तुम्ही कांही बोलणार नाही; पण तुमच्या चांगुलपणाचा फायदा आम्हीं कां घ्यावा ? त्यांत तुम्हाला हातभार लावायला अेखादं माणूस असतं तर नसती वाटली मला फिकीर– ''

या शेवटल्या वाक्यांतला गर्भितार्थ माझ्या चट्कन् ध्यानांत आला व दाजीच्या बोलण्यांतली मख्खी तिलाहि अुमगलेली दिसली. कारण तिने आपल्या गूढ हास्याने मला तसें दर्शावलें.

त्यानंतर '' गृहकृत्यांत गृहिणीला करावे लागणारे काबाडकष्ट '' या विषयावर आपलें प्रवचन दाजीने सुरू केलें. दाजीचें स्त्रीदाक्षिण्य आजच असें अुतूं कां आलें, याचें अिंगित माहीत असूनहि त्याची विवेचनपद्धति मला प्रभावी वाटली. स्त्रीजीवनांतील क्लेशांचें त्याने केलेलं विवेचन अैकून दाजीच्या सूक्ष्म व सर्वग्राही निरीक्षणशक्तीचें मला कौतुक वाटलें. वकिलीचा अभ्यास केलेल्या व गृहिणीपदाचा अनुभव घेतलेल्या अेखाद्या विदुषीस जरी आपली बाजू मांडावयास सांगितलें असतें, तरी दाजीअितक्या सफाअीदार रीतीने ती तें कार्य करूं शकली नसती.

'' रजा पाहिजे ! प्रत्येक गृहिणीला वर्षांतून कांही दिवस तरी रजा पाहिजे. '' आपलें भाषण संपण्यापूर्वी दाजी म्हणाला. '' साध्या शिप्पुरड्यापासून हायकोर्ट जज्जापर्यंत प्रत्येकाला जर रजेची गरज आहे आणि शक्यताहि आहे, तर स्त्रीजातीनंच काय घोडं मारलं आहे ? वैनी, तुम्हीं महिनाभर तरी विसावा घेतलाच पाहिजे. निदान कुणीतरी मदतनीस मिळवून कामाचा बोजा हलका केलाच पाहिजे. ''

अेकमेकांकडे पाहून आम्ही दोघेहि हसलों.

दुसरेच दिवशीं दाजीची प्रच्छन्न सूचना आम्हीं अमलांत आणली व दाजी सहकुटुंब आमच्याकडे राहावयास आला. तरुणतरुणींच्या बाबतींत आम्हां अुभयतांच्या कल्पना जुन्या मंडळींअितक्या सक्त नसल्याने सरला–दाजीचा सहवास वेळीमेळीचा झाल्यास आमची

हरकत नव्हती. अुलट तो तसा व्हावा असे प्रसंग व अशा योजना ती मोठ्या चातुर्याने जुळवून आणी.

सरला तुळशीवृंदावनापुढे रांगोळी घालण्यास गेली की तिने कांहीतरी निमित्ताने दाजीला तिकडे पाठवावें, सरलेला मधल्या वेळचें चहापाणी पाहायला सांगून आपण शेजारच्या घरीं कामाला म्हणून जावें, अशा कांही ना कांही क्लृप्त्या लढवून ती त्या तरुण दांपत्याला मौजेचे प्रसंग निर्माण करी. पण त्यांचा आस्वाद मोकळ्या मनाने घेण्याअितका दाजी निर्भीड नव्हता. सरलेचें सान्निध्य त्याला हवें होतें- नव्हे, तें जास्तींत जास्त मिळावें असाच त्याचा तारुण्य-सहज अट्टाहास होता. पण-

त्याला आम्हां दोघांचीहि भीति वाटत होती आणि सरलेकडे पाहतांनासुद्धा त्याची नजर बुजल्यासारखी दिसे.

तरीपण कोणीं असें समजूं नये, की दाजी त्या वाटेला मुळी जायचा नाही ! त्याच्या चोरट्या प्रणयचेष्टा चालत व केव्हाकेव्हा अुजेडांतहि येत.

मोगरीच्या फुलांचा अेक गेंद सरलेकडून त्याला मिळाला होता की त्याने तो बाजारांतून आणला होता हें माहीत नाही; पण सकाळीं चहाच्या वेळीं तो दाजीच्या हातीं दिसला. आम्हीं त्याची कांहीच विचारपूस केली नाही.

अंग धुअून सरला तुळशीला पाणी घालायला गेली आणि तिच्या अंगावर तोच गेंद वरून पडला. ती दचकली व " अगबाअी ! " म्हणून तिने वर पाहिलें. माडीच्या खिडकींत हसतमुख दाजी दिसला. तिनेंहि त्याच्या त्या देणगीचा हसतमुखानेच स्वीकार केला. पण अित-क्यांत अंगणांत ती गेल्यामुळे सरला चमकली. तिच्या हातांतला पुष्प-गुच्छ झाकून राहिला नाही. थोडी गंमत करावी म्हणून तिने मुद्दाम विचारलें,

" वरून पडला वाटतं तो ? "

सरला कांहीच बोलली नाही.

" भाभूजींनी केली वाटतं ही पुष्पवृष्टि ? "

" मी कशाला करूं ? वाऱ्यानं अुडून पडला असेल ! " असें चाचपडत बोलून दाजी जो खिडकीआड झाला तों जेवायलाहि मुष्किलीने खाली आला. त्या दिवशीं त्याने वर मान करून पाहिलें नाही की तो अेक अक्षर बोलला नाही !

अशीच अेके दिवशीं तिसऱ्या प्रहरची गोष्ट. अशा वेळीं मी घरीं नसायचा हें ठरलेलेंच होतें. तीहि मैत्रिणीकडे बहुतेक जायचीच. या संधीचा फायदा घेण्याच्या अिरादाने दाजीने अेक झकास ब्लाअुजपीस विकत घेतला व तो लगबगीने घरीं आला. सरला अेकटीच झोपाळयावर कांहीतरी विणत बसलेली पाहून दाजीची रसिक वृत्ति अधिकच अुत्तेजित झाली. हलकेच मागून जाअून तिच्यापुढे तें पुडकें अचानक टाकून तिला चकित करावें असा त्याचा अिरादा. पण योगायोग असा, की त्याने पुडकें सरलेपुढे टाकायला आणि ती माजघरांतून सोप्यावर यायला अेकच गाठ पडली !

" काय चाललंय् भाअूजी ऽऽ ! "

आता चोरून ठेवणें शक्यच नव्हतें. तरीपण वेळ मारून नेण्याची अेक शक्कल त्याने काढलीच.

" लोलकवाडीहून कसलं कापड आलंय् तें दिलं... " दाजी म्हणाला. थोडक्यावरच निभावलें असें वाटून सरलेनेहि समाधानाचा सुस्कारा सोडला.

कापड म्हटल्यावर तें पाहिल्याशिवाय स्वस्थ बसणें बायकोच्या जातीला कसें शक्य आहे ?

" पाहूं या तरी माहेरची देणगी, सरला बाअी ? " तिने म्हटलें व सरलेने पुडकें जसेंच्या तसें तिच्यापुढे टाकलें.

तें कोरें करकरीत पुडकें पाहून तिला शंका आलीच. तिने विचारलें, " पोस्टांतून आलंय् हें ? पत्ता, शिक्का कांहीच कसं नाही याच्यावर ? "

" नाही. अेका ओळखीच्या माणसानं आणून दिलं तें माझ्याकडं. "

" पण तो माणूस घरीं आणला नाहीत कुठं? माहेरचं माणूस भेटलं असतं सरलाबाओीला ! "

" त्याला जरा गर्दी होती परत जायची, म्हणून परभाराच गेला तो. "

हा वेळपर्यंत पुडकें अुलगडून तिने तो पीस बाहेर काढला व " छानच आहे हं ! " असें सर्टिफिकेटहि देअून टाकलें. पण त्याच्या घडींतून बाहेर पडलेल्या बिलाने सारेंच बेंड फुटलें ! तें बिल वाचून तिने विचारलें, " काय हो, भाअूजी, आमच्या अिथल्या लीलाचंद ब्रदर्सचं दुकान लोलकवाडीला हो कधी गेलं ? "

पण या प्रश्नाचें अुत्तर द्यावयास दाजी जाग्यावर होता थोडाच ! तिने बिल अुलगडलेलें पाहतांच त्याने माडीची वाट सुधारली होती !

अशा प्रकारांमुळे दाजीअितकाच संकोच आम्हां अुभयतांनाहि वाटूं लागला. अेकतर त्याचें स्वतंत्र बिऱ्हाड थाटलें पाहिजे किंवा आमच्याच बिऱ्हाडाचा अुपयोग त्याला पूर्ण स्वातंत्र्याने घेअूं दिला पाहिजे, यावांचून दुसरा मार्गच दिसेना. स्वतंत्र बिऱ्हाडाची कल्पना सध्यां तरी अशक्य होती, म्हणून आम्हीं दुसराच मार्ग पसंत केला व नवसफेडीचें निमित्त पुढें करून आम्ही दोघांनीहि आठ दिवसां-पुरतें आमचें गृहराज्य दाजीच्या स्वाधीन केलें आणि शेजारच्या क्षेत्रीं प्रयाण केलें.

मात्र आठ दिवसांचा बेत आम्हांला सहाव्याच दिवशीं आखडता घ्यावा लागला. आम्ही अुतरलों होतों तेथून जवळच कॉलऱ्याची अेक संशयित केस झाली व त्यामुळे तेथे अधिक राहण्यापेक्षा घर गाठलेलें बरें असें आम्हांला वाटलें.

घरापर्यंत आमचा प्रवास निरनिराळ्या तर्कवितर्कांत चालू होता. मी म्हणत होतों, की " दाजीनं निरनिराळ्या प्रकारांनी जिवाचं कौतुक केलं असेल, " तर ती म्हणत होती, " त्याच्या वेडेचारांनी बिचारी सरला मेटाकुटीला आली असेल! "

आम्ही स्टेशनवर अुतरून टांग्यांत बसलों व मी म्हणालों, " या वेळीं सरला-दाजी काय करीत असतील असं तुला वाटतं ? '

माझ्या प्रश्नाचें अुत्तर न देतां तिनेच मला प्रश्न टाकला, "काय करीत असतील असं वाटतं आपल्याला?"

"सरला दाजीला गाणं म्हणून दाखवीत असेल. नाहीतर दाजी अेखाद्या मासिकांतील मजेशीर गोष्ट तिला वाचून दाखवीत असेल. कदाचित् फिरायला जायच्याहि तयारींत असतील दोघंजणं."

"मला नाही वाटत असं. जोंपर्यंत मौज करायला मिळत नाही तोंपर्यंत माणसं 'करीन करीन' असा ध्यास घेतात. पण संधि आली की त्यांच्या मनाचा गोंधळ अुडून कांहीच होत नाही हातून. त्यांतल्या त्यांत भाअूजींसारख्या माणसांची तर पुरी त्रेधा अुडते! मला भीति पडलीय् सरलाबाअीची! काय झालं असेल बिचारीचं कुणास ठाअूक!"

तिचा हा अजमास मला पटला नाही. त्या तरुण जोडप्याचे विविध प्रेमविलास मी मनाने पाहात होतों. घरीं जातांच असेंच अेखादें रमणीय दृश्य प्रत्यक्ष पाहायला मिळेल व त्याकडे बोट दाखवून "चुकला की नाही तुझा अजमास?" असें आपण खोचकपणें तिला कसें विचारूं या कल्पनासृष्टींत गुंग असतांना आमचा टांगा दारापुढे केव्हा अुभा राहिला हें मला कळलेंहि नाही.

आम्ही अुतरून आंत गेलों. पण चाहूल न देतां अेकदम घरांत घुसण्याची आमची छाती झाली नाही. अंगणांतूनच मीं आरोळी दिली,

"दाजी, अे दाजी! आहेस का रे आंत?"

आमचा आवाज अैकतांच सरला सोप्यावर आली.

"भाअूजी नाहीत वाटतं घरीं?" तिने प्रश्न केला.

"असायचेय्—" सरलेने अुत्तर दिलें.

"झोपलाय् वाटतं?" मी म्हणालों.

"अहो महाराज, बाहेरूनच काय चालवलंत? आंत या की जरा!" दाजीची ही माजघरांतूनच आलेली हाक अैकून आम्हां दोघांनाहि आश्चर्य वाटलें! आणि तसें कां वाटूं नये? वाटेल त्या महत्त्वाच्या कामांत तो असला, तरी आमचा आवाज़ अैकतांच तो बाहेर यायला

पाहिजे होता. पण तसें न होतां तो आम्हांलाच आंत बोलावतो, या गोष्टीचें आश्चर्य तर वाटलेंच, पण कसली तरी भीतीची अेक चमक आमच्या मनांत चमकून गेली.

तिने तर अधीरतेने विचारलें, " भाअूजींची तब्बेत बरी आहे ना ग सरलाबाअी ? "

सरला कांहींच बोलली नाही !

आम्हीं आंत जाअून पाहिलें तों दाजी कॉटवर लांबलचक पसरलेला ! आम्हांला पाहतांच पांघरुणांतून डावा हात बाहेर काढून त्यानेच आम्हांला सलामी देत विचारलें, " काय ? कशी झाली ट्रिप, वैनीसाहेब ? "

" छान झाली. पण तुम्ही असे झोपलां काय दिवसाढवळ्या ? तुम्हीं तर दिवसा झोपण्याच्या अगदी विरुद्ध ! "

" पण मी झोपलोंय् कुठं, वैनी ? झालेली कमाअी संभाळत पडलोंय् नुसता !"

" कसली कमाअी केलीत आणखी ? "

" ही पहिल्या दिवसाची कमाअी ! " असें म्हणून दाजीने अुजवा हात बाहेर काढला. त्याच्या पाची बोटांना पट्टया लावलेल्या दिसत होत्या ! " तुमच्या विळीचा प्रसाद आहे हा ! भाजी चिरण्याच्या शिक्षणासाठी अितकी फी दिली मीं ! " असें म्हणून आपल्या घायाळ हाताकडे दाजीने अेकवार पाहिलें व तो खूप मोठ्याने हसला.

त्याच्या पायावरहि पट्टया बांधलेल्या पाहून मीं विचारलें, " आणि ही कसली फी ? "

" ही फी नव्हे, हें वैनींच्या चुकीबद्दल मला मिळालेलं प्रायश्चित्त ! " दाजीने अुत्तर दिलें.

" काय ? माझ्या चुकीबद्दल ? " तिने विचारलें.

" होय. वैनीसाहेब ! तुमच्या चुकीबद्दल ! सोधनं किंवा दुसरं कांहीहि हातीं न धरतां तुम्ही चुलीवरलं आमटीचं पातेलं अुतरतांना मीं हजारदा पाहिलं आहे. आणि म्हणूनच कढ आलेली कढी मी अुतरावयास गेलों आणि हें असं होअून बसलं ! "

" आणखी नाहीं का कांही करून घेतलंत ? " ती अुपरोधिक-पणें म्हणाली.

" घेतलंय् थोडंसं, पण फार नाही. चूल फुंकायला गेलों तर चटचटणाऱ्या कोळशाच्या चारपांच ठिणग्या गेल्या डोळ्यांत, तेव्हा-पासून आग होते आहे अन् पाणी मारतंय अेकसारखं. आणि दुसरी गोष्ट म्हणजे, अुजेडाकडं बघवत नाही अगदी. म्हणून तर थोडा अंधार करून पडलोंय् मी अिथं डोळे मिटून. "

" पण तूं गेलास कशाला तडफडत भलतींच कामं करायला ? " मीं थोडें रागानेच विचारलें.

" भलतीं कामं ! हीं भलतीं कामं ! तुमच्या रोजच्या जीवि-ताशीं संबंध असलेलीं हीं कामं भलतीं कशीं ? पाकशास्त्र हें मनुष्य-मात्राला अत्यंत आवश्यक आहे आणि अशा आवश्यक गोष्टींत तरबेज असणं हें प्रत्येकाचं कर्तव्यहि आहे. "

" पण काय हो राजेश्री, आताचशी आठवण झाली या कर्तव्याची ? सौभाग्यवतीला तसदी पडूं नये म्हणून वाटतं ? "

तिने विनोदाने दिलेल्या टोमण्याला अगदी गंभीरपणें दाजीने अुत्तर दिलें, " अगदी बरोबर ओळखलंत, वैनी. हा माझ्या संसाराचा प्रारंभकाल आहे आणि 'येरा गबाळा'सारखा कसातरी संसार करण्यापेक्षा आदर्श संसार करून जगाकडून वाहवा मिळविण्याची माझी महत्त्वाकांक्षा आहे. "

" मग चूल फुंकून आणि अंग पोळून घेअून आदर्श संसार कसा होणार तुमचा ? " तिने पुन्हा विचारलें.

" संसारांत स्त्री ही बटीक आणि पुरुष हा धनी अशी सामान्य लोकांची समजूत असते. आणि म्हणूनच बायकोला राबवून नवरा आपली मिजास करून घेत असतो. पण बायको आणि नवरा हीं समान दर्जाचीं आणि समान अधिकारी अंगं आहेत असं मी मानतों व तेवढ्यासाठीच बायकोच्या वांटणीला येणारं प्रत्येक काम आपल्यालाहि कुशलतेनं करायला आलं पाहिजे अशी माझी खटपट आहे.

स्वयंपाकाचा रगाडा दोन्ही वख्तां बायकांनाच कां ? अेक वेळ तें काम नवऱ्यानं कां करूं नये ? लोकांना वळण घालून देण्यासाठी अेक वेळचा स्वयंपाक करायचा पायंडा मी पाडणार आहें. तुम्ही गेलेल्या दिवशींच मीं श्रीगणेशा केला, पण हें असं होअून बसलं ! ”

“ बरं का, सरलाबाअी, आता तूंहि लिहिण्या-वाचण्याचा झपा-ट्यानं अभ्यास कर ग बाअी ! यजमानांनी तुझं निम्मं काम करायचं तर ठरवलंच आहे, आता तूंहि नकोस का तसं करायला ? अुद्या स्वारींना चाकरी लागली की अर्धा वेळ जावं लागणारच की तुला कामाला ? असंच ना भाअूजी ? मग तुमच्या श्रीगणेशाबरोबर सरलाबाअीलाहि पाहिला धडा कां नाही दिलांत ? ”

तिच्या या टोमण्याकडे दुर्लक्ष करून दाजीने मला म्हटलें, “ तुमचा चहा व्हायचा असेल अजून ? मीहि घेअीन थोडा तुमच्या-बरोबर. ”

★ ★ ★



# दाजीचा दिवाळसण

"श्रावण आला की हिंदु लोकांच्या अडाणीपणाला जा अूत येतो तो दिवाळीपर्यंत."

दाजीचें हें विधान अैकून ती म्हणाली, "कशावरून म्हणता तुम्ही असं? अुदाहरणं सांगा!"

अेवढी प्रेरणा मिळाल्यावर दाजीची जिव्हा शांत राहणें कसें शक्य होतें? श्रावण महिन्याच्या दर वारीं घरोघरीं पाळले जाणारे कुलाचार, मंगळागौर, श्रावणी, गोकुळ-अष्टमी, गौर-गणपति, ऋषि-पंचमी, पितृपक्ष, नवरात्र वगैरे अेकूण अेक सणाची आणि व्रत-वैकल्याची यादी सांगून दाजी म्हणाला, "ज्यांचा हेतु कळत नाही आणि आवश्यकता वाटत नाही, अशा गोष्टी देशकालपरिस्थितीचा विचार न करतां करीत राहणं म्हणजे आपला दुर्बलपणा मुकाट्यानं कबूल करण्यासारखं आहे. या दुर्बलपणाच्या पायींच आम्ही काळ, श्रम आणि पैसा यांची अमर्याद धूळधाण करीत असतों. हे विनाशक वेडेचार तावडतोब थांबवले पाहिजेत!"

दाजीच्या वक्तृत्वाला आजच अेवढें स्फुरण येण्याचें खरें कारण तिने केव्हाच ताडलें होतें. पण त्याचा कांही मागमूस न लागूं देतां ती म्हणाली, "तुमचं हें म्हणणं घटकाभर कबूल करतें मी, भाअूजी;

पण मला हें अेकपरीनं विध्वंसक वाटतं. दुसऱ्या चांगल्या प्रघातांची सुरवात केल्याशिवाय असलेल्या चाली बंद करणं मला नाही बरोबर वाटत. नवं काय करायचं तें सांगा आणि मग– ''

'' पुरता विचार केल्याशिवाय मी कांहीतरी भरमसाट बड-बडतों असं वाटतं तुम्हाला, वैनी ? '' तिला मध्येच थांबवून दाजी म्हणाला. '' तुम्ही या मंगळागौरीला गचांडी द्या अगोदर. '' आपण भलताच शब्द वापरल्याबद्दल त्याचें त्यालाच कसेंसें वाटलें. किंचित् वरमून तो म्हणाला, '' फूलपत्री गोळा करण्यांत, पूजेंत, जेवणावळींत आणि धांगडधिंग्यांत महिन्यातले चारपांच दिवस सर्व शक्ति खर्च करण्यापेक्षा गोरगरिबांच्या बायकांशीं मिसळून त्यांना साक्षर करण्यांत, स्वच्छतेचे धडे देण्यांत शक्ति आणि बुद्धि खर्च केली तर ? दुसऱ्या-साठी कांही करतां येत नसेल, तर आत्मसुधारणेसाठी तरी प्रयत्न करावा. अशा काय आमच्या बायका गार्गी, मैत्रेयीसारख्या विदुषी किंवा लक्ष्मीबाअीसारख्या पराक्रमी लागून गेल्या आहेत, की त्यांनी शरीरसामर्थ्य किंवा ज्ञानबल वाढविण्याचा प्रयत्न करूं नये ? ''

हा सवाल घालून दाजीने तिच्याकडे विजयी मुद्रेने पाहिलें. पण तीहि कांही कमी नव्हती. ती हसून म्हणाली,

'' भाअूजी, व्याख्यानापेक्षा अुदाहरणानं सुधारणा झट्कन् पटते. तुम्ही म्हणतां तें स्वतःच करून दाखवाल तर लोक न सांगतां त्याचं अनुकरण करतील. सरलाबाअीचे दोन मंगळवार अगदी जुन्या पद्धती-प्रमाणं साजरे होअूं दिलेत आणि आत्ताच बरा हो तुम्हाला सुधार-णेचा अुमाळा आला ? ''

अनपेक्षितपणें आणि अगदी आपल्याच रोखाने आलेल्या या सवा-लाने दाजीची थोडी गाळण अुडाली व त्या संधीचा फायदा घेअून तिने फेरहल्ला चढवला.

'' मी सांगतें यांतलं अिंगित, भाअूजी. मंगळागौरीची तुम्हाला अितकी चीड आली ती तिच्या निरर्थकपणाबद्दल मुळीच आली नाही, तर सरलाबाअी त्या निमित्तानं माहेरीं जाणार आणि दोनतीन महिने

तरी अेकलकोंडं राहावं लागणार,' अेवढ्यासाठीच जीव घाबरा होतो आहे तुमचा ! स्वतःला झळ लागूं लागली म्हणजे सुधारणा सुचतात पुरुषांना. पण काय हो भाअूजी, बायकोचं अितकं वेड तुम्हाला तरी बरं दिसतं का ? दुसऱ्या कुणीं असं केलं असतं, तर टीका करून पुरेवाट केली असतीत त्याची. तो बाअीलवेडाच आहे, विषयलंपटच आहे, अेकन् दोन, हज्जार बोलून घेतलं असतंत ! मीं जर तुम्हाला तोच आहेर केला, तर आहे का तोंड तुम्हांला बोलायला ? "

सरळ जबाब सुचेनासा झाला की विषयान्तर करून वेळ मारून नेण्यांत दाजी तरबेज होता. पण अशा रीतीने वेळ मारून नेली तरी त्यांत मनोगत साध्य होअीच असें नाही. अुलट, मनापासून नको तेंच त्याला पत्करणें भाग पडे. आजहि तसेंच झालें. बाअीलबुद्धेपणाचा किंवा विषयलंपटतेचा आपल्यावरील आरोप टाळण्यासाठी तो आवेशाने म्हणाला, " तुमचं म्हणणं मी कधीच कबूल करायचा नाही, वैनी. तुम्ही वाटलं तर तिनीअैवजी सहा महिने मला अेकटं राहायला सांगा. बघा मी तक्रार करतों का ! चार महिन्यांपूर्वी नव्हतों का मी अेकटाच ? आणि समजा, अुद्या माझ्या बायकोचं कांहीतरी झालं, तर काय मी सती जाणार आहें तिच्याबरोबर ? "

'शुभ बोल रे नाऱ्या'च्या कोटींत दाजी कधीकधी जात असे, हें माहीत असूनसुद्धा त्याच्या बोलण्याला ती भ्याली. पालीच्या चुकचुकण्या-वर किंवा कावळ्याच्या कावकावीवर सुखदुःखाचे ठोकताळे काढणाऱ्या बायकोच्या जातीला बायकोच्या मरणाची भाषा प्रत्यक्ष तिच्या नवऱ्याने अुच्चारल्यावर धस्स् झाल्यावांचून कसें राहील ? काय बोलावें हें तिला समजेना आणि तिच्या या मूकवृत्तीचा फायदा घेअून आपलें वक्तृत्व वेगाने सोडण्याचा हुरूप दाजीला येणें साहाजिकच होतें; पण त्याच वेळीं माझें तेथे आगमन झालें आणि मीं सुरवातीलाच प्रश्न केला,

" मग काय अुत्तर लिहूं रे चिंगोपंतांना ? "

" पण पाठवायचं कुणाबरोबर ? " तिने विचारलें.

"तें मग पाहतां येअील. अगोदर दाजीची मंजुरी आहे का राणीसरकारांना पाठवायला ?"

"तुम्हाला योग्य दिसेल तें तुम्ही ठरवा. मी तुमच्या बाहेर कधी गेलों नाही आणि जाणारहि नाही."

विचारलेल्या प्रश्नावर कसलीहि शंकाकुशंका न घेतां दाजीने निर्णायक अुत्तर दिल्याचा हा अनुभव आज मला पाहिल्यानेच आला म्हटलें तरी चालेल. त्यावरून मीं अेवढें मात्र ताडलें, की मी येण्यापूर्वी याच विषयावर अुभयतांचा खल चालू असला पाहिजे आणि दाजीची तडकाफडकी मिळालेली संमति हें त्याचेंच फळ असलें पाहिजे.

माझा हा अंदाज अर्थातच बरोबर ठरला.

दुसरे दिवशीं अोळखीच्या अेका अिसमाबरोबर मीं सरलाबाअीची लोलकवाडीला रवानगी केली. स्टेशनवर पोचवायला जाण्या-बद्दल मीं होअून दाजीला सुचविलें होतें; पण दाजी गेला नाही. ती थट्टा करील ही भीति ! पण त्याची थट्टा कांही चुकली नाही ! कारण जरी तो स्टेशनच्या धक्क्यावर 'गुडबाय' करण्यास गेला नाही, तरी स्टेशनपासून अेकदीड मैलावर तो गाडी जातेवेळीं हातरुमाल फडकावीत अुभा होता ! माझ्या व त्याच्या परिचयाच्या अेका माणसाने हा प्रकार समक्ष पाहिल्याने दाजीला तो नाकारतांहि येअीना.

मनमुराद हसण्याची ही खाशी संधि तिला आयती मिळाली.

अर्धा श्रावण महिना विशेष कांही न होतां गेला. स्थानिक गणेशोत्सवांत दाजी स्वयंसेवक झाला होता; आणि नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणे तो कांही कुलंगडें निर्माण करून रंगाचा बेरंग करतो की काय, अशी मला धास्ती होती. पण तसें फारसें कांही झालें नाही. फारसें म्हणण्याचें कारण अेवढेंच, की दाजी अगदीच कांही न करतां बसला नाही. तसें झालें असतें तर तो दाजी कसला ?

अुत्सवसमाप्तीनंतर चालक व स्वयंसेवक यांना श्रमभोजन देण्याचा अुत्सव मंडळाचा फार दिवसांपूर्वीपासूनचा रिवाज आहे.

त्याप्रमाणे या वर्षीहि श्रमभोजन ठरलें; पण या गोष्टीला दाजीने कसून विरोध केला ! "सार्वजनिक काम स्वेच्छेने करणाऱ्या माणसास लाडू चारणें म्हणजे त्याच्या कामगिरीचा अपमान होय. कोणत्याहि मोबदल्याची अपेक्षा किंवा स्वीकार न करतां काम करील तोच खरा स्वयंसेवक, नाहीतर मलिद्याच्या मोहाने काम करणारे आधाशी लोक, असा आरोप त्यांच्यावर येअील. हा आरोप आपल्यावर करून घ्यायला आपण तयार नाही! " अशा आशयाचें भाषण करून दाजी भरल्या पंक्तींतून अुठून आला.

लोक म्हणाले, "आधीच असं सांगितलं असतं तर कार्यक्रमां-तून श्रमभोजन वगळण्यांत आलं असतं. आणि पुढल्या वर्षांपासून त्याला कायमचा काट देण्यांत येअील. पण आता सर्व स्वयंपाक तयार झाला असतां बेत रद्द करणं श्रेयस्कर नाही."

पण हा युक्तिवाद मुकाट्याने मान्य करण्याअितका दाजी लेचापेचा थोडाच होता ! त्याने ताडकन् विचारलें, "स्वयंपाक तयार झाला असला तरी तो आम्हींच खाल्ला पाहिजे अशी सक्ति थोडीच आहे? जे अुत्सवाचे कार्यकर्ते नाहीत अशा त्रयस्थांना तें अन्न वाढा आणि आपण खादीसाठी खटपट करणारे नव्हे असं सिद्ध करा!"

"अहो, आयत्या वेळीं कोण येणार जेवायला?" अेकाने विचारलें.

"माणसं नाही आलीं तर गायी-म्हशींना घाला, नाहीतर तें अन्न नदींत नेअून सोडा."

पण दाजीची ही विचारसरणी मंडळींना पटली नाही आणि शेवटीं त्याला वगळून पंगत साजरी करण्यांत आली.

दाजीच्या सर्वसाधारण जीवनक्रमांत विशेष असें कांही नाही म्हटलें तरी पुष्कळ असे. पण तसल्या किरकोळ गोष्टी सांगून मी तुमचा वेळ घेत नाही. त्याचा दिवाळसण कसा साजरा झाला या मुख्य गोष्टी-कडे मी आता वळतों.

दसरा होऊन अेकदोन दिवस झाले असतील. लोलकवाडीहून चिंगोपंतांचें "दाजीसाहेबांना घेऊन आपण दिवाळसणाला अिकडे या" असें पत्र आलें होतें व तत्संबंधीच आमची वाटाघाट चालली होती.

"मग कधी निघणार भाऊजी?"

"तुम्ही वाटेल तेव्हा ठरवा. तुमच्याबरोबर मी केव्हाहि तयार आहे."

"म्हणजे? आम्ही जायचं!"

"जायचं म्हणजे? बिघडलं काय त्यांत? पत्रच आहे तुम्हांला तसं."

"अरे, पण भल्या माणसा! शिष्टाचाराप्रमाणं त्यांनी थोरपणा दिला आम्हांला. अशीं सणासमारंभांचीं पत्रं आलीं म्हणजे त्यांचा अर्थ अक्षरशः करायचा नसतो. 'सहकुटुंब-सहपरिवार येऊन कार्यसिद्धि करावी' असं म्हटल्याबरोबर मुलंबाळं घेऊन धावत सुटायचं नसतं!"

"सुटलं पाहिजे! आमंत्रण करणाऱ्यांची जिरवण्याकरिता तरी तसं केलं पाहिजे. मनोगत व्यक्त करण्यापेक्षा ढोंग करण्याची लोकांना पूर्वापार जडलेली ही खोड केव्हातरी आणि कोणीतरी मोडलीच पाहिजे. जो मनुष्य मुळीच आला नाही तरी चालेल, फार काय जो आला असतां आपल्या आनंदांत मिठाचा खडा पडल्यासारखं वाटेल, अशा माणसाला निमंत्रण पाठवायचा आचरटपणा आम्ही करतों आणि तोहि 'सहकुटुंब सहपरिवार या' असं म्हणून करतों. अेखादी गोष्ट करतांना ती कां करायची याचा आम्ही कधी विचारच करीत नाही. 'बाबावाक्यं प्रमाणम्' हें आमचं ब्रीद ठरून गेलं आहे; त्यामुळंच आमची प्रगति खुंटली आहे!"

"पण भाऊजी, तसं म्हटलं तर कांही चांगल्या गोष्टींनासुद्धा अजिबात फाटा द्यावा लागेल की! आता दिवाळीचंच घ्या. हा निरनिराळ्या नांवानं गोडधोड करून खायचा प्रघात आहे, तो तरी काय म्हणून पाळायचा मग? सर्वांचीच कांही सोय असते असं नाही, अन् हातावर पोट भरणाऱ्या पुष्कळ लोकांची तर पुष्कळ त्रेधा अुडते. आता

तुमच्या चिंगोपंतांसारख्या गरिबानं दिवाळसण करायचा म्हणजे सोपी का गोष्ट आहे ? पण केला पाहिजेच ना मुकाट्यानं ? नाही केला तर बहीण वाकडं तोंड करणार आणि तुमच्यासारखे मेहुणे रुसून बसणार !"

"पण अशा गोष्टींतला मुख्य फायदा दृष्टीआड करतां आहां तुम्ही, वैनी." दाजी वकिली कोटिक्रम करूं लागला. "निरनिराळ्या ठिकाणीं पांगलेले आपले आप्तस्वकीय विनाकारण अेकत्र जमणं शक्य नसतं. त्यांचं संमेलन भरविण्यास दिवाळीसारखे सण हें योग्य कारण आहे. आणि त्या दृष्टीनं त्यांचा अुपयोग करून घेतलाच पाहिजे."

"मग हें कारण लग्नकार्यांत नाही वाटतं साधत ? आणि अितका वेळ लग्नकार्याला आचरटपणा म्हणत होतां तुम्ही ! आपला मुद्दा आपणच खोडून काढलांत की ! तुमचं किनअी डोकं ठिकाणावर नाही आताशा, भाअूजी. तें लोलकवाडीकडं भरकटायला लागलंय् आणि तुमचं मन तिथल्या अेका माणसाकडे गुंतलंय् –"

ती दाजीकडे खोचकपणें पाहून अशी हसली की दाजी चांगलाच ओशाळला ! आता कोणता कोटिक्रम लढवून आपण या हल्ल्यातून निसटावें याचा त्याला पुरता विचार पडलेला दिसला ! तेव्हा त्याची मुक्तता करण्यासाठी मीं म्हटलें,

"बरोबर आहे तुमं म्हणणं, दाजी. काय लागतोस हिच्या नादाला ? कुणी अेक म्हटलं की दोन म्हणायची सवयच आहे हिला. बाकी हिच्या बोलण्यांतसुद्धा कांही मुद्दा असतोच म्हणा. पण जाअूं दे तें. तूं कधी निघणार तें ठरव. तुला खर्चाला पन्नास रुपये पुरतील, नाही का ? करून ठेवतों मी तेवढी तजवीज. अन् हे पाहा, येतांना सरलाबाअीलाहि घेअून ये; नाहीतर म्हणतील 'संक्रांत झाल्यावर पाठवतों' म्हणून !"

"ते शिमगा झाल्यावर पाठवायचं म्हणतील, पण मी अेकायला बसलोंय् थोडाच !" दाजी कडाडला. ती आणि मी दोघेंहि हसलों व त्या हसण्यांतला भावार्थ दोघेंहि अुमगलों.

दिवाळी दोन दिवसांवर येतांच दाजी लोलकवाडीला रवाना झाला. " तूं कांहीतरी करून हास्यास्पद ठरशील, म्हणून प्रथमपासून सावध राहा ! " अशी अुघड सूचना दिलेली त्याला आवडली नसती व तशी देणें मलहि अवघड वाटलें. तरीपण जितक्या आडपडद्याने त्याला सुचवतां येअील तेवढें सुचवण्यास मात्र मीं कमी केलें नाही.

" न्हाणंविणं आटपून आता फराळाची पंगत बसली असेल भाअूजींची ! " तिने दिवाळीच्या दिवशीं सकाळीं चहाबरोबरच बोलण्यासहि सुरवात केली.

" पण तो कांही बसायचा नाही फराळाला. सकाळीं फराळ आणि दुपारीं मेजवानी या दुहेरी गोष्टी त्याला नापसंत आहेत. मागल्या वर्षी नाही का त्यानं महात्माजींसारखा अुपवास केला अगदी दिवाळीच्या दिवशीं ? "

" अिथं करतां आलं; पण तिथं सासुरवाडीला ? "

" म्हणून काय झालं ! आपल्याला न पटणारी गोष्ट दाजी कधीच करायंचा नाही. "

" पण त्यांना न पटली तरी आंतून हुकूम आल्यावर ? "

" म्हणजे ? "

" म्हणजे काय ? सरलाबाअीनं चांगलीच छाप ठेवलीय् बरं का भाअूजींवर. "

" मला नाही खरं वाटत. "

" मला तरी कुठं वाटत होतं अगोदर तसं ? पण प्रत्यक्ष अनुभव आल्यावरच बोलतें आहें मी. "

" म्हणजे ? "

" म्हणजे काय ? हें पाहायचं. " असें म्हणून तिने आपल्या पोलक्याच्या खिशांतून अेक कागदाचा लांबट व चुरगळलेला तुकडा माझ्या हातीं दिला. तो अुलगडून त्यावरील पेन्सिलीचीं अस्पष्ट अक्षरें मी वाचूं लागलों. " कांहीतरी सबब काढून आलां नाही तर सगळ्यांना वाअीट वाटेल, " असें त्यावर अेकच वाक्य होतें आणि तो कागद

तिला दाजीच्या खोलींत सापडला होता. त्यावरून तें सरलाबाअीचेंच पत्र असलें पाहिजे असा तिने अजमास बांधला होता. त्यावर दुसरे पुष्कळ आक्षेप घेतां येण्यासारखे होते; पण मीं तसे घेतले नाहीत. शिवाय तिची समजूत खात्रीनेच चुकीची होती असें तरी कशावरून ?"

अितक्यांत आमचें टपाल आल्यावरून बोलण्याचा ओघ बदलला; आणि तिचा दादा भाअूबिजेसाठी केव्हा येणार आणि मी आक्काकडे कोणत्या गाडीने जायचें या विषयावर आम्ही आलों. मी परत येअीपर्यंत दादांना ठेवून घेण्याबद्दल मी तिला सांगत होतों व दादा आल्यावर मगच मीं आक्काकडे जावें असें ती मला सुचवीत होती.

परंतु या बाबतींत आमचा बेत निश्चित ठरण्यापूर्वीच अंगणांत माझें नांव पुकारलें गेलें आणि मी पुढे जातांच तारवाल्याने पिवळा लखोटा माझ्या हातीं देअून सहीकरिता पावती व पेन्सिलीचें थोटूक पुढे केलें.

तार ! माझ्या डोळ्यांपुढे अेकदम दाजी अुभा राहिला ! माझी छाती धडधडूं लागली आणि कापऱ्या हाताने लखोटा फोडून मीं तार वाचली तेव्हा माझी भीति खरीच ठरली !

"केलान् कांहीतरी घोटाळा !"

"कसला घोटाळा ?" तिने भिअून विचारलें.

"अग, दाजी गेला नाही लोकलवाडीला ! तार आली आहे चिंगोपंतांची. वास्तविक तो काल संध्याकाळींच पोचायला हवा होता तिथं."

"मग मधेच कुठं गेले बाअी !"

माझ्याअितकीच तीहि सचिंत झाली, आणि तिच्या शंकेखोर मनालाहि चालना मिळाली. प्रवास करतांकरतां गाडींतल्या गाडींत बेपत्ता झालेल्या कांही माणसांचा वृत्तांत आम्हीं अेकला होता; आणि नागपुराकडले कोणी अेक बडे बॅरिस्टर, सामानसुमान डब्यांत जेथल्या तेथे असून नाहीसे झाल्याची चर्चा वृत्तपत्रांत चालूच होती !

ती निरनिराळ्या अशुभ शंका घेअूं लागली व तिच्या डोळ्यां-तील गंगायमुनाहि अनावर झाल्या. मीं स्टेशनवर जाअून चौकशी केली तर लोलकवाडीचें तिकीट परवादिवशीं खपल्याची नोंद आढळली आणि तिकडच्या गार्डीतून त्याच वेळीं अुतरलेल्या माझ्या अेका परिचित अिसमाने काल सकाळीं भुसावळ स्टेशनवर दाजीला समक्ष पाहिल्याचें सांगितलें.

"मग त्याचें काय झालें?" या अेकाच प्रश्नाचें अुत्तर आम्ही अुभयतां आपापल्या मताप्रमाणे शोधीत होतों. दिवाळीचा सण आम्हीं नुसत्या मेतकूट-भातावर साजरा केला!

"कैद्यासारखं कोंडून ठेवलं तरच धडगत आहे भाअुजींची." किंचित् अुदास आणि किंचित् चिडखोर स्वरांत ती अुद्गारली. चिंगो-पंतांना वस्तुस्थितीची तार करण्यासाठी कोट-टोपी चढवून मी बाहेर निघालों.

अेक तार रवाना करून मी परत फिरणार तों दुसरी अेक तार मास्तरांनी माझ्या हातांत टाकली. खांडव्याच्या अिस्पितळामधील तार! 'मी ताबडतोब तेथे हजर राहणें आवश्यक आहे,' असा त्यांत संदेश! मी अधिकाधिक घोटाळ्यांत पडूं लागलों.

मी ताबडतोब निघालों आणि मी नको-नको म्हणत असतांहि ती गार्डीत बसली. ही तारसुद्धा दाजीविषयक असली पाहिजे असें तिने ठरविलें आणि दवाखाना, दाजी आणि तार या तिहींची गोळा-बेरीज करून तिने असा निष्कर्ष काढला, की दाजी प्राणसंकटांत असला पाहिजे, आणि अशा स्थितींत त्याला टाकून ती घरीं राहणें शक्यच नव्हतें.

खांडव्यास अुतरलों व गेटकडे जाअूं लागलों, तों समोरून माझा लहानपणचा शाळासोबती बलदेव हसतहसत माझ्याकडे आला आणि हात जोडून म्हणाला, "नमस्कार गुरु!"

माझें सारें लक्ष दवाखान्याकडे लागलेलें. तरीपण बालमित्राची फार दिवसांनी भेट होतांच मला आनंद झाल्यावांचून राहिला नाही. मींहि नमस्कार करून म्हटलें,

"फार दिवस झाले नाही आपणाला भेटून?"

"अेकोणीसशे अठरांत भेटलों होतों मुंबअीस."

या प्रास्ताविक भाषणानंतर मी बलदेवास माझ्या तेथे येण्याचें कारण सांगितलें व अिरिगतळाकडे बरोबर येण्याबद्दल त्यास विचारलें. पण त्याने त्या वेळीं दवाखान्याकडे स्वतः येण्याचें तर नाकारलेंच, पण मलाहि तिकडे जाअूं दिलें नाही. मीं नाखुषी दर्शविली; पण तिकडे मुळीच लक्ष न देतां त्याने आपलें म्हणणें खरें केलें.

बलदेवाच्या बंगल्यापाशी मोटारींतून अुतरतांच मला कळून चुकलें, की तो मला आतापर्यंत वाटत होता तसा साधा बलदेव राहिला नसून तो 'डॉ. जे. बलदेव, अेम्. डी., मेडिकल ऑफिसर, खांडवा हॉस्पिटल' आहे! हें कळल्यावर त्याने मला घरीं आणल्याबद्दल वाटत असलेला माझा राग नाहीसा झाला.

"वैनींना आणलंस हें सर्वांत अुत्तम झालं. या निमित्तानं यांची ओळख तरी झाली." असा बलदेवाने प्रस्ताव करतांच मींहि तेच शब्द डॉक्टरीणबाअींबद्दल त्याला बोललों. तिची डॉक्टरीणबाअींबरोबर जमलेली गट्टी पाहून मला मोठें नवल वाटलें. बायकांना भांडखोर म्हणतात, पण शीघ्र स्नेह जमविण्यांत त्यांच्यासारख्या त्याच, असें मी तरी बिनदिक्कत म्हणेन.

मला तातडीने आणि नांव कळूं न देतां बोलावण्याचें कारण मीं विचारतांच बलदेव हसून म्हणाला, "अरे, चहापाणी होअूं दे, जरा ताजेतवाने व्हा, कळतंच आहे आपोआप."

आम्ही सर्वस्वीं त्याच्या तावडींत सापडलों असल्यामुळे दुसरें काय करतां येणें शक्य होतें? स्वस्थपणें फराळपाणी अुरकलें, तरीहि बलदेव मुद्द्यावर येअीना. तेव्हा मात्र मीं थोड्या त्रासिक सुरांत म्हटलें, "बलदेव, आता अधिक ताणूं नको बुवा."

"अच्छा!" म्हणून तो अेकदा मोठ्याने हसला आणि त्याच वेळीं दारांत अेका टांग्यांतून सरलाबाअी आणि चिंगोपंत ही जोडी अुतरलेली मला दिसली. मी आश्चर्याने म्हणालों, "हें आहे तरी काय गौडबंगाल! ही मंडळी अिथं कशी?"

चिंगोपंतांना माझ्याकडे पाहून हसूं आल्याशिवाय राहिलें नाही. ते म्हणाले, " आपणांलाहि ओढून आणलं का दाजीसाहेबांनी ? "

अपेक्षेप्रमाणे हा दाजीचाच कांहीतरी अुपद्व्याप आहे हें आता कळून चुकलें. मग मात्र बलदेवाने ओढून धरलें नाही. पोलिसांनी दाजीला बेशुद्धावस्थेंत अिस्पितळांत कसें आणलें, आपण त्याला किती प्रयासानें सावध केलें, त्याच्या जीविताबद्दल आपण किती अनिश्चित होतों, त्याच्याकडून आमचीं नांवें व पत्ते कळतांच तारा कशा केल्या, ही हकीकत त्याने सांगून टाकली.

आता लोकलवाडीला दिवाळसणाला चाललेला दाजी खांडव्याच्या पोलिसांना बेशुद्धावस्थेंत कसा सापडला ?

झाला प्रकार तो असा. भुसावळला गाडींत बसल्यावर दाजीला अेक स्त्री अुदासवाणी बसलेली दिसली. पेहेरावावरून ती कुणबी जातींचा दिसत होती. तिच्या करुण मुद्रेवरून दाजीला दया आली आणि तो म्हणाला,

" बाअी, तुम्ही अशा कष्टी कां ? "

" दादा, काय सांगूं तुम्हाला ? अुद्या दिवाळीचा सण. समद्या प्रिथिवींतलीं मानसं आनंदांत हैती. भावासंगट बहिण माहेरीं जाती, नाहीतर भाअू बहिणीच्या घरीं बिजेला येतो. दादा, देवानं मला कुणी भाअू दिला नाही हो—" अेवढें बोलून ती स्फुंदूनस्फुंदून रडूं लागली.

दाजी कळवळला ! त्याने क्षणभर विचार केला आणि निश्चय झाल्यासारखें करून म्हणाला, " ताअी, मी तुझा भाअू झालों तर बरं वाटेल का तुला ? "

" नग नग दादा. माझ्यावाणी फुटक्या नशिबाच्या बयाचं भाअू कशापायी होतां ? तुमची बायको असल, भण असल, नका दादा, देव तुमचं कल्याण करूं दे. मी हाय अन् माझं नशीब हाय ! "

" नाही. ताअी, तूं नको म्हणशील तरी मी तुझा भाअू होणार आणि ही दिवाळी मी तुझ्या घरीं साजरी करणार. चल, कुठं आहे तुझं घर ? खर्चाची मुळीच काळजी करूं नकोस तूं. "

शेवटीं खांडव्याच्या अलीकडल्या स्टेशनवर अुतरून थोड्या मैलांवर असलेल्या आपल्या नव्या बहिणीच्या गावीं दाजी गेला. तेथे त्याचा पाहुणचार तिच्या घरच्या मंडळींनी फारच अगत्याने केला. त्या विजातीय परिवारांत सुद्धा दाजी अितका रंगला, की सासुरवाडीचा दिवाळसण बुडल्याबद्दल विषाद न वाटतां या नव्या प्रेमाच्या प्राप्तीबद्दल त्याला कृतार्थता वाटूं लागली.

परंतु हा प्रेमास्वाद त्याला अधिक काळ घेतां आला नाही. दुसरे दिवशीं दुपारी दवाखान्यांत शुद्धीवर आल्यावर त्याला समजून चुकलें, की आपण बदमाषांच्या तावडींत सापडलों होतों व आपलें सर्वस्व लुबाडलें जाअून आपण मृत्यूच्या दाढेंत सापडलों आहों! विषारी वनस्पति आपणांस चारण्यांत आल्या आहेत!

बलदेवाचें हें दाजीपुराण वाचून होतें न होतें तों दाजीची स्वारी तेथे अुपस्थित झाली. मी त्याला कोपरापासून हात जोडून म्हणालों,

"खासं केलंस!"

"केलंच नाहीतरी!" कोटटोपी खुंटीला लटकावीत दाजी म्हणाला, "नाहीतर मित्राच्या घरचा पाहुणचार तुम्हांला कसा मिळाला असता? चिंगोपंतांना नव्या मित्राची प्राप्ति कशी झाली असती!"

वास्तविक या फजितीमुळे दुसरा अेखादा ओशाळला असता आणि त्याला मेल्याहून मेल्यासारखें झालें असतें! पण दाजीचा निगरगट्टपणा तसाच्या तसा अभंग होता! मला त्यांत विशेष असें कांहीच वाटलें नाही; पण बलदेव हलकेंच म्हणाला, "कुठं रे पैदा केलीस ही चीज?"

नंतर दाजीकडे वळून तो म्हणाला, "काय मिस्टर, झाला का जबाब?"

"झाला. पण माझ्या जबाबावरून त्या लुच्च्या पोलिसांना कांहीच लभ्यांश व्हायचा नाही! मीं खोटाच ठावठिकाणा दिला आहे

दडपून, तिथं खरे गुन्हेगार त्यांना बापजन्मीं नाही सापडायचे! बसूं देत लेकाचे ठोकत! अेक गुन्हेगार असला की दहा जणांना लंबे करतात ते. मी त्यांना अशी संधि कधी मिळूं द्यायचा नाही."

"तारीफ आहे तुझ्या व्यवहारज्ञानाची! तरी बरं, आपण स्वतःच विष खाल्लं म्हणून नाही सांगितलंस!" मी खोचक स्वरांत म्हणालों. पण त्याकडेहि लक्ष न देतां तो म्हणाला,

"अेकदा आलं होतं मनांत तसं सांगायचं, पण मागून आलं लक्षांत, की आत्महत्येचं शुक्लकाष्ठ आपल्याच मागं लागेल म्हणून! धर्म करतां कर्म अुभं राहायचं!"

"आता काय कमी राहिलं?" मानेला नापसंतीचा हिसका देअून दाराआडून ती म्हणाली, आणि चिंगोपंत, मी व बलदेव हसावें की रडावें अशा मिश्र भावनेने अेकमेकांकडे पाहूं लागलों!

★ ★ ★



# साहित्यसंमेलनांत दाजी

चार बोलावण्यांनंतर दाजी चहाला आला, तेव्हा ती म्हणाली, " अेवढं कसलं लेखन चाललंय् भाअूजी, आताशा ! अेखादी कादंबरी लिहितां आहां की काय ? "

" कादंबरी ! " दाजी तीव्र निषेधाच्या स्वरांत म्हणाला, " पाचकळ प्रेमाच्या भाकडकथा लिहिणं म्हणजे माझ्या बुद्धीचा अपव्यय होय असं समजतों मी. "

" मग तुमच्या विद्वत्तेला साजेल असा कसला ग्रंथ निर्माण करतां आहां तें तरी कळूं दे ? "

" कसला ग्रंथ अन् कसलं काय ? " दाजीने चहाचा भुरका मारला आणि त्यांतच निराशेच्या सुस्कार्‍याचा सूर मिसळला.

" कां हो !" ती धीर देत म्हणाली, " अितकं हें काय वाटतं तुम्हाला, भाअूजी ? गीतारहस्यासारखासुद्धा ग्रंथ लिहाल तुम्ही, मनावर घेतलंत तर. तुमच्या डोक्यांत काय आहे नि काय नाही याचा पत्ता लागायचा नाही कुणाला ! "

" आणि मला कुठं नाही माझ्याबद्दल आत्मविश्वास ? " तिच्या शिफारशीने अवसान येअून दाजी अुद्गारला, " वैनी, तुम्हाला सांगायला हरकत नाही. मी लिहितोंच आहे तसा अेक अपूर्व ग्रंथ. पण मी रात्रीचा दिवस करून खर्डे घासले तरी त्याचं चीज कोण करणार ?

माझं बाड माझ्याच दप्तरांत दडून राहणार आणि थोड्या दिवसांनी कसर लागून त्याचा भुगा होणार! माझ्यापाशी पैसा नाही आणि पैसा नाही म्हणून माझ्या ग्रंथाचं प्रकाशन नाही."

"मुळीच फिकिरींत पडूं नका भाऊजी, तुम्ही. तुमचं ग्रंथलेखन पुरं तरी होऊं दे, की त्याच्या प्रकाशनाची तरतूद झालीच म्हणून समजा."

तिच्या या अमृतवाणीने दाजीच्या आशेला नवजीवनच प्राप्त झालें आणि त्याने आतुरतेने विचारलें, "तें कसं काय? सांगा तरी वैनी?"

तिला कधीं काळीं पाठ केलेलीं कवनें अचूक आठवतात आणि त्यांचा प्रसंगानुसार उपयोग करण्याची समयसूचकताहि तिच्या अंगीं चांगली आहे. तिने उत्तरादाखल पुढील गीतचरण सोडून दिला—

"ग्रंथापूर्वीं प्रकाशकातें विधि निपजवितो आर्या।"

दाजीचें शीघ्रकवित्व महशूर आहे. तिची समस्या त्याने तिच्याच स्वरांत तडकाफडकी पुरी केली—

"पैशाभावीं घुणा लागतो सगळ्या अिच्छित कार्या॥
आशा दावुं नका! वैनी, थापा मारुं नका॥"

मूळ मुद्दा कुठल्याकुठेच गेला आणि दोघांच्या अनाहूत काव्य-गायनाने घटकाभर आम्ही पोटभर हसलों.

कथा मूळपदावर आणण्याचा मीं प्रयत्न केला. साहित्यविषयक कित्येक प्रश्नांवर आम्ही बोललों आणि तत्संबंधीं दाजीचे विचार पाहून मला त्याचें कौतुक वाटल्यावांचून राहिलें नाही. मीं त्याला म्हटलें,

"आता जाणारच आहों आपण साहित्यसंमेलनाला. तूं अेक विस्तृत निबंध लिहून तिथं वाच. वाहवा होअील तुझी."

"मला या प्रशंसेची जरुरी नाही आणि मी साहित्यसंमेलनाला येणारहि नाही." दाजीने अेकदम सांगून टाकलें.

"तें रे कां?" मीं आश्चर्याने प्रश्न केला.

" तिथं जाअून कांही फायदा होत नाही म्हणून."

" नाही कसा? मोठमोठी विद्वान मंडळी तिथं जमतात-"

" आणि या विद्वान् मंडळींच्या प्रदर्शनापेक्षा तिथं जास्त काय होतं?" मला माझें वाक्य पुरें करण्याची संधीच न देतां दाजी म्हणाला. साहित्यसंमेलन हें नांवच मुळी सदोष आहे, असा त्याचा पहिला आक्षेप. 'साहित्यकार संमेलन' हें नांव यथार्थ होअील असें त्याचें म्हणणें. आणि 'साहित्यसंमेलन' हेंच नांव ठाम करण्याचा हट्ट असेल तर ह्या सामासिक शब्दाचा विग्रह कसा करावयाचा, असा त्याचा सवाल.

या सवालाला जबाब देण्याचा मींच थोडासा प्रयत्न करून पाहिला, "साहित्याच्या अभिवृद्धीसाठी साहित्यभक्तांनी भरविलेलें संमेलन तें साहित्यसंमेलन."

"भले शाबास!" दाजी अुपरोधिकपणें म्हणाला, "समास म्हणजे कूट प्रश्न असं वाटतं की काय तुम्हाला? ते सोडवतांना अितका द्राविडी प्राणायाम अुपयोगी नाही. अशा पद्धतीनं समास सोडवले तर वाटेल त्या शद्बांतून वाटेल तो अर्थ काढतां येअील! 'आरोग्यदिन' याचा अर्थहि 'कांदेनवमी' असा करतां येअील. 'आरोग्य बिघडे-पर्यंत लोक ज्या दिवशीं अनारोग्यकारक कंदर्पमय पदार्थ खातात तो दिन म्हणजे आरोग्यदिन,' असा विग्रह केला तर कोण तोंड धरणार तुमचं? ज्या दोन शद्बांचा समास झाला त्या दोन शद्बांच्या टरफलांत पाहिजे तो मसाला भरून आपल्याला हवा असलेला अर्थ जुळवणं हा शिष्टसंमत मार्ग नव्हे."

"पण नांवांत काय आहे, भाअूजी? कार्यावर लक्ष ठेवावं माणसानं."

तिला वाटलें आपल्या या सूचनेने दाजींच्या टीकाप्रवाहाला विरोध होअील. पण प्रत्यक्ष परिणाम अुलट झाला! दाजी दुप्पट आवेशाने म्हणाला,

"कार्यावर नजर असल्यामुळंच माझा जीव असा तुटतो, वैनी. तुमच्या या संमेलनामुळं विधायक कार्य थोडं जरी झालं असतं, तरी मी नांवाबद्दल चकार शब्द काढला नसता. पण अितकी मंडळी जमतात, हजारो रुपये खर्च होतात, बहुमोल वेळ व अनेकांचे परिश्रम यांचा फन्ना होतो आणि या मानानं हातीं काय येतं हें सांगा पाहूं ?"

दाजीला खरोखरच भयंकर चीड आली आहे हें त्या वेळच्या त्याच्या हातवाऱ्यांवरून व मुखविक्षेपांवरून कोणाच्याहि लक्षांत आलें असतें. क्षुल्लक कारणासाठी डोकें भडकण्याची त्याची खोड आम्हाला ठाअूक असल्याने आम्हाला त्याचें विशेष कांही वाटत नसे आणि या वेळींहि वाटलें नाही. अशा स्थितींत तो विषय अजिबात टाळणें हा आम्हांला योग्य अुपाय वाटे व आम्ही दोघांनी अेकमेकांना डोळ्यांनी खुणावून मौन स्वीकारण्याचा बेत मुक्रर केला.

पण दाजीच्या बाबतींत जसे आमचे अनेक बेत फसत तसा हाहि फसला ! आणि जरी आम्हीं आमच्या प्रश्नांचें तेल त्याच्या टीकाग्नींत ओतलें नाही तरी स्वयंप्रेरणेनेच तो म्हणाला, "सांगा वैनी, आजपर्यंत डझनभर तरी संमेलनं झालीं; पण या संमेलनांचं कोणतं दृश्य स्मारक तुम्ही दाखवतां ? बोला !"

आवेशाच्या भरांत दाजीने पुढील बशींत रिकामा कप खणखण वाजवला. याची पुनरावृत्ति झाल्यास त्याची धडगत नाही हें जाणूनच की काय, सरलाबाअी चटकन् पुढे झाली व तिने सर्व चहापात्रें अुचलून नेलीं.

दाजीच्या सवालाला अगदीच अुत्तर न देणें तिला शक्य नव्हतें. ती म्हणाली, "अशा सभापरिषदा प्रत्यक्ष कार्य करण्यापेक्षा विचार-जागृतीसाठी आणि मार्ग दाखविण्यासाठी असतात. आणि हा हेतु साधतोच कांही झालं तरी."

"अेखाद्या संस्थानांत तुम्ही खचित प्राअिम मिनिस्टर व्हाल, वैनी. कारण तिथं बढती मिळवायला व पुढं यायला राजेसाहेबांच्या

पुढं जी शब्दावर मल्लीनाथी करावी लागते, ती कला तुमच्याजवळ भरपूर आहे. सांगा, अितक्या वर्षांत कोणत्या बाबतींत संमेलनानं म्हणण्यासारखं अेखादं काम केलं आहे ? तुम्हांला तोंडपुजेपणा करायचा असेल तर खुशाल करा ! ”

“ आम्हांला तोंडपुजेपणाचा आहेर तुम्हीं केला तर तुमच्या आतापर्यंतच्या बोलण्यावरून आम्हांलाहि तुम्हांला निंदक नाही का म्हणतां येणार ? ”

तीहि हट्टाला पेटल्यासारखी झाली होती. दाजींना तर आधीपासूनच अवसान चढलें होतें. साहित्यसंमेलनच काय, पण दरसाल भरावयाच्याच म्हणून भरविल्या जाणाऱ्या परिषदा म्हणजे खेडेगावचे अुरूस किंवा जत्रा असें त्याचें मत. तेथे जमणाऱ्या लोकांच्यापुढे अमुक अेक कार्य ठरवायचें आणि तें अुद्या करूं लागावयाचें असें कांहीच नसतें. सुटींत चैनीने करावयाची सफर म्हणून हौशी लोक त्या निमित्ताने जातात. स्थानिक मंडळींची दृष्टि पाहिली तरी आपल्या गावचें संमेलन अितर ठिकाणच्या संमेलनापेक्षा दणदणीत म्हणजे भपकेबाज व थाटामाटाने झालें पाहिजे, अेवढाच अट्टाहास असतो. मंडपाची सजावट, भोजनाचा बेत, सरदारी पाहुण्यांची ( मुद्दाम बोलावून आणलेल्या ) बडदास्त आणि या सर्वांत ‘ भले बहाद्दर ’ म्हणवून घेण्याची त्यांची धडपड. कार्याच्या कळकळीपेक्षा अीर्षेचें वेड त्यांच्या डोक्यांत शिरलेलें असतें. अेका संमेलनोत्सवाच्या वेळीं मंडपद्वारीं शृंगारलेले हत्तीघोडे आणि भालाअीत-ढालाअीतांची फौज पाहून हें साहित्याच्या अुन्नतीसाठी भरलेलें अधिवेशन म्हणण्यापेक्षा संस्थानी दरबार हेंच नांव त्याला जास्त शोभलें असतें. या निव्वळ देखाव्याने काय काम साधणार ?

दाजीची ही टीका अतिशयोक्तिपूर्ण असली तरी मला सर्वस्वीं खोटी म्हणतां येअीना. पण मनुष्यस्वभावाचा विचार करतां हे प्रकार साहजिक आहेत आणि याबरोबरच कार्यकर्ते अुपयुक्त कार्य करून दाखवतात, असें माझें म्हणणें होतें. तें मी प्रकट न करतां माझ्या-

पाशीच ठेवलें. कारण, बोलून दाखविल्यास त्याच्या जिभेला पुन्हा स्फुरण येअील ही धास्ती मला वाटत होती.

पण माझ्या मनांतले विचार तिला कसे कळणार? दाजींना डिवचून बोलावयास लावणें हा तिचा नेहमीच वेळ घालवण्याचा अुपाय असल्याने त्यांचा वक्तृत्वप्रवाह मंदावतोसें पाहून ती म्हणाली, "समजा भाअूजी, तुम्हीं साहित्यसंमेलन स्वतःच बोलावलंत तर कसं साजरं कराल?"

"मी साहित्यसंमेलन नेहमीच भरवीत असतों. अुत्कृष्ट साहित्यानं तीन कपाट भरलीं आहेत माझीं आतापर्यंत. पण तुम्ही म्हणतां त्या प्रकाराचा साहित्यसेवकांचा मेळा बोलावला तर मी अगोदर असं जाहीर करीन, की 'जे स्वतः लेखक, कवि अगर प्रकाशक असतील त्यांनीच या संमेलनास यावं. हें संमेलन कार्य करण्यासाठी भरणार आहे, प्रेक्षकांच्या मनोरंजनासाठी नाही.' यामुळं अेरवीसारखा प्रचंड समुदाय संमेलनास जमणार नाही; पण जे शेदोनशे लोक जमतील ते खरेखुरे साहित्यसेवक असल्यानं व सर्वांचे हितसंबंध अेकाच प्रकारचे असल्यानं सभेंत जी चर्चा व्हायची ती व्यवस्थित, आस्थेवाअीक व अुपयुक्त स्वरूपाची होअूं शकेल.

"माझ्या संमेलनासाठी जमलेल्या पाहुण्यांच्या मनोरंजनासाठी मी कांही कार्यक्रम ठेवीन; पण संमेलनाचं तें प्रमुख अंग होअूं देणार नाही. अेवढ्यासाठी प्रास्ताविक भाषण, स्वागतपर पद्यं, काव्यगायन आदि प्रकारांची शक्य तितकी छाटाछाट करावी लागेल. तसंच कोणत्याहि वक्त्यानं आपलं म्हणणं पाल्हाळ न लावतां शक्य तितक्या थोड्या शद्बांत पुढं मांडावं अशी मी सूचना देअीन. अशानं ठराविक वेळांत सर्व कार्यक्रम व्यवस्थित पार पडेल. अध्यक्षांचं भाषण होतांच लेखनकला, लेखनव्यवसाय अथवा साहित्यप्रकाशन या बाबतींत मराठी साहित्याची सुधारणा कशी करतां येअिल, याबद्दल तज्ञांचीं व्याख्यानं व प्रश्नोत्तरं होतील. या व्याख्यानांतून व प्रश्नोत्तरांतून अनेक नवनव्या कल्पनांची देवाण-घेवाण होअून जमलेल्या मंडळींपैकी प्रत्येकास आपण

अिथं आल्यासारखं कांहीतरी संपादन केलं असं वाटेल व ते आपआपल्या गावीं परत जातांना नव्या अुमेदीचं अेक भलं मोठं गाठोडं बरोबर घेअून जातील. त्यांचं मानसिक क्षितिजहि बरंच विस्तृत होअील. त्यांची आपसांतील तेढ दूर होअून त्यांच्यामधे मित्रत्वाचं नातं दिसून येअूं लागेल व अधिकाधिक संघटित रीतीनं ते काम करूं लागतील. अशा प्रकारें साहित्यसेवकांची कार्यक्षमता वाढवण्याचं काम संमेलनानं पार पाडलं म्हणजे महाराष्ट्र-साहित्याची वाढ आणि प्रगति हींहि अधिक झपाट्यानं घडून येतील याबद्दल तिळप्राय संदेह नाही."

दाजी बोलूं लागला म्हणजे त्याच्या डोकेबाजपणाचें कौतुक वाटतें. या वेळीं त्याने आपल्या काल्पनिक संमेलनाची जी रूपरेषा सांगितली ती कौतुकास्पद नाही असें कोण म्हणेल? आणि कोणाच्या खटपटीने असें संमेलन झालेंच तर त्याच्याकडून मोठी कामगिरीहि खचित घडून येअील.

तिलाहि दाजीची ही योजना अैकून मौज वाटली आणि ती म्हणाली, "खरंच भाअूजी, तुमची ही योजना सांगण्यासाठी तरी तुम्ही साहित्यसंमेलनाला चला."

"साफ येणार नाही!" दाजी दणाणला, "वेळ घालवायला दुसरं कांही साधन नसलं तर स्वस्थ पडून राहीन घरीं!"

त्याच्या या अुत्तराने तिला अेक मोठेंच कोडें अुलगडल्याचा आनंद झाला. टाळी वाजवून आणि हसून ती म्हणाली, "आता आलं माझ्या लक्षांत! घरांतनं पाय बाहेर निघत नाही आहे स्वारीचा दुसरं काय? काय मेलं तरी! लोकांचीं लग्नं होतात अन् त्यांना बायका असतात की नाही म्हणतें मी!"

या तिच्या टोमण्यासरशी दाजी चमकला आणि ताड्कन् अुठून तो म्हणाला, "तुम्हाला वाटतं तशांतला मी मुळीच नाही, वैनी!"

आणि अधिक न बोलतां तो अुठूनहि गेला.

मी संध्याकाळीं घरीं येतों तों मला कळलें, की दाजी कांहीं विशेष कारणासाठीं कुठल्याशा गावास निघून गेला. त्याचें आकस्मिक निघून जाण्याचें कारण काय असावें आणि तो कोठें गेला असावा याबद्दल आमचे तर्कवितर्क चालूच होते, तितक्यांत अेक पत्र त्याच्या टेबलावर सापडलें. त्या पत्रानें आमची काळजी दूर केली. दाजी निघून गेला होता तें तिच्या संशयाप्रमाणें आपण स्त्रीलंपट नाहीं हें दाखविण्यासाठीच. आणि भरपूर महिनाभर घराबाहेर राहून तो कांहीं ग्रंथ-लेखन करणार होता.

" नेहमीच्यांतलाच प्रकार आहे हा ! " असा शेरा तिनें मारला आणि आमची दिनचर्या व्यवस्थितपणें चालू झाली.

आणि दाजीच्या अभावीं आम्ही दोघेंच साहित्यसंमेलनास गेलों.

साहित्यसंमेलनाच्या आपल्या सफरीचें वर्णन करून वाचकांना शिणविण्याची माझी अिच्छा नाहीं. पण माझ्या दृष्टीनें महत्त्वाची अशी अेक गोष्ट मला सांगावयाची आहे आणि वाचकांना अधिक बुचकळ्यांत न ठेवतां मी सांगून टाकतों, की दुसरे दिवशींच्या अधिवेशनाचा प्रारंभ होण्यापूर्वी व्यासपीठावर दाजीनें घटकाभर जो चमत्कार करून दाखवला, त्याचेंच मी थोडक्यांत वर्णन करणार आहे.

आम्ही साहित्यसंमेलनास जाणार ही गोष्ट दाजीस माहीत होती; पण त्याचें तेथें आगमन होअील ही आम्हास कल्पनाहि नव्हती ! पहिले दिवशीं स्वागताध्यक्ष व अध्यक्ष यांच्या भाषणांचा मुख्य कार्यक्रम होता व त्या मोठ्या मेजवानीची श्रोतृवर्गास मिठी बसूं नये म्हणूनच की काय, कांहीं कवींच्या कवनगायनांचें लोणचें मधूनमधून वाढण्यांत येत होतें. मी काव्याचा हावरा भक्त नाहीं, तथापि माझ्या आजूबाजूच्या आपापसांतील कुजबुजीवरून 'अवधूत' कवींच्या कवनांची श्रोत्यांच्या अंतर्यामीं बरीच तळमळ लागलेली असावी असें अनुमान मला बिनदिक्कत करतां येण्याजोगें होतें.

प्रथम मुलांमुलींनी शारदावंदन गाअिलें आणि त्यानंतर 'महाराष्ट्रगीत' नुसत्या मुलींनीच म्हटल्यावर स्वागताध्यक्षांनी आपलें छापील

भाषण वाचून दाखविलें. अध्यक्षीय भाषणाची अुत्कंठा आता लवकरच पुरी होणार या आनंदांत श्रोतृवर्ग आहे, अितक्यांत चालकांपैकी अेका प्रतिष्ठित गृहस्थांनी जाहीर केलें, की मुख्य कार्यक्रमापूर्वी दोघे सुप्रसिद्ध कवि आपल्या वेचक कविता स्वतः गाअून दाखविणार !

कवि आणि काव्यगायन हे शब्द अैकतांच श्रोतृवर्गांतून अेकच आरोळी अुठली, " अवधूत ! अवधूत ! "

घोषणा करणारे चालकहि आजूबाजूस पाहून ओरडले, " अवधूत ! अवधूत ! "

या ' अवधूत ' गजराने मी चांगलाच गोंधळलों. मी नृसिंह-वाडीच्या दत्तासमोर तर नाही, अशी माझी मलाच शंका वाटली ! आणि दुसरीहि अेक कल्पना माझ्या डोक्यांत चमकून गेली, की ' अवधूत ' नामक सत्पुरुष सभागृहांत आला असून त्याचे भालदार-चोपदार त्याच्या नांवाची ललकारी देत आहेत की काय ?

पण लवकरच अेक निमगोरा, स्थूल बांध्याचा आणि तीसपस्तीस वर्षांचा गृहस्थ स्मित करीत अध्यक्षीय टेबलापाशी येअून अुभा राहिला; आणि लवकरच मला कळून चुकलें, की ज्याच्या नांवाचा आतापर्यंत आरडा चालू होता तो अवधूत नांवाचा गृहस्थ हा, तो कवि असून आता कवितागायन करणार आहे. अवधूत कवींचें कवितागायन श्रोतृवर्गास खूपच आवडलें. कारण दरेक कडव्या-गणीक टाळ्या पडत होत्या आणि हास्याला पूर येत होता. मला मात्र हसण्याजोगें त्यांत कांही आढळलें नाही ! अेवढेंच नव्हे, तर घोळून-घोळून आणि आविर्भाव करीत म्हटलेल्या कवितेचा अर्थबोधहि नीटसा झाला नाही. त्या कवितेंतील स्थळ, काळ व व्यक्ति यांचा पर-स्परसंबंध शोधून काढण्याचा अुपद्व्याप वाचकांच्या मेंदूस लावण्याचा मोह अनावर झाल्यामुळेच मी ती पुढे देत आहें—

चाल– ( गोकुळिंचा कान्हा० )

बाभळिचा काटा पाया बोचला कि काय ग ऽ ऽ ? ॥

वाढलें दाट निवडुंग
झाकलें सृष्टिचें अंग
याच रम्य देखाव्याची हौस कां तुला ग ? ॥
बाभळिचा ० ॥

शेळि चरे रानोमाळीं
कीर्तनांत देती टाळी
घार फिरे आकाशीं ती पाहिलीस काय ग ? ॥
बाभळिचा ० ॥

गुंजांच्या घाली माळा
देवकिच्या दिवट्या बाळा
फुंकणीच फुंकोनीया मुरलिगीत गात ग ॥
बाभळिचा ० ॥

पोवळ्यांत मधमाशांनी
मेण किती भरलें त्यांनी
येत नाहि आश्चर्याची लाट कां मनीं ग ? ॥
बाभळिचा ० ॥

वाचकांना या कदाचित् भाकडकथा वाटतील; आणि माझ्या मुख्य कथेशीं संबंध नसता तर मीं यांतलें अक्षरदेखील सांगितलें नसतें. पण दुसऱ्या दिवशीं या अवधूत कवींच्या जागेवर हातांत अेक लठ्ठसें बाड घेअून बसलेला दाजी मला दिसला ! ध्यानीं, मनीं आणि स्वप्नींहि नसतांना हें दाजीदर्शन झालें आणि तेंहि अशातशा स्थितींत नसून साहित्यसंमेलनाच्या सन्मान्य अध्यक्षांच्या थेट पाठीमागे ! मीं तिच्याकडे प्रतिनिधींच्या घोळक्यांत नजर टाकली, तर तीहि मान वर करून चकित नजरेने माझ्याकडेच पाहात असलेली मला दिसली !

पुढे काय होणार हा प्रश्न माझ्यापुढे डोके वटारून अुभा राहिला.

अद्यापि अध्यक्ष यावयाचे होते. तरीपण ते दहापांच मिनिटांत येणार असे दर्शविणारी त्यांची पुरःसर ध्वजा – कवि अवधूत – सभागृहांत आले. कारण अध्यक्षांच्या आजूबाजूलाच वावरण्याचा त्यांचा खटाटोप कुणाच्याहि लक्षांत येण्याजोगा होता.

आपल्या जागीं बसलेल्या अनोळखी व्यक्तीस पाहून कवि बिचकले! लवकरच धीर धरून ते दाजीपाशी गेले आणि त्यास ते कांहीतरी बोललेले दिसले. दाजीने नकारदर्शक मान हालवली. कवि मागे जाअून चालकांपैकी अेकाच्या कानास लागले. चालक दाजीकडे गेले व त्यांनी त्याला कांही सांगतांच दाजीने पूर्ववत् नकार दिला. चालक गरम झाले आणि अितका वेळ आम्ही पाहात असलेल्या मूक चित्रपटाचें टॉकींत रूपांतर झालें!

"ही जागा यांची आहे." – चालक.

"अिथं मिरासदारी चालायची नाही." – दाजी.

"आम्हांला कायदा शिकवतां?" – चालक.

"पाहिजेच शिकवायला." – दाजी.

"असे तुम्ही कोण शिष्ट लागून गेलां?" –चालक.

"ज्यांच्यासाठी तुम्ही अितका जीव तोडतां त्यांची शिष्टगिरी तरी कळूं द्या!" –दाजी.

"यांची योग्यता जगजाहीर आहे. हे कवि अवधूत." – चालक.

"यांची योग्यता मुळीच जगजाहीर नाही. कारण, यांचं नांव मीं कालपर्यंत अैकलंदेखील नव्हतं! आणि काल यांचं नांव आणि यांचं काव्यगायन अैकल्यावर यांची योग्यता विशेष आहे, असं मला वाटत नाही. आणि तुम्ही योग्यतेकडे पाहणार असाल तर अिथं बसण्याचा माझा अधिकारच अधिक ठरेल." – दाजी.

"म्हणजे?" – चालक.



“ ही जागा यांची आहे. ” – चालक.
“ अिथं मिरासदारी चालायची नाही. ” – दाजी. [पान १०२]

"अर्थ न कळण्याजोगं मी कांहीच बोललों नाही." – दाजी.

"पण अिथून जागा सोडून तुम्हाला अुठावं लागेल. स्वागतसभेच्या सभासदांची ही जागा आहे. प्रतिनिधींची जागा खाली आहे." – चालक.

"मग ज्यांच्यासाठी तुम्ही मला अुठवूं पाहतां ते गृहस्थ तरी स्वागतसभेचे सभासद आहेत का? दाखवा पाहूं त्यांचं तिकीट?" – दाजी.

चालक, कवि अवधूत अेकमेकांकडे पाहतात!

"असं पाहून काय होणार आता? या राजश्रींनीहि माझ्यासारखंच प्रतिनिधीचं तिकीट काढलं आहे. त्यांचा नंबर ३४२ आहे. माझ्यानंतर पहिलंच तिकीट यांचं आहे, हें मीं प्रत्यक्ष पाहिलं आहे. मग अेकाच अधिकाराच्या दोन माणसांत असा पक्षपात कां? तुमची ही अरेरावी घरांत चालेल; या सार्वजनिक ठिकाणीं मी ती बिलकूल चालू देणार नाही!"

दाजीचें हें निर्वाणीचें बोलणें अैकून चालकमहाशयांचा चेहरा लाल झालेला दिसला. ह्या वेळपर्यंत त्यांचे व कविवर्यांचे दोनचार सगेसोयरे तेथे गोळा झाले आणि दाजीच्या चर्येवरहि करारीपणाची वाढ झाल्याचें मला आढळलें. आता हें प्रकरण हातघाअीवर येण्याचें चिन्ह दिसूं लागलें; आणि आपण पुढे होअून दाजीला तेथून काढून आणावें असें मला वाटूं लागलें. त्यासाठी मी खुर्चीवरून अुठणार तोंच अध्यक्ष आणि त्यांना जडलेला गोतावळा सभास्थानीं दाखल झाला. मला वाटलें, ही मधली भानगड आता आपोआपच बंद पडेल.

दोन्ही पक्ष निकरावर आले असल्याने समेट होअूं शकला नाही. दाजीला स्थानभ्रष्ट करण्याचा चालकांनी चंग बांधलेला, तर धरलेल्या जागेवर अढळ राहण्याचा दाजीनें निश्चय केलेला!

"बऱ्या बोलानं जागा खाली करा, नाहीतर सक्तीनं अुठवावं लागेल!" चालकांनी तंबी दिली.

"अध्यक्ष स्थानापन्न झाले आहेत. अर्थात् सभा आणि सभागृह यांचं नियंत्रण त्यांनी करायचं आहे. लुंग्यासुंग्यांची टुरटुर आता चालायची नाही!"

दाजीने हा कायदेशीर पेच घातला आणि याच वेळीं आपल्या पाठीशीं चाललेल्या या कुरबुरीकडे अध्यक्षांचें लक्ष गेलें. चालकांनी त्यांच्या कानांवर सारा प्रकार घातला.

" आपलं म्हणणं काय आहे ? " – अध्यक्ष.

" माझं म्हणणं कांहीच नाही. " – दाजी.

" मग आपण अिथं कशासाठी आला ? " – अध्यक्ष.

" साहित्यसंमेलनासाठी. " – दाजी.

अध्यक्ष व रागावलेले चालकहि या अुत्तराने थोडे हसतात.

" तसं नव्हे, पण ही तुम्ही बसलेली जागा कांही विशिष्ट आणि नामवंत साहित्यसेवकांकरिता राखून ठेवलेली असते. सभेच्या कामकाजांत अध्यक्षांना त्यांची वरचेवर मदत लागते, अेवढ्यासाठी ही सोय आहे. " – अध्यक्ष.

" मलाहि प्रथम तसं वाटलं; पण अिथं काल बसलेल्या व्यक्तींत वैशिष्ट्य नाही; असलंच तर शहाणपणाअैवजी टारगटपणाच आहे. त्यांची आपल्याला मदत तर व्हायची नाहीच, पण त्यांच्या वेळीं अवेळीं होणाऱ्या काव्यगायनानं सभेची गंभीरता नष्ट होते आणि निरर्थक कालहरण होतं, असा प्रत्यक्ष अनुभव असल्यामुळंच मी अिथं येअून बसलों. मीहि साहित्यसेवक आहे आणि आज नामंवत नसलों तरी अुद्या माझं नांव महाराष्ट्राला मशहूर होअील. माझ्या वाङ्मय-सेवेची आपण वाहवा कराल. "

वरीलप्रमाणे दाजी बसल्या जागेवरूनच आत्मसमर्थन करीत होता. अध्यक्षांनी त्याला पुढे बोलाविलें व लोकांनीहि- 'पुढे या', 'पुढे या' असा गिल्ला केला. तेव्हा दाजी पुढे आला, पण खुर्चीसकट आला! आणि तो बोलत असतांना त्याने आपला डावा पाय त्या खुर्चीवर जणू रोवून ठेवला होता. त्याच्या या लढाअू वृत्तीला लोकांनी चांगल्याच टाळ्या दिल्या! मग त्या कौतुकाने की अुपहासाने तें राम जाणे!

ही और व्यक्ति कोण, हें समजावून घेण्याची अध्यक्षांनाहि अितरांप्रमाणे अिच्छा झाली. आणि त्यांनी म्हटलें,

" आपला परिचय नसल्यामुळं आमच्याकडून चूक होण्याचा संभव आहे. तो आपण करून द्याल तर आपल्या योग्यतेप्रमाणं आपला मानमरातब ठेवण्यांत आम्हांला आनंदच वाटेल. आपलं नांव, गाव, आपली वाङ्मयकृति—"

" माझं नांव-गाव अिथं अनावश्यक आहे. ती चौकशी अुपवर मुलींच्या बापांनी वरसंशोधनाच्या वेळीं करावी. साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षांनी असल्या भुसाभरींत पडण्याचं कारण नाही. माझ्या वाङ्मय-कृतीबद्दलची आपली पृच्छा रास्त आहे. ही माझी ताजी वाङ्मयकृति." दाजीने आपलें जाडजूड बाड अध्यक्षांच्या टेबलावर ठेवलें. ठेवलें कसलें ? आदळलेंच !

वेब्स्टरच्या डिक्शनरीपेक्षाहि दीडपट आकाराचें तें बाड होतें. आणि तें कातडी पुठ्ठयांत बांधविलें असल्याने तें छापील पुस्तक असावें असें कोणासहि वाटलें असतें.

" अध्यक्षमहाराज, त्या ग्रंथराजाचं नांव जाहीर करा." अेक आवाज.

"**हस्तलिखित सम्यग्व्यवहारज्ञान !**" तीन ठिकाणीं अडखळत अध्यक्षांचें अुत्तर.

" भले बहाद्दर !" दुसरी अेक आरोळी.

श्रोतृवर्गाचा कांही वेळ हशा !

" लेखकाचं नांव ?" तिसरा सवाल.

" ले—ख—क. या सम्यग्व्यवहारज्ञानाचे लेखक ?" अध्यक्ष हस्तलिखिताचीं पानें अुलटूं लागतात. पण नांव दिसत नाही म्हणून ते दाजीस पृच्छा करतात, " काय सांगायचं हो नांव ?"

" व्यवहारज्ञानाचे लेखक व्यवहारशून्य !" अध्यक्षांच्या जवळून कोणींतरी म्हटलें. बहुतेक हें अुत्तर देणारे कवि 'अवधूत' असावे असें पुष्कळांना वाटलें.

खूप मोठा हशा. दाजीचा त्वेष अनावर होऊन तो कडाडला,

" लेखक व्यवहारशून्य नाही. पंडित म्हणविणारांच्या सभेपुढे 'बाभळिचा काटा पाया बोचला की काय ग?' असल्या गचाळ कविता म्हणून दाखवणाऱ्याअितका मी खास व्यवहारशून्य नाही. पण असल्या वेडेचारावर लोभ करणाऱ्या आणि अभ्यास, बुद्धि आणि परिश्रमांनी लिहिलेल्या ग्रंथाची कुचेष्टा करणाऱ्या व्यवहारशून्यांच्या घोळक्यांत दुर्दैवानं आलों मात्र आहें! पण ही पाहा माझी चूक मी क्षणांत सुधारून दाखवतों." असें म्हणून दाजीने आपलें प्रतिनिधित्वाचें तिकीट टरकावलें, आपलें हस्तलिखित अध्यक्षांच्या हातून फसूकन् हिसकावलें आणि सभामंडपाच्या बाहेर मोर्चा वळवला!

आमची टेहळणी त्याने केव्हा केली होती कोण जाणे. पण आम्हां दोघांकडे दृष्टि फेकून त्याने हटकलें, " कशाला बसतां अिथं या वेड्यांच्या बाजारांत? यापेक्षा अितरीं प्रेक्षणीय स्थळं पाहण्यांतच काळाचा सदुपयोग होअील."

सर्व प्रेक्षक माझ्याकडे टवकारून पाहात आहेत असा मला भास झाला. पण आपण त्या गावचेच नव्हे, असा सफाअीदार बहाणा मी करीत होतों!

★ ★ ★



# दाजीचें प्रपंचकौशल्य

दाजीचा आयुष्यक्रम आनंदांत चालू होता. आम्हां अुभयतांना त्याच्या ज्या अेका बाबतींत कल्पनेबाहेर समाधान वाटत होतें, तें म्हणजे दाजी आणि त्याची बायको यांचें परस्परांवरील प्रेम. त्याच्या लग्नाच्या वेळीं मला भीतीच वाटत होती. दाजीची वृत्ति म्हणजे वळवाचा पाअूस. त्याचा जसा कांही भरवसा धरतां येत नाही, तसा दाजीच्या लहरीचाहि मला विश्वास वाटत नव्हता. दुसऱ्याने भरीस घातल्यामुळे असो अगर स्वयंप्रेरणेने असो, तो लग्नाला अुभा राहिला खरा, पण त्यामुळे त्याच्यावर येणारी जबाबदारी तो कशी काय पार पाडणार? आणि चार दिवसांनी त्याला बायको नकोशी होणार नाही म्हणून तरी कशावरून?

काय होअील काय की, अशी मला वाटत असलेली धास्ती आता नाहीशी झाली; अेवढेंच नव्हे, तर दाजी व सरलाबाअी यांचीं मनें न फाटण्याजोगीं अेकजीव झाल्याचें प्रत्यंतर मला अनेक प्रकारें आलें. दाजीची तबियत खूष राखण्यासाठी सरलाबाअी घेत असलेली खबरदारी आणि तिच्या रंजनार्थ दाजी ठेवीत असलेली दक्षता आमच्या चौकस दृष्टींतून सुटण्याजोगी नव्हती. तरीपण ती माझ्याअितकी आशावादी नव्हती. अेकदा कशावरूनसें ती दाजीला म्हणाली, "तुम्हां पुरुषांच्या प्रेमाचं कांही सांगूं नका मला. आत्ता गळ्यांत गळे घालाल तर घटकेंत गळा कापायला तयार व्हाल!"

" अितर पुरुषांचं मला कशाला सांगतां ? मी असं भुरटं प्रेम करणारा प्राणी नाही. ज्याच्यावर अेकदा प्रेम केलं त्याच्यावर मरे-पर्यंत करीन. "

" म्हणजे प्रेम करूनच त्याचा जीव घ्याल ! " तिने ' मरेपर्यंत ' या दाजीच्या शब्दावर कोटी करून म्हटलें.

पण तिच्या थट्टेकडे आणि दाजीच्या आत्मसमर्थनाकडे माझें लक्ष नव्हतें. दुसरा अेक विचार माझ्या डोक्यांत घोळूं लागला होता. तो म्हणजे, दाजीच्या आयुष्याची पुढे वाट काय ? वर्ष सहा महिने निरुद्योगी राहिला तरी त्याचा भार मला झेपण्यासारखा नव्हता असें नाही; पण परावलंबी जिणें त्यालाच हितप्रद नव्हे आणि ज्याची जबाबदारी त्याच्यावर असली म्हणजेच मनुष्य ताळयावर राहतो, असें मला वाटत होतें. आपल्यापुढे करावयास काम नाही आणि काम न करतांहि आपलें चालू शकतें, अशी अेकदा माणसाची समजूत झाली, की त्याच्या डोक्यांत निरर्थक व प्रसंगीं हानिकारक कल्पना संचार करूं लागतात. अेवढ्याचसाठी दाजीने कांहीतरी काम मिळवून शक्य तितक्या लवकर आपल्या संसाराचें जू आपल्या मानेवर घ्यावें, असें मला वाटत होतें.

पण हा प्रश्न त्याच्यापुढे काढण्याची माझी छाती होत नव्हती. माझ्या म्हणण्याचा आशय त्याला कळला नसता असें मी म्हणत नाही; पण त्यांतून भलताच अर्थ त्याने काढला नसता, अशीहि ग्वाही मला देतां येण्याजोगी नव्हती. कारण, त्याच्या मेंदूतून कशाचा काय अर्थ निघेल हें ब्रम्हदेवाच्या बापालाहि कळावयाचें नाही ! ओघाला आलें आणि सहज आठवलें म्हणून सांगतों—

दोनअेक वर्षें झालीं असतील या गोष्टीला. महाशिवरात्रीचा सुमार होता. साहजिकच, थंडी कोण पडत होती ! सकाळीं लवकर जाग येअी आणि दाजी अुठून अिकडचा तिकडचा पाचोळा गोळा करून मागील दारीं शेकोटी पेटवून बसे.

अेक दिवस दाजीचें डोकें सपाटून दुखूं लागलें व त्याने अंथरूण पंसरलें. तिला वाटलें, फॉर्माल शेकल्यामुळेच पित्त वाढलें आणि म्हणून ती म्हणाली, " शेकत बसण्यापेक्षा जाड रग पांघरून झोपत कां नाही भाअूजी तुम्ही ? तुमचं हें शेकणं थोडा वेळ बरं वाटलं तरी तें जास्त होतां कामा नये. सगळ्यांनाच त्रास होतो त्याचा."

ती हें सहज व सरळ मनाने बोलून गेली; पण परिणाम काय झाला ?

दुसरे दिवशीं सकाळीं अुठून पाहातों तों दाजी अंगणांत अगदी अुघड्यावर कुडकुडत पडलेला ! अंथरण्यास अेक पातळशी सतरंजी आणि पांघरण्यास अेक झिरझिरीत पंचा ! तें पाहतांच तिच्या मनाला धक्का बसला व " अगबाअी ! हें काय भाअूजी ! " असे अुद्गार तिच्या तोंडून घाबऱ्याघाबऱ्या बाहेर पडले.

तिचे ते अुद्गार मला अैकूं आले आणि पांघरुणांतून अंग बाहेर काढणें जिवावर येत होतें तरीहि मी लगबगीने काय प्रकार आहे हें पाहण्यासाठी अंगणांत धावलों.

" हा रे काय तुझा भलताच वेडेपणा ? " मीं रागाने त्याच्या अंगावरचा पंचा खसकन काढून विचारलें.

" शेकून वाढलेली अुष्णता आणि पित्त घालवण्यासाठी मी हा थंड अुपाय करतों आहे. " तिच्याकडे रागाची नजर टाकून त्याने अुत्तर दिलें.

" कांही सांगायला गेलं की टांगायला नेतां तुम्ही, भाअूजी ! अिश्श ! " असें म्हणून तीहि तावातावाने आंत चालती झाली.

या सर्व प्रकाराचा अुलगडा मला चहाच्या वेळीं झाला.

आणि या अनुभवाची माहिती मला होती म्हणूनच " आता तुझा पुढचा विचार काय ? " असें दाजीला विचारण्यास मी धजत नव्हतों. पण माझ्या पुढे पडलेला पेच लवकरच आणि आकस्मिकपणें सुटला.

पांडवगांवाला बन्याबापू बर्वे नांवाचे माझे अेक स्नेही हायस्कुलांत हेडमास्तर आहेत. त्यांचें मला पत्र आलें. त्यांना अिंग्रजी व संस्कृत शिकवणारा अेखादा हुषार माणूस हवा होता आणि तसा माझ्या माहितींत कोणी आहे की काय, अशी त्यांनी पृच्छा केली होती. तो पदवीधर असलाच पाहिजे असा त्यांचा आग्रह नव्हता. आणि सुरवातीचा पगार दरमहा पंचेचाळीस रुपये देण्यास व पुढे यथाक्रम बढती देण्यास ते तयार होते. बन्याबापूंचें पत्र म्हणजे मला अीश्वरी वरदान वाटलें आणि मीं तें दाजीपुढे टाकून त्याच्या अुत्तराची अपेक्षा करीत बसलों.

दाजीनें पत्र वाचलें. सुगंधि आपण होअून चालत आलेली पाहून दाजीला खूप हर्ष होअील ही माझी कल्पना खोटी ठरली. किती वेळ तरी तो बन्याबापूंचें पत्र वाचीत होता. त्याच्या चेहऱ्या-वर माझी बारीक नजर होती. आणि जेव्हा आनंदाअैवजीं दाजीची चर्या संशयानेच ग्रासलेली मला दिसली, तेव्हा माझ्या पोटांत धस्स झालें !

" अेवढा हेडमास्तर म्हणवतो, पण पत्र स्पष्टार्थबोधक लिहि-ण्याचीहि अक्कल नाही बेट्याला ! " पत्र माझ्याकडे भिरकावून दाजी म्हणाला.

" मला तर त्यांत कांही अस्पष्टपणा दिसत नाही. "

" नाही काय ? " मला आडवून तो म्हणाला. " ही नोकरी हंगामी आहे की कायमची, हा खुलासा नको होता का करायला ? हंगामी असेल तर आपल्याला मुळीच जरूर नाही. कायम असेल तर पाहतां येअील. "

दाजीच्या अुत्तराने मला आनंद तर झालाच; पण आश्चर्यहि वाटलें. आपल्यावरील जबाबदारीची जाणीव त्याला झाली आहे आणि ती जबाबदारी पार पाडण्यास तो सिद्ध आहे, या गोष्टी त्याच्या या अुत्तरावरून मला अजमावतां येत होत्या. तरीपण खात्री करून घेण्यासाठी मी म्हणालों,

" कशाला कायमची ? हंगामीच बरी. नाही पटलं, दिलं सोडून. बेलाला दुःख नको अन् वाळक्याला नको ! "

" पण पाठीवर बिऱ्हाड घेऊन डोंबाऱ्यासारखं हिंडणार कोण गावोगाव ? " दाजी म्हणाला, " तें कांही नाही. आता श्री अेक जागा धरायची ती मरेपर्यंत ! "

" भलतंच कांहीतरी ! मी मुद्दाम ओढून धरीत होतों, " हवा-पाणी नाही मानवलं किंवा अधिक पगाराची दुसरी नोकरी आली– "

" छट् ! माझ्यापुढं याबद्दल अक्षराक्षरहि काढूं नका. प्रकृतीची पिरपिर सांगणारा अथवा पैशाची भुरळ पडणारा मला तुम्ही कुणी लेचापेचा मनुष्य समजतां की काय ? "

आता अधिक ताणण्यांत अर्थ नव्हता. दुसऱ्याच दिवशीं माझें पत्र घेअून दाजी पांडवगावीं रवाना झाला. दाजीची सर्व बाजूंनी प्रस्तावना मीं पत्रांत केली होती व बन्याबापूंनी ती लक्षांत घेअून पहिला मुलाखतीचा समारंभ अुरकून घेतला. त्यामुळे कसलेंहि कुलंगडें अुत्पन्न न होतां दाजी आपल्या कामावर रुजूं झाला.

चार दिवसांनी दाजींचें पत्र आलें. त्यांत काम ठीक चालल्याचें व प्रकृति चांगली असल्याचेंच वृत्त नव्हतें, तर पुढील खुलासा दाजीने केला होता–

" पांडवगावच्या हमरस्त्यावर आणि चांगल्या लोकांच्या शेजारीं बिऱ्हाडाची जागा मिळाली. भाडें माफक तर आहेच, पण हवा, अुजेड, पाणी वगैरे प्रापंचिकास अत्यावश्यक सुखसोयीहि अुत्तम आहेत. सड्या पुरुषास जागा न देण्याचा घरवाल्याचा हट्ट आमच्या हेडमास्तरांनी दूर केला आणि आम्ही लवकरच सहकुटुंब राहूं लागूं, असें आश्वासन दिल्यावर त्यांनी आढेवेढे घेतले नाहीत. "

या खुलाशाचा आशय न कळण्याअितका का मी मंदबुद्धि होतों ? पुढच्याच रविवारीं सरलाबाअीला मी पांडवगावीं पोचवून आलों.

आमचा जीवनक्रम पूर्ववत् चालू झाला. आठपंधरा दिवसां दाजींचीं पत्रें येत. कधी सरलाबाअीहि तिला लिही. पण तीं पत्रें

पुरतीं वाचून होईपर्यंत आमच्या जिवांत जीव नसे. त्याने 'कांही कुलंगडें अुपटून तर केलें नसेल?' ही भीति आमच्या मनांत अितकी दृढमूल झाली आहे, की जसे कांही अंगावर अुठलेले देवीचे वणच !

आमचींहि त्याला पत्रें जात. त्यांत साध्या क्षेमसमाचारा-बरोबर कांहीतरी अुपदेशात्मक भाग गोवण्याचा मोह मला अनावर होअी. अेका पत्रांत मीं लिहिलें, "नोकरीच्या कामीं शक्ति आणि बुद्धि-सर्वस्व खर्च करणें हें केव्हाहि रास्तच; पण त्यामुळे स्वतःचें घर आणि प्रपंच यांकडे दुर्लक्ष होतां कामा नये. नेटका प्रपंच करणें हेंच गृहस्थाश्रमाचें सार होय."

माझ्या पत्राचें मला जें अुत्तर आलें त्यांत दाजीने अेवढेंच लिहिलें होतें, "समक्ष येअूनच पाहण्याची अुभयतांना विनंती आहे."

दाजीचीं आग्रहाचीं बोलावणीं अनेकदा आल्यामुळे चार दिव-सांची सवड काढून आम्हांस त्याच्याकडे जावेंच लागलें. आणि पांडव-गावचें दाजीचें घर आणि सरलाबाअीचा नीटनेटका संसार पाहून आम्हां अुभयतांनाहि आनंद झाला.

त्या मुक्कामांत माझ्यापेक्षा तिच्याकडे दाजीचें लक्ष अधिक दिसलें आणि तें साहजिकहि होतें. आपला संसार तिला दाखवावा व आपण अुभयतां लहान व अननुभवी असूनदेखील तो किती सुंदर करतों अशी शिफारस तिच्या तोंडून वदवावी, असा दाजीचा प्रयत्न सारखा चालू होता.

ती कांही गोष्टींबद्दल दाजीची वाहवा करी, तर कांही गोष्टीं-बद्दल नाकहि मुरडी. आणि तेवढ्यावरून दोघांचा वाद जुंपत असे. कशावरून तरी असा वाद सुरू असतां ती म्हणाली, "मला का अक्कल शिकवतां तुम्ही भाअूजी? काल चूल मांडली तुम्हीं. मी आज दहा वर्षं संसार करतें आहें."

"तुमचीं दहा वर्षं आणि या दाजीचे दहा दिवस बरोबर आहेत, वैनी! अुष्टळ म्हणजे जेवणांतील अनावश्यक बाब. तिच्यावांचून

माणसाचं मुळीच अडत नाही. पावटे, वाटाणे असल्या कडधान्यांच्या पायीं आपला अन्नखर्च शेकडा पंधरा टक्के वाढतो."

दोघांचा आणखीहि पुष्कळ वादविवाद झाला; पण निर्णय असा कांहींच ठरला नाही. आणि तो ठरणार तरी कसा ? तिला अनुभवाचा पाठिंबा होता व दाजीच्या तोंडीं गणितशास्त्र होतें. दाजीची दुसरी अेक गोष्ट म्हणजे आपलें म्हणणें कालत्रयींहि सोडायचें नाही असा त्याचा जन्मस्वभाव होता !

हिशेबाने पाहिलें तर दाजीचीं विधानें मलाहि खोडून काढतां येत नव्हतीं. आता कार्यवाहींत तीं बरोबर किती ठरतात हेंच मला पाहावयाचें होतें व तो योग लवकर आलाहि. दाजीची दाजीगिरी आमच्या अनुभवास हळूहळू येअूं लागली. आम्ही जेवावयास बसलों, जेवणें निम्मीं झालीं आणि कंदील आपोआप विझला. त्यांत तेल नसल्याचें दिसून आलें. " असं कसं झालं बुवा ! " असे त्याचे अुद्गार आम्हांला अैकूं आले. अंधार असल्यामुळं त्याचा चकित चेहरा आम्हांला दिसूं शकला नाही, तरीपण तो त्या वेळीं कसा झाला असावा हें आम्ही अजमासाने जाणूं शकलों.

वातीची रुंदी, ज्योतीचा परीघ आणि अग्नीची ओढ यांचें गणित करून अेका तासांत कंदिलांत जास्तींत जास्त किती तेल जळूं शकेल याचें बरोबर माप दाजीने काढलें आणि आपल्याला दोन तास बेचाळीस मिनिटांना लागेल अितकें तेल त्याने कंदिलांत भरलेंहि होतें. हिशेबाने पाहिलें तर अजून पाअूण तास तरी कंदील जळत राहणें भाग होतें. मग त्याचा हा अपमृत्यु कसा झाला ?

पहिली गोष्ट, दाजीने स्वतःच्या अजमासाने धरलेलें प्रमाण बरोबरच आहे अशी खात्री नव्हती. दुसरी गोष्ट, कंदिलांतून जळण्याप्रमाणे गळण्यानेहि तेल संपणें शक्य आहे अिकडे त्याने लक्ष दिलें नव्हतें. या दुहेरी कारणामुळे दाजीचा हिशेबीपणा अंगाशीं आला आणि पाहुण्यांची पंगत त्याला काळोखांत बसवावी लागली.

"हिशेबापेक्षा दहा टक्के अधिक धरले पाहिजेत" असें दाजीनें आपण होऊन कबूल केलें तेव्हा ती विजयानंदाने म्हणाली, "मला अधळी ठरवांत होतां, नव्हे का? पण कशी झाली फजिती! आता आपण होऊन वाढ करायला तयार झाली स्वारी!"

दाजीने आपला पराजय कबूल केला नाही. तो तिच्याअितक्याच आवेशाने म्हणाला, "तरीपण पांच टक्क्यांची कूस आहे अजून."

"तीहि निघेल लवकरच." मी मध्येच म्हणालों.

चार दिवसांच्या आमच्या मुक्कामांत कांही बाबतींत दाजीचा विक्षिप्तपणा दिसला तरी कित्येक गोष्टींत माझ्यासारख्या सराअीत प्रापंचिकानेहि त्याच्यापासून धडा घेण्याजोगें कांही आहे असें मला आढळून आलें. वेळीं अवेळीं बाहेरचा मनुष्य आला की चहा करण्याची पद्धति दाजीने काटेकोरपणें बंद केली होती. सकाळीं किंवा दुपारीं मधल्या सुट्टींत कोणी स्नेहीसोबती चहाच्या वेळीं आला तर दाजी आग्रहाने चहा देअी. पण अितर वेळीं कोणी धरणें धरून बसलें तरी दाजी दाद देत नसे!

दाजीचा आणखी अेक रिवाज मला मनापासून आवडला. तो म्हणजे जेवणाच्या वेळा बिनचूक पाळण्याचा. सकाळीं साडेदहा आणि संध्याकाळीं सात वाजतां जेवणें अुरकलींच पाहिजेत. पुरुषांचा अनियमितपणा बायकांना त्रासदायक होतो, अशी दाजीची तक्रार. त्या तक्रारीला आपल्या घरीं थारा न देण्याची दाजीने खबरदारी घेतली होती.

सर्वांना घेण्याजोगा गुण म्हणजे ऋण काढावयाचें नाही हा. अेवढ्यासाठी त्याने दरमहाचें अंदाजपत्रक करून त्याप्रमाणे खर्च करावयाचा नियम पाळला होता. पैशाच्या बाबतींत त्याच्या घरीं अनागोंदी कारभार मला मुळीच दिसला नाही. माझ्या मुक्कामांत त्याच्याकडे अेकहि दुकानदाराचा गडी बिलवसुलीला आला नाही, अेवढेंच नव्हे, तर सरलाबाअीला अिरकली लुगडीं आणि आपल्या

विम्याचे हप्ते बिनचूक देऊन बँकेच्या पासबुकांत शेदीडशे रुपये शिल्लक टाकलेले त्याने मला दाखविले!

त्याच्या प्राप्तीच्या मानाने त्याची ही बचत प्रशंसनीय खास होती. मी त्याबद्दल जेव्हा त्याचें कौतुक करूं लागलों, तेव्हा आपला विनय प्रकट करीत दाजी म्हणाला, "यांत मला शाबासकी देण्याचं कांहीच कारण नाही. प्राप्तीच्या बेतानं खर्च न ठेवणं हा मूर्खपणा आहे खास. पण प्राप्तीच्या प्रमाणांत खर्च ठेवणं म्हणजे कांही शत-कृत्य नव्हे– कर्तव्यच आहे तें प्रत्येकाचं. स्वतःचं कर्तव्य करणं अेवढी साधी गोष्ट प्रशंसेला पुरेशी नाही."

हो, विसरलोंच. आणखी अेक रिवाज दाजीने कडकपणें पाळला होता. न्हाणवलीला वाढपें न्यावयाचीं नाहीत; डोहाळजेवणें किंवा केळवणें करावयाचीं नाहीत. पांडवगावांत आतापर्यंत त्याच्या ओळखी खूप झाल्या होत्या; अेवढेंच नव्हे, तर कित्येक कुटुंबांशीं त्याचा चांगला घरोबाहि जमला होता. पण अशा घरींसुद्धा त्याने हे रूढ शिष्टाचार पाळले नाहीत. त्याचें म्हणणें, हे मुळीं शिष्टाचारच नव्हेत; तर हे तिरस्करणीय अशिष्टाचार आहेत. सदभिरुचीस शिसारी येअील अशा या हिडिस चाली म्हणजे आपण रानटी अवस्थेंतून अजून बाहेर पडलों नाही, असें सपशेल कबूल करण्यासारखें आहे.

या त्याच्या विचारसरणीवर तिने आक्षेप घेतले आणि दोघांचा तत्संबंधी बराच वादहि झाला. सुखासुखी कोणी कोणास कांही देत नाही. अशा कांही कारणाने आप्त-स्वकीय किंवा अिष्टमित्र यांचें देवाणघेवाण होअून ममत्व अुत्पन्न होतें आणि जगांत दिवस काढतांना या ममत्वाची अत्यंत जरुरी असते असें तिचें म्हणणें. अिष्टमित्रांचें ममत्व संपादन करण्याचे हे अुपाय त्याला अमान्य होते. सणासमारंभांत त्यांच्या घरीं मौजेपुरतें जाण्यापेक्षा अडीअडचणीच्या वेळीं त्यांच्या अुपयोगी पडून जें ममत्व निर्माण होअील तें चिरकाल टिकेल, ही दाजीची विचारसरणी मला तरी पटली.

अेकंदरींत दाजीचें आदरातिथ्य व त्याच्या घरची शिस्त पाहून आम्ही अुभयतांहि खूष झालों होतों. अुद्या परत निघायचें ठरलें

होतें. आम्हांला आणखी कांही दिवस तेथे राहतां आलें असतें तर आनंदच वाटला असता. दाजीशीं गप्पागोष्टी करण्यास अेवढी अेकच रात्र शिल्लक असल्यामुळे आम्हीं झोपेची फारशी पर्वा केली नाही आणि बाराचे ठोके पडून गेले तरी आमचा वार्तालाप आणि हास्य-विनोद चालूच होता.

आम्ही साताला अुठलों. नअू वाजतां निघावयाचें होतें. तासा-भरांत चहापाणी अुरकून आम्हीं तयार झालों आणि दाजी टांगा आणण्यासाठी बाहेर गेला. आम्ही जाणार म्हणून सरलाबाअी सद्‌गदित झाली होती. ती तिला समजावीत होती व त्यांतल्यात्यांत थट्टा करण्याची संधीहि साधून घेत होती.

" आता पुन्हा कधी येणार ? " – सरलाबाअी.

" तुम्ही बोलवाल तेव्हा. " – ती.

" हो, बसलां आहां यायला ! हज्जार बोलावणीं घेतलींत तेव्हा कुठं अेकदा आलां, आणि तेंदेखील धरधरीनं !– " सरलाबाअी.

" पण हुकमेहुकूम आलंच पाहिजे असं बोलावणं धाडायचं आहेच की तुमच्या हातांत. " –ती.

" तें कसं बाअी ? " – सरलाबाअी.

" बारशाचा समारंभ लवकर करा म्हणजे झालं. " –ती.

" पुरे झाली थट्टा ! " असें म्हणून सरलाबाअीने मानेला हलकासा वळसा दिला आणि हसूं लागली.

अर्धा तास झाला. नवाची गाडी साधायची म्हणजे साडेआठाला निघायलाच हवें होतें. दाजीचा अद्यापि पत्ता नव्हता ! मी अस्वस्थ झालों. आणखी पांच मिनिटें गेलीं तरीहि तो येत नाहीसें पाहून मी स्वतःच टांग्याच्या शोधार्थ बाहेर पडलों.

त्या दिवशीं आमचें प्रयाण व्हावें असा अीश्वरी संकेतच नव्हता.

स्टँडवर टांगा किंवा मोटार मला दिसली नाही. आणि अर्थातच नवाच्या गाडीचा नाद सोडून देअून संध्याकाळीं सहापर्यंत मला आपला बेत लांबणीवर टाकावा लागला व मीं घरीं जाअून तिला तसें सांगितलेंहि.

अजून दाजीचा पत्ता नव्हता !

घरीं बसून तरी काय करायचें म्हणून हेडमास्तर बन्याबापू बर्वे यांच्याकडे गेलों. कदाचित् दाजी तेथे भेटेल, अशी मला आशा वाटत होती; पण तीहि फोल ठरली! सकाळपासून दाजीचा झालेला अस्त आणि त्यामुळे आमची झालेली गैरसोय यांची हकीकत जेव्हा मीं बन्याबापूंना सांगितली तेव्हा ते हसून म्हणाले, "अहो, हें कांहीच नाही. आमच्या हायस्कूलच्या बक्षीस-समारंभाच्या दिवशींची मजा माहीत नाही तुम्हाला!"

अशी सुरवात करून ती साद्यंत हकीकत जेव्हा बन्याबापूंनी मला सांगितली तेव्हा दाजीने माझी गाडी चुकवली याचें मला मुळीच आश्चर्य वाटेनासें झालें. ती हकीकत अशी होती--

हायस्कूलचा समारंभ जिल्ह्याच्या कलेक्टरसाहेबांच्या अध्यक्षतेखाली साजरा करावयाचा होता. वेळ संध्याकाळीं साडेचारची ठरलेली होती. समारंभाच्या सुरवातीस विद्यार्थ्यांचे अिंग्रजी-मराठी संवाद व्हावयाचे असून त्यांची व्यवस्था दाजीकडे सोपविण्यात आली होती. कांही संवाद दाजीने स्वतः तयार केले होते, तर कांही त्याने दुसऱ्या पुस्तकांतून निवडलेले होते. ही निवड अुत्तम झाली होती व ते संवाद बसवून घेण्यांत त्याने परिश्रमहि खूप केले होते. समारंभांतील हा पहिला भाग अतिशय रंगदार होणार याबद्दल सर्वांना विश्वास वाटत होता.

पण समारंभाच्या वेळीं दाजीचा पत्ता कुठे होता? सव्वाचार झाले तरी दाजी हजर झाला नाही! मुलें घरीं शोधायला पाठविलीं तेव्हा कळलें, की दोन वाजतांच तो घरांतून बाहेर पडला होता! त्याच्या गैरहजेरींत संवादाचा कार्यक्रम करावा किंवा करूं नये याविषयी बरीच भवति न भवति झाली व विद्यार्थ्यांची अुमेद मोठी असल्यामुळे ते दुसऱ्या अेका मास्तराच्या नेतृत्वाखाली करण्यांत आले आणि ते झालेहि रंगदार! कलेक्टरसाहेबांनी तर दाजीने लिहिलेल्या संवादांची फार वाहवा केली!

समारंभ खलास होऊन कलेक्टरसाहेबांची मोटार बाहेर पडायला आणि नुसती पैरण व टोपी घातलेला दाजी शाळेंत यायला अेकच गाठ पडली ! तो हायस्कुलाकडे यायला निघाला, पण वाटेंत दिसलेल्या अेका गोष्टीमुळे त्याला हायस्कूलचें विस्मरण पडलें. सजातीय लोकांच्या तुटवड्यामुळे तीनच माणसांनी चालविलेली अेक प्रेतयात्रा त्याला दिसली. हिंदूंच्या बेपर्वा वृत्तीची त्याला चीड आली आणि त्या मंडळींच्या पसंतीनापसंतीचा विचारहि न करतां त्याने चौथ्या टोकास खांदा दिला ! आणि स्वेच्छेने खांद्यावर घेतलेली ती जबाबदारी खलास करून हायस्कुलांत येण्यास त्याला ही वेळ आली !

बन्याबापू म्हणाले, " दाजीमास्तरांना त्या वेळीं काय म्हणावं हेंच मला समजेना ! शिस्त मोडल्याबद्दल मीं आतापर्यंत अेकादोघांना कायमची रजा दिली आहे; पण दाजींच्या बाबतींत मला विचार पडला. कारण, विद्यार्थीवर्गात त्यांनीं मिळवलेली लोकप्रियता आणि विषय पुरा करून घ्यायची त्यांची हातोटी मला विसरून चालण्याजोगं नव्हतं. "

" मग आजहि असंच कांही काढलंय् की काय त्यानं ? " असा माझ्या मनांत प्रश्न आला. अितक्यांत बन्याबापूंचा छोटा मनोहर धावत आला आणि त्याने वडिलांच्या गळयास मिठी मारून म्हटलें, " किनअी दादा, आज आम्हाला अेक जंमत मिळाली. "

" ती रे काय ? " बन्याबापूंनी विचारलें.

" दांगेच्या दांगे दोन अूस मिळाले आम्हाला ! "

" अरे, पण दिले कुणीं ? "

" आपले दाजीमास्तर नाअीत का, त्यांनी दिले. मला अेक अन् बाबूला अेक. त्यांनी किनअी दादा, आज दोन गाड्या भरून अूस घेतलेत बघा. "

" तुमच्या या दाजीसाहेबांचा खाक्या कांही औरच दिसतोय् ! " माझ्याकडे पाहून बन्याबापू म्हणाले.

मी नुसता हसलों आणि त्यांचा निरोप घेऊन जावयास निघालों. आता माझ्या मनांत दाजी आणि ऊस याशिवाय दुसरा विषयच नव्हता.

सबंध सोपा उसांनी भरला होता !

" हें रे काय ? " मीं घरीं जातांच दाजीला विचारलें. " टांगा आणायला गेलास आणि ऊस घेऊन आलास वाटतं ? "

" टांग्यापेक्षा उसांत फायदा अधिक दिसला म्हणून ऊसच घेऊन आलों. "

" म्हणजे ? "

" टांगा आणला नाही म्हणून तुम्हांला आपल्या कामावर वेळींच हजर होतां आलं नाही. तुमचा फुकट गेलेला अेक दिवस म्हणजे जास्तींत जास्त पांच नाहीतर सात रुपये नुकसान असं आपण धरूं. पण या व्यवहारांत मला दहा रुपये नफा बिनतक्रार राहणार आहे. दहा रुपये नफ्यासाठीं सात रुपये नुकसानी सोसणं केव्हाहि शहाणपणाचं ठरेल. ज्याला कुशलतेनं प्रपंच करायचा असेल त्यानं पै-पैशाचा नफासुद्धा सोडतां कामा नये; मग दहा रुपयांची गोष्ट कशाला ? "

" अरे पण गृहस्था, हा, बारा रुपयांचा नफा तूं मिळवणार कसा हें तरी सांग ? "

" अगदी उघड आहे सारा हिशेब. हे ऊस मीं सहा रुपयास उक्ते घेतले. पांचशे चाळीस ऊस आहेत हे. या उसांना किमानपक्ष नगाला अर्धा आण्याप्रमाणं किंमत येअील. म्हणजे दोनशे सत्तर आणे –सोळा रुपये चौदा आणे पदरांत पडणार माझ्या. म्हणजे सहा रुपये भांडवलावर दहा रुपये चौदा आणे नफा ! "

दाजीच्या आचरटपणाला काय म्हणावें हेंच मला समजेना ! मी कांहीच बोलत नाहीसें पाहून पुन्हा तोच म्हणाला, " दीडशेपेक्षाहि अधिक टक्के नफ्याचा सौदा– "

" दीड शहाण्यावांचून कुणाला नाही करतां येणार ! " दाजीला वाक्य पुरें करूं न देतां मी म्हणालों.

" म्हणजे ! " दाजी माझ्याकडे आ पसरून पाहूं लागला !

" म्हणजे काय ? हे अूस विकायचे कसे, कुणी आणि केव्हा, याचा कांही विचार केला आहेस का तूं ? सुटी असती तर तूं जाअून बसला असतास मंडअींत. पण तुला शाळा ! दोन दिवसांचा पगार बुडवलास तर तुझ्या दीडशे टक्के नफ्यांत कमी व्हायचा तेवढा. आता तुझ्याअैवजी सरलाबाअीनं– "

" हो, बायकांनासुद्धा विक्रयकला यायला पाहिजे असं मत असेलच भाअूअींचं ! बाकी अुसांच्या मोळ्या तुम्हींच नेअून दिल्या पाहिजेत बरं का मंडअीपत्तर. तें कांही व्हायचं नाही सरलाबाअीच्या हातून. गाडी करा म्हटलं तर तुमचा नफा आणिकच कमी होणार ! "

आम्हां दोघांच्या बोलण्यांतील सूर लक्षांत न येण्याअितका दाजी जडबुद्धीचा नव्हता. वस्तुस्थिति त्याच्या लवकरच लक्षांत आली. गणिताच्या दृष्टीने आपला सौदा किफायतशीर ठरत असला तरी तो अंमलांत आणणें आपल्यासारख्यास बरेंच अडचणीचें आहे आणि आपण केला हा शहाणपणा नसून खरोखर अव्यापारेषु व्यापार केला अशी त्याची मनोमन खात्री झाली. तरीपण चूक कबूल करून कमीपणा पत्करणें त्याच्या स्वभावाविरुद्ध असल्याने त्याने आम्हांला गप्प बसव-ण्याची दुसरी अेक शक्कल काढली. तो म्हणाला,

" तरीपण विक्रीच्या भानगडींत न पडतांहि मी माझा नफा मिळवीन. तुम्ही अिथून जाण्यापूर्वीच ही गोष्ट सिद्ध करून दाखवीन मी तुम्हांला. "

विक्री न करतां किफायतशीर व्यापार करण्याची दाजीची अजब कला कोणती, याबद्दल आम्हांला अुत्कंठा लागली, किंवा तो आणखी काय अुपद्व्याप करतो याबद्दल आम्हांस नवीनच धास्ती पडली असें म्हणतां येअील.

हें आम्हांला पडलेलें कोडें दुपारीं दोनअडीच वाजतां अुल-गडलें. दाजी मधल्या सुटींत घरीं आला तो अेकटा आला नाही.

त्याच्यामागून त्याच्या हायस्कुलांतील सारे विद्यार्थी घरांत घुसले! दाजीने या वानरसेनेकडून आपल्या त्या गोड खुळेपणाची लूट करविली!

"चार ऊस तरी राहूं देत घरांत." सरलाबाअीने सुचविलें.

"आठ विकत घे हवे असले तर; पण यांतलं पेर नाही अुष्टवायचं! या सर्वांचं दान मीं मनानं या बाळगोपाळांना करून टाकलेलं आहे."

हर्षित झालेली ती बालसेना दृष्टीआड होअीपर्यंत दाजी पाहात राहिला होता. त्याची चर्याहि प्रफुल्लित झाली होती!

"दीडशे टक्के नफ्याअैवजी शंभर टक्के तोटाच झाला!" ती म्हणाली.

"काय? तोटा?" दाजी अुद्गारला, "वैनी, सर्वच गोष्टी पैशाच्या मोलानं मोजतां येत नाहीत. शेकडो मनांचा संतोष ही काय सामान्य गोष्ट वाटते तुम्हाला? मी तर म्हणतों, माझा हा व्यापार दीडशेच काय, पण दीड हजार टक्के फायदेशीर झाला!"

"बरं, पण टांगा आणतोस ना?" मीं सुचविलें.

"या वेळीं नाही ना येत अुसांच्या गाड्या?" सरलाबाअीनें विचारलें.

तिच्याकडे किंचित् क्रोधाचा कटाक्ष फेकून दाजी बाहेर पडला.

आमची गाडी चुकली नाही. घर येअीपर्यंत आम्ही अेकच कोडें सोडवीत होतों—

"दाजीच्या प्रपंचांत कौशल्याचा भाग अधिक की आचरटपणा अधिक?"

हें कोडें सुटलें नाही तें नाहीच!

★ ★ ★



# दाजीचा नवमतवाद

चि. सौ. भागूताअी ही तिची भाची. भागूताअी गेल्या वैशाखांत सौभाग्यवती झाली होती व म्हणूनच तिच्या मंगळागौरीचा समारंभ थाटाने व्हावयाचा होता. भागूची आअी— तिची आक्का— या वेळीं बाजेला जखडलेली असल्याने भागूताअीच्या मंगळागौरीची जबाबदारी आमच्या घरीं आली होती. आणि तेवढ्यासाठीच तिने सरलाबाअीस बोलावून घेतलें होतें.

अेरवी हजार कुसपटें काढून मोडता घालणारा दाजी या वेळीं सरलाबाअीस पाठवूनच थांबला नाही, तर स्वतःहि चार दिवसांची रजा काढून आला होता!

मंगळागौरीचा कार्यक्रम व्हावयाचा तसाच झाला. तिने सतरा-अठरा मुली जमवल्या. आपली गौर अेवढीशीच झाल्याची रुखरुख मुलींना वाटूं नये म्हणून तिने गौरींवर भली मोठी दुरडी अुपडी घालून त्यावर फुलें लावण्याचा पोक्त सल्ला दिला आणि तो साऱ्या मुलींना पसंत पडून अंमलांतहि आला. डोकीअितकी अुंच गौर झाली तेव्हा त्या मुलींना हायसें वाटलें आणि त्यांचें समाधान पाहून तिलाहि धन्यता वाटली.

आजच्या मंगळागौरींत आणखी अेक व्यक्ति खुशींत आली होती. ती म्हणजे पूजा सांगावयास आलेले श्रीपू दीक्षित. जितक्या मुली

अधिक तितका दीक्षितांचा आनंदहि अधिक असणें साहजिकच होतें कारण अेकच पूजा सांगून अनेक दक्षिणा आणि वाणें मिळाल्यावर आनंद कां वाटूं नये? तरीपण ब्राम्हणाचा असंतुष्ट स्वभाव श्रीपू दीक्षितांच्या ठिकाणींहि प्रकट झाल्यावाचून राहिला नाही. त्यांना अठरा मुलींची वर्दी लागली होती व जागेवर सोळाच मुली हजर दिसल्या. दोन मुलींची मंगळागौर अंतरणार म्हणून नव्हे, तर दोन दक्षिणांची तूट येणार म्हणून दीक्षितांनी विचारलें,

"नेन्यांची नमूताअी यायची होती ना? बोलावून तरी आणा तिला."

"बोलावूनहि यायची नाही ती आज." नमूच्या शेजारची अेक मुलगी म्हणाली.

"कां? काय भानगड झाली मधेच?"

"भानगड नाही झाली, मुलगाच झालाय् तिला." नमूच्या मैत्रिणीनें हसून अुत्तर दिलें.

"आणि ती काळ्यांची कला?"

"ती येणार होती, पण साडेआठच्या गाडीलाच रसिकराव आले–" कलेच्या मैत्रिणीने सांगितलें.

"म्हणजे तिचे यजमान बरं का, दीक्षित!" स्वयंपाकांत गुंतलेली असूनहि पुढे होअून तिने खुलासा केला.

"मग जोडीनं येणार आहेत की काय पूजेला?" दीक्षितांनी हावऱ्या अधीरतेने विचारलें.

"छे हो, मुळीच येणार नाही ती. मी गेलें होतें बोलवायला, तर ती म्हणाली, 'नाही बाअी येत.' अन् तिची आअीदेखील म्हणाली, 'घालील घरींच देवीला हळदकुंकू.' 'करायची आहे काय मंगळागौर!' असं रसिकराव म्हणाले आणि म्हणूनच तिचा बेत फिरला म्हणे!"

"कलियुग आहे हें!" असे दुःखोद्गार काढून दीक्षितांनी पूजा सुरू केली आणि ती यथासांग पार पडल्यावर पंगत बसली.

आमच्या पंगतीला आम्ही तिघेच होतों. दीक्षित, दाजी आणि मी. पानेंहि अशाच क्रमाने मांडलीं होतीं. ' चल रे ' अशी सूचना देतांच दाजी आला अन् मधल्या पानावर बसला. दाजी शर्टहि न काढतां, चामडीच्या पट्टयांतलें घड्याळ मनगटावर ठेवून पानावर– दिक्षितांच्या शेजारच्या पानावर– येअून बसला व पुढे अर्धवट वाढलेलें पान ठाकठीक करून त्याने भाजींतल्या बटाट्याची अेक फोड अुचलून तोंडातहि टाकली !

" अहो ! अहो ! हें काय ? " दीक्षित अुद्गारले.

" ही बटाट्याची भाजी. झकास झाली आहे ! " –दाजी.

" अहो, पण नैवेद्य व्हायचाय् अजुनी. अन् ओवळ्यानं बसलां ? "

" नैवेद्य तुम्ही दाखवणार आहां, तुमच्या पानाला मी मुळीच शिवलों नाही. "

दीक्षितांचा आणखी अेक शब्द म्हणजे दाजीच्या आवेशाच्या दारूवर ठिणगीसारखा ठरला असता. जेवण बाजूलाच राहून नुसतें भाषण अैकण्याचा प्रसंग येअू नये म्हणून स्वस्थ राहण्यास मीं दीक्षितांना नेत्रसंकेताने दर्शविलें आणि दीक्षितांनीहि समजावयाचें तें समजून आपल्या तोंडाला खीळ घातली. तरीपण ज्या मरणाला मी भीत होतों तें मरण ओढवलेंच. आपल्या व दाजीच्या पानामध्ये हातांतील झारीने पाण्याची रेघ ओढीत ते अुद्गारले,

" पंक्तिदोषो न विद्यते ! "

दाजीचे डोळे फाटले ! त्याने ओठ चावल्याचाहि मला भास झाला ! आता काय होणार याची मला धास्ती वाटूं लागली.

दाजी ताडकन् अुठून म्हणाला,

" होय, विसरलोंच मी. चुकून भलत्याच्याच पंक्तीला जेवायचं पाप घडत होतं आज ! "

त्याने आपलें पाट-पान अुचललें आणि थेट दीक्षितांच्या समोर घेतलें. सोयीसाठी वादी-प्रतिवादी आमोरासमोर बसले की काय असें मला वाटलें. आता मला अेक सावधगिरी ठेवणें भाग होतें, की दीक्षित

आणि दाजी यांचा संबंध ज्यांत येऊं शकेल असा कोणताच विषय काढतां कामा नये.

सर्व वाढप झाल्यावर ती तूप वाढायला आली आणि दाजींचें स्थलांतर पाहून तिनें आश्चर्यानें विचारलें,

" कां ? अुत्तरेकडे तोंड करून जेवायचा नियम-बियम केलाय् की काय चातुर्मासांत ? "

मी मनांत चरकलों. पण दाजींनें तिचें बोलणें नुसतें हसण्यावारी नेलेलें पाहून माझा जीव खाली पडला.

" यन्तु नदयो " होअून अुदक सुटलें आणि जेवणें सुरू झालीं. मीं विषय काढला,

" काय दीक्षित, केतकरांच्या कृष्णमंदिरांत जन्माष्टमीचा अुत्सव सुरू झाला असेल, नाही का ? यंदा हरिदास कोण आलेत ? "

" हरिदास नाहीत या वर्षी. अष्टमीला फक्त पुराणावर अुत्सव अुरकून घेणार आहेत ते. "

" म्हणजे ! असं सादिलवारी कशासाठी ? "

" अहो, मन जाग्यावर असलं तर अुत्सव आणि समारंभ. "

" पण केतकरांचं मन अस्वस्थ असायला झालंय् तरी काय ? "

" काय सांगावं तुम्हाला दादासाहेब ! आधी हा कलि आणि त्याच्या मदतीला हीं कॉलेजं आलीं. आग लावून सोडली आहे त्यांनी साऱ्या दुनियेला ! तरी आम्ही काका केतकरांच्या कानींकपाळीं ओरडत होतों, की कमलला कॉलेजांत नका पाठवूं म्हणून. तेव्हा अैकलं नाही अन् आता बसले आहेत आचारीविचारी होअून."

" पण झालं काय हें नाही आलं माझ्या ध्यानांत."

" अहो, व्हायचंय् काय ! प्रीतिविवाहाचं वेड शिरलंय् तिच्या डोक्यांत. "

असें सूतअुवाच करून कालिदास नांवाच्या अेका कायस्थ तरुणावर कमल फिदा झाली आहे व नुसता प्रीतिविवाहच नव्हे, तर मिश्रविवाह करण्याची धमकी तिने काकांना दिली असून तिचें मतपरिवर्तन

करण्याच्या यातायातींत असल्यामुळे सालाबादच्या कुळधर्माकडे लक्ष द्यायलासुद्धा त्यांना फुरसत नाही, अित्यादि कथाभाग दीक्षितांनी निवेदन केला. माझ्या चौकस स्वभावानुसार कमला कालिदासाची मीं अधिक चौकशी केली तेव्हा कळलें, की तो अेका कोट्यधिशाचा मुलगा असून कमलाच्या कॉलेजांत फेलो आहे. कमलने प्रथम त्याला प्रेम-पत्रिका लिहिली आणि कालिदासाने तिचा स्वीकार केला.

"आता तुम्हीच सांगा दादा, अशा तरुणबाज कार्टीनं बापाच्या तोंडाला काळोखी फासायचा जर प्रसंग आणला, तर काकांसारख्या गृहस्थाला तुम्ही काय सल्ला द्याल ?" दीक्षितांनी हा प्रश्न पुरा करतांच दाजी अुसळून म्हणाला,

"मुलीच्या योग्य मागणीला मुकाट्यानं मान्यता द्या; आणि तिला विरोध करायचा असला तर आपलं कृष्णमंदिर जमीनदोस्त करून कृष्ण-रुक्मिणीच्या मूर्ति नदींत नेअून बुडवा, असा सल्ला देअीन मी केतकरांना."

त्याच्या म्हणण्याचा भावार्थ लक्षांत आला असूनहि मीं विचारलें, "अरे, पण मंदिरांतल्या कृष्ण-रुक्मिणीला काय म्हणून प्रायश्चित्त फुकटच्या फाकट ?"

"हें प्रायश्चित्त नव्हे–" दाजी म्हणाला, "ही ढोंगी भक्तांच्या हातून सुटका आहे."

"काय ? ढोंगी ! आणि काका केतकर ? नाही बरं. त्यांची कृष्णभक्ति नकली नाही. प्रतिपदेपासून कृष्णजन्म होअीपर्यंत अुपास पाळतात ते." दीक्षितांनी केतकरांची तरफदारी केली.

"ते अुपास करत असतील नाहीतर अुन्हांत बसतील, पण जोंपर्यंत कृष्णचरित्राचा अपमान त्यांच्या हातून होतो, तोंपर्यंत त्यांना मी ढोंगीच म्हणेन. मी अुलट बाजू घेअून विचारतों, मनाला आवड-लेल्या तरुणाची प्रेमयाचना करणाऱ्या कमलला तुम्ही कां नांवं ठेवावीं ? तुम्ही जिची भक्तिभावानं पूजा करतां ती रुक्मिणीदेखील अशीच प्रेमविव्हल झाली आणि तिनं 'विद्यावयद्राविणरूप अिहींकरूनी

ह्या आत्मतुल्य पति ' असें मनांत धरून आओीबापांच्या अिच्छेविरुद्ध श्रीकृष्णाकडे चोरून प्रेमपत्रिका धाडली नाही काय ? आणि ज्याला तुम्ही अीश्वराचा पूर्णावतार म्हणतां त्या श्रीकृष्णानं तरी चालून आलेल्या प्रेमाचा निषिद्ध म्हणून धिक्कार केला काय? मग त्या रुक्मिणीला ' तरुणबाज कार्टी ' म्हणायला तुम्ही तयार आहां काय ? ''

या रोखठोक जबाबाला काय अुत्तर द्यावें हें दीक्षितांना सुचेना ! तरीपण स्वस्थ बसल्यास पराजय कबूल केल्यासारखें होअील या भयाने ते म्हणाले,

" देवादिकांचे दाखले माणसाला कशाला लागू करतां ? "

" देवांचे गुण आठवायचे तर ते नुसते भजनापुरतेच आणि कथेपुरतेच काय म्हणून ? देवांचे गुण आपल्या अंगीं अुतरवण्याचा शास्त्रीपंडित तर घसा फाडफाडून अुपदेश करीत असतात ! मग व्यवहाराला त्यांचे दाखले घेतले तर तुम्ही कां डरतां ? आणि अरेरावी नवऱ्यांच्या धाकांत राहून आपलें सतित्व (?) टिकवण्याचा तुम्ही बायकांना अुपदेश करतां तेव्हा सीता, द्रौपदीचे दाखले जर देतां तर प्रेमीजनांच्या प्रणयक्रीडेला राधाकृष्णाचे किंवा कृष्णरुक्मिणीचे दाखले आम्ही देणारच. "

या वेळीं दाजीला अितकें अवसान चढलें होतें, की त्याने बोलण्याच्या भरांत हातांतील लाडू पानांत आपटला व त्या भुसभुशीत पदार्थांत तो आघात सहन करण्याअितकी ताकद नसल्याने त्याचा चुराडा होअून तो माझ्या पानापर्यंत अुडत आला ! दीक्षितांच्या पानांतहि अेखादा कण अुडाल्याचा त्यांना संशय आला की काय कोण जाणे; त्यांनी झारींत डाव्या हाताचें बोट बुचकळून तें डोळ्यांस लावलें येवढें मात्र खरें !

युक्तिवादाने दाजी निरुत्तर होणार नाही हें पाहून दीक्षितांनी विषयास थोडी कलाटणी दिली आणि म्हटलें,

" प्रेमविवाहापुरतं तुमचं म्हणणं कबूल करूं अेखाद वेळ; पण जातिबंधनं तोडायचीं म्हणजे काय ? रुक्मिणी क्षत्रियकन्या होती आणि कृष्णपरमात्मेहि क्षत्रियच. "

" वाद आहे त्याबद्दल. कृष्णाला तुम्हीं आता क्षत्रिय ठरविल आहे; पण त्याच्या गवळीपणाबद्दल प्रत्यक्ष रुक्मिणीचा भाऊ आक्षेप घेत होता असं तुमच्या पुराणांत आहे. आणि काय हो दीक्षित, सब देवनका बाबा असा जो महादेव याची जात माहीत आहे का तुम्हाला? ज्याअर्थी सर्वांत अुच्च वर्णाचे ब्राह्मण सोवळयानं त्याला अभिषेक करतात, त्याअर्थी तो ब्राह्मणच असला पाहिजे. पण त्या राजर्षींनी घरांतून पळून आलेल्या अेका तरुणबाज पोरीला— ती डोंगरी जातीची असूनहि— बायको म्हणून पत्करलीच ना? खरी गोष्ट अशी आहे, की तुमच्या पुराणांतले लोक मुलांच्या लग्नांत विनाकारण लुडबुडत नसत. स्वयंवराची परवानगी देअून मोकळे होत बिचारे. लग्नाचा कारभार आपल्या हातीं ठेवून स्त्रीजातीवर वर्चस्व गाजवण्याची चाल तुम्हीं अलीकडे पाडली आहे. पण स्त्रीला झालं तरी स्वाभिमान आहेच की. ती यापुढं तुमचा जुलूम सहन करणार नाही."

" काय! आम्ही स्त्रीवर जुलूम करतों? लहानपणीं पोषण करून मुलींचा संसार सजवून देतों आणि त्यांचं जन्मभर संरक्षण करतों, तें काय त्यांची योग्यता आम्हांला कळत नाही म्हणून? आम्ही स्त्रीला गृहदेवता म्हणतों."

" म्हणत असाल कधी चुकून; पण तुम्हांकडून स्त्रीला अपशब्दाखेरीज दुसऱ्या गोड शब्दाची सहसा प्राप्ति होत नाही. तुम्ही स्त्रीकडे बरोबरीच्या योग्यतेचा मनुष्यप्राणी म्हणून पाहात नसून खरेदी केलेलं विलासयंत्र, पकडून आणलेली बटीक या भावनेनंच पाहात असतां. स्त्री ही देवतातुल्य आहे असं तुम्हांला खरोखरच वाटत असतं, तर तिला अपशब्द बोलणं किंवा तिला हाणमार करणं तुमच्यानं झालंच नसतं. आमच्या वाड्यांत गडगडे ड्रॉअिंग मास्तर राहतो. वेळ आलीच आहे म्हणून सांगतों. तो आपल्या बायकोला झोडपीत नाही असा दिवस फेब्रुवारीच्या २९ तारखेसारखा चार वर्षांनी अेखादाच येतो. आणि या माराकुटीला कारणहि लागत नाही

त्याला फारसं. दूधच अुताला गेलं, चहा वेळेला झाला नाही किंवा झाला तरी चांगला मुरला नाही, अेवढ्या सबबी पुरतात त्याला. बरं का दीक्षित, हा ड्रॉअिंग मास्तर आपल्याला कट्टा सनातनी म्हणवतो! दुसरं अेक अुदाहरण सांगतों तुम्हाला दीक्षित- "

खीर वाढायला आलेल्या तिने दाजीला मध्येच अडवून म्हटलें, "जेवणाकडं लक्ष द्या की जरा. पान जसंच्या तसं आहे तुमचं लोकांची जेवणं संपलीं तरी. जेवल्यानंतर वेळ काय थोडा आहे वाद घालीत बसायला ? "

तेवढ्यापुरता दाजी थंडावला आणि तिने वाढलेल्या दोन वाट्या खीर तो गटगटा प्याला.

पण थोडक्या बुरबुरीने जसा अुकाडा ओसरत नाही, अुल्ट अधिकच तगमग होते, तशी दाजीची स्थिति झाली. खीर पिअून वाटी ( हो वाटीच; कारण आम्हीं द्रोणाऐवजी वाट्यांची सुधारणा अंगिकारिली आहे. ) खाली ठेवतांच त्याने आपलें भाषण पुढे चालू केलें,

" वटसावित्रीच्या कथेच्या वेळीं जमलेल्या टोपलीभर आंब्यांपैकीं दहाबारा आंबे आपल्या बहिणीच्या मुलांना दिल्याबद्दल आमच्या शेजारच्या अेका शास्त्र्यांनी आपल्या बायकोला तीन दिवस अुपासाची शिक्षा फर्मावली! आधीच तीन दिवसांचा अुपास, त्यांत पुन्हा हे तीन दिवस! मरणच होतं बिचारीचं! पण दुसऱ्या दिवशीं शास्त्रीबुवांना मेहुणाचं आमंत्रण आलं व तें नाकारणं स्वतःच्या नुकसानीचं असल्यानं त्यांना बायकोला फर्मावलेली शिक्षा रद्द करावी लागली. या शास्त्रीमहाशयांना 'धर्मजीवन' अशी पदवी कुठल्याशा श्रींनी बहाल केली आहे!"

आपल्या संग्रहांतलीं अेकेक अुदाहरणें दाजी बाहेर काढूं लागला आणि त्याने दिलेलें शास्त्रीबुवांचें अुदाहरण तर श्रीपु दीक्षितांच्या चांगलेंच वर्मी झोंबलें असावें. कारण त्यांतला कांही भाग दीक्षितांनाहि लागू पडण्यासारखा होता. अनाथ मावशीला मरतेवेळीं गोप्रदान सोडण्या-

साठी अेक रुपाया दीक्षितीणबाअींनी दिला हा त्यांचा अपराध आणि या अपराधाबद्दल त्यांना दीक्षितांनी शाब्दिक आणि हास्तिक प्रसाद दिल्याची बातमी आमच्या कानीं आलेली होती.

" अन्नदाता सुखी भव– " असें म्हणून दीक्षितांनी आपोष्णी घेतली आणि दाजीच्या भोजनसमाप्तीची वाट न पाहतांच अुठण्याची तयारी दर्शवली. त्यांचें मनोगत ओळखून मीं त्यांना अनुमति दिली आणि " अुठतों रे आम्ही, होअूं दे तुझं सावकाश– " असें म्हणून आम्ही दोघे अुठलोंहि.

विड्याचें तबक पुढे घेअून श्रीपु दीक्षित सोधण्याला पानें पुशीत म्हणाले, " पाहिलींत ना दादा, हल्लींच्या सुशिक्षित लोकांची विचार-सरणी ! अनादिकालापासून चालत आलेली आपली आर्य संस्कृति यांना आता चुकीची वाटायला लागली, अन् हे साहेबी थेर सुचायला लागले ! यांत व्हायचं काय ? तर बायका डोअीजड होणार, त्या वाटेल तो धिंगाणा घालणार आणि घरादारांतला शुद्धपणा आणि सुखसमाधान नष्ट होणार ! आता मला सांगा दादा, हे जुन्या रीतिरिवाजांना नांवं ठेवणारे हें बघत नाहीत, की आजपर्यंत होत आलेलीं लग्नं काय दुःखमयच झालीं ? "

" कशाला लक्ष देतां तुम्ही दीक्षित या नसत्या विषयाकडे ? "

मी विषयास पूर्णविराम देण्याच्या अुद्देशाने म्हणालों; पण आता दाजी जवळ नसल्याने व तो आमच्या बैठकींत लवकर येअील ही अपेक्षा नसल्याने दीक्षितांना आपले विचार प्रतिपादन करण्याची अुसळी आली होती. ते बोलूं लागले,

" अलीकडल्या पोरांना वाटतं, की थिल्लरपणानं पोरींच्या हातांत हात घालून फिरलं म्हणजे शतकृत्य केलं ! पण त्यांना काय कळतं डोंबल ? खरं म्हटलं तर बायकांना अुंबऱ्याबाहेर पाअूल टाकणं म्हणजे नागाच्या फडीवर पाअूल टाकल्यागत वाटलं पाहिजे. "

" दाजीचं जेवण नाही का आटपलं अजूनी ? " मीं ओरडून पृच्छा केली. दाजीची मला मोठी तहान लागली होती अशांतला

भाग नाही; पण दाजीच्या धास्तीने तरी दीक्षितांनी आपलें चऱ्हाट आटोपतें घ्यावें अेवढीच माझी अिच्छा होती. पण माझ्या पृच्छेला तिजकडून–" जेवण केव्हाच झालंय् त्यांचं अन् टोपी घालून बाहेर गेलेत ते– " असें अुत्तर आल्याने दीक्षित निर्धास्त झाले आणि त्यांनी विड्याचें तबक फिरून अेकदा पुढ्यांत ओढलें.

आता दीक्षितांची आर्य संस्कृतीची कैफियत मुकाट्याने अैकून घेण्यावांचून मला गत्यंतर नव्हतें. दीक्षितांचीं मतें मला फारशीं पटत तर नव्हतींच, पण कित्येकदा तीं हास्यास्पदहि वाटत होतीं. तरपिण तसें त्यांना दर्शवून त्यांना खट्टू करण्याचा धीटपणा माझ्या ठिकाणीं नसल्याने मला दाजीची आठवण राहूनराहून येत होती व अशा अैन वेळीं त्याने बाहेर निघून जावें याचा मला रागहि येअूं लागला होता.

पुष्कळसें बडबडून झाल्यावर दीक्षितांनी ठासून सांगितलें, " आपल्या आर्य संस्कृतीनंच जगाचं कल्याण होअील; आणि ' न स्त्री स्वतंमर्हते ' असं आर्य संस्कृतीचं पाहिलं वचन आहे. "

दीक्षितांच्या शास्त्रवचनापेक्षा त्यांच्या संस्कृत भाषेवरील प्रभुत्वाने मी पुरा सर्द झालों आणि कंटाळलेल्या मनःस्थितींतहि मला हसूं आल्यावांचून राहिलें नाही! अितक्यांत " आर्य संस्कृति की जय! रूढी-धर्म की जय! " अशी गर्जना करीत दाजी बैठकींत दाखल झाला. त्याच्या हातांत छापील कागदांचें बिंडोळें होतें.

" आपणहि आहां अजून अिथं? फक्कड! " दीक्षितांकडे पाहून त्याने समाधान व्यक्त केलें.

" अरे, पण तूं गेला होतास कुठं जेवल्याबरोबर? तूं जेवतांना केलेल्या बडबडीचं पुरतं खंडण केलं या श्रीपु दीक्षितांनी. त्यांचं म्हणणं, तुमच्या सुधारणा नुसत्या फोलच नाहीत, तर घातक आहेत. आपल्या सनातन आर्य संस्कृतीनंच जगाचं कल्याण होअील. "

" त्याचाच पुरावा गोळा करतों आहें. " दाजीने डोळे मिचकावीत अुत्तर दिलें.



“ आर्यसंस्कृति की जय ! स्त्री-धर्म की जय ! ” अशी गर्जना करीत दाजी बैठकींत दाखल झाला.

( पान १३३ )

"पुरावा तो कसला बुवा!" दीक्षितांनी आश्चर्य दर्शविलें.

"पुरावा होय? पुरावा तुमच्या मूर्खपणाचा! हा पाहा!" असें म्हणून त्याने आणलेले कागद दीक्षितांच्या पुढे फेकले.

बासरू म्हणून कुरवाळायला जावें आणि त्याने लांडगा होऊन चावा घ्यावा अशी दीक्षितांची अवस्था झाली!

"तुम्हांला मराठी वाचायला येतच असेल फार करून. हें डॉ. मुंजांचं व्याख्यान वाचा. रोज पस्तीस हिंदु स्त्रिया बाटून परधर्मांत जातात असं पुराव्यासह सिद्ध केलं आहे त्यांनी. हा श्रद्धानंद अनाथालयाचा वृत्तान्त पाहा. यांतली प्रत्येक स्त्री तुमच्य सनातन आर्यसंस्कृतीच्या नांवानं टाहो फोडते आहे. बायकोला भाजून-भोसकून ठार मारणाऱ्या नवऱ्यांचे पराक्रम रोजच्या वर्तमानपत्रांत भरलेले आहेत आणि नवऱ्याच्या छळाला वैतागून जीव देणाऱ्या बाय-कांचीं अुदाहरणं हजारांनी मोजतां येतील. थेरड्या नवऱ्यांच्या छोकऱ्या बायका तुमच्या डोळ्यांपुढंहि थोड्याथोडक्या नसतील!"

दाजी हें कशासाठी सांगतो आहे हें श्रीपु दीक्षितांच्या ध्यानांत येअीना. ते प्रश्नार्थी नजरेने दाजीकडे पाहूं लागले.

"नाहीच यायचं तुमच्या लक्षांत! कारण विचार करायची मेंदूला कधी सवयच नाही! पण दीक्षित, मला सांगा, होतात या गोष्टी चांगल्या की वाअीट असं वाटतं तुम्हाला?"

"या गोष्टींना आम्ही चांगलं कसं म्हणूं? अितकं का कळत नाही आम्हांला?"

"बरं, या गोष्टी कां होतात?"

"हजार तऱ्हेचीं माणसं भरलीं आहेत जगांत! चालायचंच हें असं!"

"पण दीक्षित, या गोष्टी माणसं करीत नाहीत, तर तुमच्या आर्यसंस्कृतीनं होतात. आर्यसंस्कृतीनं चोहोकडून जखडबंदी केल्या-मुळंच स्त्रियांना त्या त्या आपत्तीला मुकाट्यानं मान वाकवावी लागते! नवरा व्यसनी अथवा दुष्ट असला तरी त्याला देव समजून तो ठेवील

तसं राहायला तुमचा धर्म, कायदा आणि रूढि फर्मावते! नावडत्या बायकोला मन मानेल तेव्हा टाकून द्यायला पुरुष मोकळा आहे; पण पशुतुल्य पतीच्या तावडींतून सुटायला घटस्फोटाचा रास्त मार्ग तुमच्या संस्कृतीनं मोकळा ठेवला नाही! तो असता तर गरीब स्त्रियांना अनिच्छेनं धर्मांतर किंवा देहनाश करावा लागला असता का?"

"तरीपण घटस्फोट म्हणजे–"

"असे गांगरूं नका दीक्षित! गोष्ट पटते, पण मान्य करवत नाही, याचं कारण अेवढंच, की स्वतःला झळ बाधेपर्यंत अेखाद्या अनिष्ट चालीकडे मनुष्य अुदासीनपणानं पाहतो. समजा, दीक्षित, तुमचेच जावअी तुमच्या मुलीला–"

"जरा संभाळून बोला." दीक्षित मध्येच अुसळले.

"मी म्हणतों तें हेंच–" दाजीहि विजयी स्वरांत म्हणाला. "वादापुरती केवळ भाषेंतसुद्धा जी कल्पना तुम्हाला सहन होत नाही, ती कल्पना कित्येक अभागी जीवांच्या बाबतींत मूर्त स्वरूपांत आलेली आपण पाहातों व आपणांस त्याचं कांही वाटत नाही. अर्थात् ज्या रूढीमुळं आणि धर्मसमजुतीमुळं हा अनवस्थाप्रसंग ओढवतो, त्यांत बदल करण्याची कुणालाच तळमळ नाही. अुलट शहाणे म्हणवून घेणारे लोकसुद्धा स्त्रियांच्या बाबतींत कसा मूर्खपणा करतात, हें थेरड्या जंबूकांच्या लग्नावरून दिसतं. आजा शोभेल अशाला मुलगी अर्पण करायला आणि अर्पण करून घ्यायला दुरात्मे तयार होतात आणि त्यांचा हा पाजीपणा आर्यसंस्कृतीला मानवतो. हीच जर आर्यसंस्कृति असेल तर तिचा बीमोड होअील तो सुदिन, असं मी समजेन! स्त्रीपुरुषांना जन्माचा जोडीदार निवडायला संपूर्ण स्वातंत्र्य पाहिजे. पालकांनी फक्त सल्ला देण्यापेक्षा त्या बाबतींत अधिक लुडबूड करतां कामा नये. तुम्ही मघा म्हणत होतां ते केतकर की कोण, ते आपल्या सुजाण मुलीच्या स्वयंवराला विरोध करतील तर त्यांना महामूर्ख म्हणेन मी."

"फुकटच्या बाता झोडायला काय जातं? ज्याला जगांत अन्नानं दिवस काढायचे आहेत त्याला पोराठोरांच्या स्वैरवृत्तीला

आळा घातलाच पाहिजे. तुम्हालाच विचारतों, तुमची बहीण जर अेखाद्या विजातीय पुरुषाशीं लग्न करते म्हणेल तर काय कराल तुम्ही ?"

या सवालाने दाजीची मुलुखमैदान बंद पाडूं असा दीक्षितांना भरवसा होता ! पण तो खोटा ठरला. तो क्षणाचाहि विचार न करतां म्हणाला,

"देवदयेनं मला तशी बहीण असती व तिनं गुणसंपन्न असा सहचर निवडला असता तर मी आनंदानं हुरळून गेलों असतों. त्याच्या जातीमुळं त्याच्या अितर गुणांचा अनादर मीं कधीच केला नसता. माझ्या त्या बाणेदार बहिणीच्या विवाहप्रसंगीं मंगलाष्टकं रचून मीं अभीष्टचिंतन केलं असतं."

'नशीब आपलं !' या अर्थी श्रीपु दीक्षितांनी बोट कपाळाला लावलें व तपकिरीची चिमूट नाकपुडींत रेटून दरवाजा गाठला. पराजयाचें ओझें पाठीवर घेअून पळ काढणाऱ्या दीक्षितांकडे पाहून मला मौज वाटलीच; पण दाजीच्या या नवविचारप्रतिपादनाचें मला कौतुक वाटलें.

पण माझ्या या समाधानाचें आयुष्य पुरें दोन प्रहरहि नव्हतें ! कारण—

दिवेलागणीच्या सुमारास मी फिरून घरीं येतांच मला कळलें, की दाजी व सरलाबाअी यांची धुसफूस सुरू झाली आहे आणि तीसुद्धा दाजीच्या विक्षिप्तपणामुळेच !

"बरं आहे, पाहूं या. पण दाजी कुठं आहे ?" अशी मीं चौकशी केली.

"सीट सांगायला गेलेत ते. साडेनवाची गाडी गाठायची आहे त्यांना." तिने सांगितलें.

अितक्यांत दाजी माझ्यापुढे येअून अुभा राहिला.

"काय रे, निघालास म्हणे तूं ?"

"आम्ही दोघंहि." – दाजी.

"पण कुठं? आणि अेवढ्या तातडीनं कशासाठी?" —मी.

"मुंबअीला. अभिनंदनासाठी."—दाजी.

"कुणाचं अभिनंदन आणि कशासाठी?" —मी.

"अुद्या सकाळीं साडेदहाला वसनजी चाळींत भडोच—बेल्लारी विवाह होणार अशी बातमी आजच्या 'जमतीं'त आहे. जातिनिर्बंध झुगारून विवाह करणाऱ्या या दंपतीचं आम्हांला अभिनंदन करायचं आहे. गुजराथ-कर्नाटक विवाह ही सुधारणा निःसंशय अभिनंदनीय आहे."—दाजी.

"कबूल. पण हें अभिनंदन तारेनं अगर पत्रानंसुद्धा होअू शकेल."—मी.

"मला तसलं मेलेलं अभिनंदन मान्य नाही. जातीनं जाअून जिवंत अभिनंदन करणार मी."—दाजी.

"तुम्ही अेकटे गेलां तरी होअीलच की तुमचं अभिनंदन जिवंत. बायको कशाला हवी बरोबर? की लग्नसामारंभांत मेहुणाचं आमंत्रण मिळवायचंय्?"—ती.

"हा थट्टेचा विषय नव्हे. मी अेकटाच नव्हे तर माझी बायको-सुद्धा या सुधारणेला अनुकूल आहे हें मला दाखवायचं आहे आणि म्हणून माझ्याबरोबर तिनंहि मुकाट्यानं आलंच पाहिजे."—दाजी.

"अहाहा रे स्त्रियांचे कैवारी! म्हणे मुकाट्यान आलंच पाहिजे! नवरा म्हणजे नादिरशहा असं स्वतःच दाखवतां आहां की! आपण हसे लोकाला अन् शेंबूड आपल्या नाकाला!"

पण तिच्या या रागाचा किंवा अुपहासाचा दाजींच्या मनावर यत्किंचित्‌हि परिणाम झाला नाही व तो सहकुटुंब भडोच—बेल्लारीची कार्यसिद्धि करण्याला निघून गेला.

मनांतून खट्टू झाली असूनहि बाहेरच्या मुलींचा विरस होअू नये म्हणून ती फराळ, खेळ वगैरे गोष्टींत कसलीच कमतरता भासूं देत नव्हती. मला जेवायचें नसल्याने मी आपल्या खोलींत दाजींच्या या चमत्कारिक स्वभावाबद्दल आश्चर्य करीत व मधूनमधून वाचीत

पडलों होतों. अितक्यांत दारापुढे मोटार थांबल्याचा आवाज अैकूं आला व अमळशाने मुलींच्या हशाने घर दणाणलें!

"वाहवा हो सरलाताअी! तुमची भडोच–बेल्लारी मुंबअीहून अिथंच आली वाटतं?"–अेक आवाज.

अितक्यांत हातांतल्या टोपीनं वारा घेत दाजीच माझ्यापुढं दाखल झाला. मागून येत असलेल्या तिच्याकडेहि त्याचें लक्ष नव्हतें!

"की अंधारांत धावायची भीति वाटली तुमच्या आग-गाडीला?"–दुसरा आवाज.

"वांचलों म्हणून वांचलों बुवा!" दाजी म्हणाला.

"म्हणजे! ॲक्सिडेंट झाला की काय मोटारला?" मीं अधीर-तेने विचारलें.

"छे हो. 'जंमत'नं फसवलं मला. भडोच-बेल्लारी विवाह या हेडिंगामुळं मला वाटलं, की गुजराती आणि कानडी नवराबायकोंचा मिश्रविवाह होणार. पण भडोचचे भिडे अन् बेल्लारीचे बेहेरे यांची सोयरीक आहे ती! अिथल्या बेहेरे वकिलांचे नातलगच आहेत ते. ते मोटारींत भेटले अन् त्यांनीच खुलासा केला म्हणून निभावलों. चांगला वीस रुपयांचा गाढवपणा पदरीं येत होता; पण शहाणा ठरलों शेवटीं!"

"तरीपण तुमच्या वीस रुपयांच्या शहाणपणाच्या जोडीला मोटारच्या अेक रुपयाचा मूर्खपणा आहेच भावजी!" तिनें हसतहसत शेरा मारला अन् हसें ओसरल्यावर ती म्हणाली, "बरं, चला आता फराळाला. मटक्यांची उसळ तरी बघा कशी छान झालीय् ती!"

★ ★ ★



# दिवाळींत दाजी

"दिवाळीच्या आनंदाचा आस्वाद घेण्यासारखी आमची दोघांचीहि मनःस्थिति नसल्याने आपल्या आमंत्रणास आभारपूर्वक नकार देणें भाग आहे."

दाजीच्या या दोनतीन ओळींच्या कार्डाने आमचा हिरमोड तर झालाच, पण भीतीनेहि आमच्या मनांत शिरकाव केला. नेहमींपैकीच हेंदेखील दाजचिं कांहीतरी वेड असेल अशा समजुतीने मी भीतीची हकालपट्टी करण्याचा प्रयत्न करीत होतों; पण ती मात्र सर्वस्वीं घाबरून गेली होती. दुःखांत सापडलेल्या दाजी–सरला-बाईंचीं निरनिराळीं भेसूर चित्रें तिच्या मनःपटावरून सरकूं लागलीं. त्यांच्या आपद्ग्रस्त परिस्थितीमुळे तिचें मन सारखें कळवळूं लागलें. त्याबरोबरच दाजीचा तिला रागहि येऊं लागला होता. ती मला म्हणाली,

"उठल्याबसल्याच्या किरकोळ गोष्टींबद्दल वाववाव पत्रं लिहितात; अन् अडीअडचणींबद्दल लिहायचं म्हटलं की आखडलाच यांचा हात! आम्ही म्हणजे जशीं कांही कोणीच नव्हे यांची! सदाचंच आहे हें भाऊजींचं! अश्श!"

मलादेखील अगदी असेंच वाटत होतें. पण तसें न दर्शवता मी म्हणालों,

" दाजीला नांवं ठेवायची तुला हौसच ! पण मी म्हणतों, पत्र लिहायला भाऊजी चुकले तरी तुझ्या जाऊबाओींनी कां चुकावं ? त्यांना येतंय् की लिहायला. चांगलं अिंग्रजीहि शिकवलंय् नवऱ्यानं. का तुझा पत्ता माहीत नाही तिला ? बायकांना पुरुषांचे दोष दिसतात भराभर; पण आपले–"

" बायकांना बायकांचेसुद्धा दोष दिसतात; पण असले तर दिसतील, की अुगीचच ? "

माझी मात्रा बरोबर लागूं पडली. दाजींवर बसलेली तिच्या विचारांची बैठक हालवून त्यांना दुसरीच गति लावावी म्हणून मीं हा स्त्रीपुरुष-पक्षपाताचा विषय काढला आणि तिच्यांतील जात्य-भिमान जागृत करायचा माझा अुद्देश सफलहि झाला. पत्र न लिहिण्यांत सर्व दोष अेकट्या दाजीचा असून सरलाबाओी त्याला मुळीच जबाबदार नसणार असें तिनें अगदी ठासून सांगितलें. कारण नवऱ्याची अिच्छा नसतांना पत्रलेखनच काय, पण श्वासोच्छ्वास करण्याचेंहि हिंदु स्त्रीला स्वातंत्र्य नसतें असें तिचें म्हणणें होतें.

आणि आपल्या या म्हणण्याच्या समर्थनार्थ आपल्या अनुभवांतले दाखले द्यायलाहि ती विसरली नाही. जानोरकरांच्या जान्हवीला नवऱ्याच्या हट्टाखातर भक्त प्रल्हादाअैवजी ठकसेनच कसा पाहावा लागला, आणि लिमयांच्या लीलाबाओीला हरितालिकेदिवशींच गणेशचतुर्थीचे मोदक कसे खावे लागले, यांचें रसभरित वर्णन करून ती म्हणाली,

" आमची सरलाबाओी झाली तरी त्यांतलीच. भाऊजींसारख्या निगरगट्ट नवऱ्यापुढं ती काय करणार बापडी ? "

पहिला विषयच मूळपदावर आला आणि पुढे काय करावयाचें याबद्दल आमची वाटाघाट सुरू झाली. आपण तिकडे जाऊन वस्तुस्थिति काय आहे ती पाहावी व दाजीच्या अस्वस्थ मनाला स्वस्थता प्राप्त करून द्यावी असा प्रथम तिनें सल्ला दिला. पण पुन्हा त्यांनाच अिकडे बोलावून घेणें तिला अधिक श्रेयस्कर वाटलें. ते तिकडे दुःखांत

दिवस काढीत असतांना आपणांस अिथे दिवाळींत गोडी वाटणार नाही व ते अिथे आल्यास त्यांना दुःखाचा विसर पाडून त्यांचें मन रिझव-ण्याचा आपणांस पुष्कळ प्रयत्न करतां येअील. तिचा हा सल्ला मला पटला व कांही असलें तरी दोघांनी ताबडतोब निघून यावें अशी मीं तार ठोकली.

दिवाळीच्या आदला दिवस. मी ऑफिसांतून येअून चहा घेत बसलों होतों. वास्तविक कालच यावयास हवा असलेला दाजी अजूनहि न आल्यामुळे व माझ्या तारेचा जबाबहि त्याच्याकडून न आल्यामुळे आमच्या चिंतेंत भरच पडत होती. तो अुद्यापर्यंत न आल्यास आपण त्याच्याकडे जावें की काय अशी आमची वाटाघाट सुरू झाली, अितक्यांत दारांत टांगा थांबल्यासारखा वाटला. आत तिला कुठला धीर निघायला ? अर्धा राहिलेला कप तसाच टाकून ती बाहेर धावली आणि अमळशाने ' आल्या म्हणायच्या स्वाऱ्या ' असे तिचे अुद्गार माझ्या कानांवर आले.

मीहि भराभर चहा संपवून बाहेर गेलों.

फराळाचा डबा व तांब्या घेतलेली सरलाबाअी पुढे व बॅग, वळकटी घेतलेला दाजी मागे अशी जोडी गृहप्रवेश करीत होती.

पडवींत येतांच तांब्या, डबा खाली ठेवून सरलाबाअी नमस्कार करूं लागणार, तोंच दाजीची गर्जना अैकूं आली–

" हां हां... स ! सामान ठेवूं नको अेवढ्यांत. आपलं अिथं राहणं किंवा परत जाणं अनिश्चितच आहे अजुनी ! "

आल्याबरोबरच्या या पहिल्या झटक्याने आम्ही चकितच झालों ! ती म्हणाली,

" म्हणजे काय भाअूजी ? नुसतं दर्शन द्यायला आलांत की काय तरी ? घरांत यायच्या आंतच बाहेर जायच्या गोष्टी काढायच्या म्हणजे काय ? "

" तसंहि करावं लागतं कधीकधी ! " सामानासह अंगणांतच अुभा राहून दाजी बोलत होता. " आपल्यापासून दुसऱ्याचा विरस

होत असेल किंवा दुसऱ्याच्या आग्रहामुळं आपल्या विचारांशीं बेअिमान होण्याचा प्रसंग येअील, तर त्या प्रसंगांतून अगोदरच शाबूत राहण्याचा धूर्त माणसानं प्रयत्न केला पाहिजे. ''

'' मग काय तें ठरूं दे तरी अेकदा ! '' सरलाबाअी त्रासिकपणें म्हणाली.

'' हें पाहा वैनी, अिथं आम्हांला आमच्या मताप्रमाणं वागायची पूर्ण मुभा असेल तरच आम्ही तुम्ही म्हणाल तितके दिवस अिथं राहूं. ''

'' पण आज हा प्रश्न कशासाठी अुद्भवला ? तुमच्या मनाप्रमाणं वागायला अिथं कधी प्रतिबंध झाला तुम्हांला हें तरी कळूं दे ! ''

तिच्या बोलण्यांत दाजीच्या अुसनेपणाविषयी पूर्ण नाखुषी प्रकट होत होती. दाजी आणखी कांही बोलणार व त्यामुळे बोलाचाली विकोपाला जाणार अशी शंका मला आली आणि मी त्या प्रकाराला मुळांतच खुडून टाकण्यासाठी म्हणालों,

'' हं आटप, स्टोव्ह पेटव लवकर. पाहुण्यांचं कोरडं स्वागत कसलं करतेस ? आणि बरं का, मंडळींचे कपडे बदलून हातपाय धुअून होअीपर्यंत चहा होअूं दे गरमागरम अन् फराळाचंहि काढ कांहीतरी. दिवाळीचं केळवणच म्हणावं आज. ''

माझ्या बोलण्यांतली सूचना तिला कळली व किंचित् हसून ती आंत गेली. आमचा आशय सरलाबाअींलाहि कळला असावा. तीहि थोडें हसून तिच्या मागोमाग आंत गेली आणि मग विशेष कांही न होतां दाजीहि सर्व लवाजम्यासह घरांत येअून नेहमीप्रमाणे व्यवहार करूं लागला.

दिवाळीचीं अभ्यंगस्नानें आम्हीं केलीं. सरलाबाअी नकोनको म्हणत असतांहि तिने तिला न्हाअूं घातलेंच. सरलाबाअीच्या सूचनेप्रमाणे दाजीला मात्र पहाटे अुठवून आंघोळ घालण्याच्या भरीस आम्ही पडलों नाही. तो नेहमीप्रमाणेच अुजाडल्यावर अुठला आणि तोंड धुअून चहासाठी स्वयंपाकघरांत दाखल झाला. चहा तयार होत होता

आणि त्यापूर्वी दिवाळीच्या रिवाजाप्रमाणे फराळाच्या जिनसांनी भरलेल्या ताटल्या तिने आम्हां दोघांपुढे ठेवल्या.

" चहा- " ताटली बाजूला सारीत दाजी उद्गारला.

" हें काय तुमचं भाऊजी ! अेक अनारसा नाहीतर चिरोटा तरी घ्या ना ! निदान तुमच्या आवडीची चकली तरी खा "

तिचीं हीं आर्जवें फुकट गेलीं. दाजी म्हणाला,

" द्यायचा असला तर चहा द्या नुसता; नाहीतर समोरच्या कुंदनमलच्या हॉटेलांतून येतों घेअून. "

आणि खरोखरच दाजी अुठला !

" अरे, दमानं घे की जरा. फराळाचं नको असेल तुला तर नको घेअूं; पण चहा होअीपर्यंत थांबलास तर काय होअील ? "

माझ्या या दटावणीला मात्र यश आलें. अुठलेला दाजी खालीं बसला. मी ताटलींतील अेकेक पदार्थाचा मासला पाहूं लागलों आणि दाजी ' मुकीं बिचारीं कुणी हाका । अशीं मेंढरें बनूं नका । ' या ओळी गुणगुणूं लागला. या त्याच्या काव्यगायनांत कसलीतरी खोच आहे असा संशय मला आला; तरीपण मीं तो शब्दाने किंवा चर्येने प्रकट केला नाही. आम्ही आमच्या खास बैठकींत दाजीच्या कोणत्याच कृतीचा खुलासा विचारायचा नाही असा गुप्त बेत केला होता. कारण तो होअून आपलें पांडित्य केव्हा ना केव्हा प्रकट करणार अशी आमची खात्री होती.

आणि झालेंहि तसेंच.

चहाचे अेकदोन घोट घशांत जातांच दाजी म्हणाला, " वैनी, हें चालवलं आहेत तरी काय तुम्हीं ? "

" कुठं काय चालवलंय् मीं ? तुम्ही पितां आहां त्यांतलाच चहा पित्येंय् मी. "

" चहा पितां आहां हें मलासुद्धा दिसतंय् ! पण मी विचारीत होतों, हें ताटं भरभरून आंबोण कशासाठी ठेवलं आहे आमच्यापुढं ? "

" आंबोण म्हणून ठेवायला तुम्ही जनावरं नव्हे भाअूजी. दिवाळींत फराळ करायचा रिवाज आहे. "

"रिवाज आहे?" तिचें वाक्य पुरें करूं न देतां दाजी अुद्‌गारला, "रिवाज! रिवाज! या रिवाजांनी भंडावून सोडलं आहे जगाला! स्वतःला ताप झाला, यातना झाल्या, तरी केवळ रिवाज म्हणून मुकाटयानं सहन करायच्या! स्वतः विचार करायचा नाही, सोय पाहायची नाही, जणू कांही देवानं डोकंच दिलं नाही आपल्याला."

"मग म्हणणं काय तुझं? हे सण-समारंभ मुळीच करूं नयेत लोकांनी?" मीं विचारलें.

"जरूर करावेत. पण ते खरोखरच सण होतील, त्यांत खरोखरच समारंभसौंदर्य असेल आणि ते करतांना मनाची सुप्रसन्नता वाढेल अशा पद्धतीनं करावेत. तुमच्या या पद्धतींत यांपैकी काय साधतं? या दिवाळीचंच पाहा. दिवाळी आली हा हृद्रोग दसऱ्यापासून सुरू होतो. पुरुष पैशाच्या पेचानं गांगरतो, स्त्री करंज्या-कडबोळ्यांच्या यातायातींत चूर होते. पहाटे अुठलंच पाहिजे, तेल चोपडलंच पाहिजे! भूक नसली तरी फराळ चापलाच पाहिजे! अरे, कोण हा जुलूम नि काय ही जबरदस्ती! पण रिवाज आहे ना तो! कळूं दे तरी यांत मौज कुठं आहे आणि समाधान तरी कसलं आहे तें?"

दाजीचा हा सवाल खरोखरच निरुत्तर करणारा होता. पण सपशेल शरण जायला ती मात्र तयार नव्हती. ती म्हणाली,

"पण साऱ्याच गोष्टींत स्वतःचं सुख अन् समाधान बघत बसून कसं चालेल? आमच्या या सणांत ज्या धार्मिक गोष्टी आहेत त्या..."

"त्यांनीच तर सगळा घोटाळा केला आहे!" तिचें भाषण मध्येंच थांबवून दाजी कडाडला, "सणासमारंभांत हें धर्माचं लोढणं अडकल्यामुळं आनंद व समाधान यांचे पायच मोडून गेले. त्याच्या अुलट पाहायचं झालं तर धर्माच्या पवित्रपणांत सण-समारंभांचे अत्याचार कोंबल्यामुळं धर्माचीहि नासाडी होअून गेली. 'वन् थिंग ॲट अे टािअम' म्हणजे अेकाच वेळीं अेकच गोष्ट केली तर ती

चांगली होते. आंब्याच्या झाडाखालीं बसून पितृतर्पण करणारे ‘ आम्रश्च तृप्तः पितरश्च तृप्ताः ’ असं म्हणून आपण मोठे व्यवहारचतुर आहों असा भाव आणतात. पण त्यांचं हें कृत्य मला तरी आचरटपणाचं वाटतं. पितृतर्पणासाठी सांडलेल्या पंचपात्रीभर पाण्यानं आंब्याच्या झाडाची भूक तर भागायची नाहीच, पण मृताच्या नांवानं सोडलेलं पाणी मृतांना पोंचेल असं क्षणभर मान्य केलं तरी तीं मृत माणसं म्हणतील, की ‘ या लेकाला आमच्यापेक्षा या आंब्याची कळकळच अधिक आहे.’ आणि या कल्पनेनं ते मृतात्मे तृप्त होण्याऐवजी असंतुष्टच अधिक होतील. म्हणून माझं म्हणणं असं, की धर्मकृत्य आणि सण यांची कायमची फारकत केली पाहिजे.”

“ मग तूंच सांग की ती कशी करायची ती ? ” मला दाजीचे हे विचार मनापासून आवडले होते व या विषयाचें विस्तृत विवेचन तो कसें करतो हें जाणण्याची उत्कंठाहि होती. म्हणूनच मीं त्याला हा सवाल घातला. दाजीलाहि माझ्या प्रश्नाने स्फुरण आलें व तो म्हणाला,

“ यांत सुधारणा करायची झाली तर पहिली सुधारणा ही केली पाहिजे, की आम्ही करत असलेलीं धर्मकृत्यंच अजिबात बंद केलीं पाहिजेत. कारण सध्याच्या काळांत तीं निरर्थक आहेत. पाडव्याच्या गुढीपासून शिमग्यांतल्या धुळवडीपर्यंत आपण धर्मकृत्य म्हणून ज्या गोष्टी करतों, त्यांत साधत तर कांही नाहीच; पण श्रम, काळ व पैसा यांची खराबी करतों. गणेशचतुर्थीचं उदाहरण घेऊं आपण. वास्तविक हें धर्मकृत्य, पण यांत धर्माची आठवण कितीशी होते ? पोरं फटाक्यांसाठी आणि थोर मोदकांसाठी गणेशचतुर्थीची वाट पाहात असतात. गणपति म्हणजे काय, त्याची पूजाअर्चा कां करायची, कशी करायची, किंवा मुळीच करायची नाही, यांत अेक-जण लक्ष घालील तर शपथ ! असलीं धर्मकृत्यं निरर्थक आहेत असं मीं म्हटलं तर अेखादा सनातनी बुद्रुक कसलीतरी भरमसाट कथा अैकवील. पण मेंदू व योग्यायोग्य निवडण्याअितकी विचारशक्ति

असणारा माझ्यासारखा कोणताहि मनुष्य तसल्या तर्कटावर यापुढं विश्वास ठेवणार नाही. तो आपला स्वतंत्र मार्ग काढणार."

"मग काढला आहेत की काय असा स्वतंत्र मार्ग तुम्ही?"

"हो, हो. आधी करून मगच मी बोलत असतों, वैनी." तिच्या खोचक प्रश्नाला दाजीने ठासून अुत्तर दिलें व तो ताडकन् अुठून बाहेर चालता झाला.

दाजीची बोलतांबोलतां अुठून जाण्याची ही अुसळी पाहून आम्हांला नवल वाटलें नाही. कारण ती त्याची लहर आमच्या पूर्ण परिचयाची होती.

"भाअूजींचं आपलं कांहीतरीच असतं मुलुखावेगळं!"

"पण मुलुखावेगळं असलं तरी त्यांत त्याच्या कल्पकतेची चमकहि असते."

"असं म्हणून नसत्या गोष्टींत प्रोत्साहन द्यायला होतं अिकडनं! आणि म्हणतात ना 'आधीच तसलं अन् बैलावर बसलं' असं होतं मग भाअूजींचं."

आम्हां अुभयतांचा हा संवाद आणखीहि वाढला असता; पण तेवढ्यांत अेक कागद फडकावीत दाजी तेथे पुन्हा अुपस्थित झाला आणि तो कागद तिच्यापुढे भिरकावून म्हणाला, "वैनी, हा पाहा माझा नवा मार्ग."

थोडी चलाखी करून तिच्या आधी मींच तो कागद हस्तगत केला. नागरी टंकयंत्रावर मुद्रित केलेला तो अेक तक्ता असून त्याचें पहिलें सदर 'व्रतें' असें होतें. पण माझ्या वर्णनाने त्या तक्त्याची पुरी कल्पना वाचकांना येणार नसल्याने मी तो जसाच्या तसाच पुढे देत आहें—

**व्रतें, सण व उत्सव**
**( व्रतें )**

टीपः– खालील व्रताचरणाच्या दिवशीं आहारविहार अल्प व सात्विक ठेवावे. असे, की मन सुप्रसन्न राहील व व्रतपालन निर्वेधपणें व विनात्रास होईल.

| मिति | व्रताचें नांव | खुलासा |
|---|---|---|
| ता. १ जानेवारी | ज्ञान प्रतिपदा | आपल्या ज्ञानांत कोणत्याहि प्रकारें थोडीतरी भर घालणें. |
| ता. २ फेब्रुवारी | बल द्वितीया | आपलें शारीरिक व मानसिक बल वाढवण्याचा प्रयत्न करणें. |
| ता. ३ मार्च | सत्य तृतीया | सत्यपालन ( अर्थात् असत्याचरण व असत्य भाषण न करणें ). |
| ता. ४ अेप्रिल | अहिंसा चतुर्थी | कसलीहि ( जीवाची अगर मनाची ) हिंसा न करणें. |
| ता. ५ मे | अस्तेय पंचमी | चोरी न करणें व दुसऱ्यास करूं न देणें. |
| ता. ६ जून | कृषि षष्ठी | शेतीविषयक अनुभव घेणें. तत्संबंधी वाचन, घराभोवती बाग करणें. |
| ता. ७ जुलै | जल सप्तमी | जलाशय स्वच्छ करणें व केवळ जलपानावर दिवस काढणें. |
| ता. ८ ऑगस्ट | प्रकाशाष्टमी | दिवसभर उघड्यावर व रात्रीं झगझगीत प्रकाशांत राहाणें. |
| ता. ९ सप्टेंबर | मारुत नवमी | मोकळ्या व स्वच्छ हवेचें सेवन. |
| ता. १० ऑक्टोबर | आकाश दशमी | शक्य तर विमानांतून भरारी मारणें. निदान विमानाचें दर्शन. अेखाद्या वैमानिकाची भेट घेऊन त्याचें अभिनंदन करणें. |
| ता. ११ नोव्हेंबर | निर्मल अेकादशी | घर, शरीर, वस्त्र, पात्र निर्मल करणें. |
| ता. १२ डिसेंबर | महत् द्वादशी | आपल्या माहितींतील लोकांपैकी ( जिवंत किंवा मृत ) जे आपणास खरोखर मोठे व पूज्य वाटतात त्यांचें स्मरण व गुणसंकीर्तन करणें. |

( सण )

| मिति | सणाचें नांव | खुलासा |
|---|---|---|
| ता. १३ जानेवारी | क्रीडा त्रयोदशी | आपले आवडते खेळ मनमुराद खेळणें. |
| ता. १४ फेब्रुवारी | भक्षण चतुर्दशी | आपल्या आवडीचे विविध पदार्थ खाणें व पिणें. |
| ता. १५ मार्च | निद्रा पंचदशी | मनमुराद झोप. ( ती येण्यासाठी आदल्या रात्रीं खूप जागावें व या दिवशीं सुस्ती येईल असें अन्नसेवन करावें ). |
| ता. १६ अेप्रिल | विहार षोडशी | वनविहार, जलविहार वगैरे आपल्या आवडीप्रमाणे करणें. |
| ता. १७ मे | सफर सप्तदशी | अेखाद्या प्रेक्षणीय आणि रमणीय ठिकाणची सुख-सफर 'प्लेझर ट्रिप' करणें. |
| ता. १८ जून | संगीत अष्टदशी | गायनवादनाचा आस्वाद ( स्वतः येत नसेल तर दुसऱ्यांच्या मदतीने). |
| ता. १९ जुलै | नाट्य अेकोणिशी | नाटक करणें, पाहाणें, निदान वाचणें. |
| ता. २० ऑगस्ट | काव्य विशी | कविता करणें, अैकणें, निदान वाचणें. |
| ता. २१ सप्टेंबर | विनोद अेकविशी | अिष्टमित्रांशीं हास्यविनोद. |
| ता. २२ ऑक्टोबर | पुष्प बाविशी | सुवासिक व सुंदर फुलांचे हार, गुच्छ घेणें. घर फुलांनी सजविणें. अिष्टमित्रांना फुलें देणें. |
| ता. २३ नोव्हेंबर | सुगंध तेविशी | अुटणीं, तेलें, साबण, अत्तरें, सेंट्स् अित्यादींचा मनमुराद आस्वाद घेणें. या दिवशीं घरांत २४ तास सुवासिक अुदबत्त्या, चंदनाचा भुगा, सुवासिक धूप जळत असावा. |
| ता. २४ डिसेंबर | सुहृद चोविशी | अिष्टमित्रांचें संमेलन. |

**टीप**– या सणांच्या दिवशीं भरपूर विश्रांति, मिष्टान्नभोजन यांचा आस्वाद घेणें. स्त्रीपुरुषांना या सणांचा आनंद सारख्याच मोकळेपणाने घेतां यावा म्हणून भोजनादिक सिद्धता आदल्या दिवशींच करून ठेवावी. त्या दिवशीं स्त्रीला अगर पुरुषाला भरपूर मोकळीक असावी. जीं थोडीं आवश्यक कामें करावीं लागतील तीं अुभयता स्त्रीपुरुषांनी मिळून करावीं. अेकाने दगदग आणि दुसऱ्याने चैन करावयाची नाही.

## उत्सव

ही गोष्ट वैयक्तिक अगर सांघिक असल्याने ती ज्याच्या त्याच्या सोयींप्रमाणे करावी. अमुकच अेका महिन्यांत ती करावी असें बंधन नसावें. कृष्णाकाठचीं गावें जशीं कृष्णाबाअीचा अुत्सव आपापल्या आळीच्या सोयीप्रमाणे वेगवेगळ्या महिन्यांत करतात त्याप्रमाणे. तरीपण हे अुत्सव महिन्याच्या पंचविशीपासून अेकतिशीपर्यंत केले पाहिजेत. अुत्सवांतदेखील धर्म व समारंभ यांचा गोंधळ अुडतां कामा नये. संघशक्ति, कर्तव्यजागृति व बंधुभाव यांचें संवर्धन करणें हाच अुत्सवाचा हेतु असला पाहिजे. देवधर्म यांत घुसडले तर सर्वजातीय व सर्वधर्मीय लोक अेकत्र होअूं शकणार नाहीत. म्हणून या अुत्सव-सप्ताहांत तीं लचांडें मुळीसुद्धा येअूं देतां कामा नये.

ही दाजीकृत व्रतसणावलि अेकदाच वाचून माझें समाधान झालें नाही. दर वाचनांत मला दाजीचा निरनिराळा गुण अुठून दिसूं लागला. त्याची सुधारणावादी विचारसरणी, त्याची कल्पकता, योजनाकौशल्य अित्यादि गुणांची प्रचीति त्याच्या त्या खडर्याने मला आणून दिली. खरेंच, आपण या यादीप्रमाणे व्रतवैकल्याचें आणि सणासमारंभाचें शुद्धीकरण केलें तर काय बहार होअील, असा विचारहि माझ्या मनांतून झरकन सरकून गेला.

मी तो कागद आता देअीन, मग देअीन, म्हणून ती वाट पाहात होती; पण माझ्याकडून तो लवकर मिळण्याचें चिन्ह दिसेना; तेव्हा तो माझ्या हातून हिसकावून घेत ती म्हणाली,

" पुरे झालं. आम्हाला कळूं दे तरी यांत अेवढं काय ब्रम्हांड भरलं आहे तें ! "

तिनेहि ती जंत्री वाचून काढली, पण तिला त्यांत कांही विशेष वाटल्याचें दिसलें नाही. आणि वाटलें असेल तर शहाणपणा-अैवजी दाजीचा नेहमीसारखाच तो अेक आचरटपणा आहे असें तिला वाटलें असावें. कारण ती म्हणाली,

" तारखाच संपल्या म्हणून आखडली ही यादी. पण काय हो भाअूजी, अेवढे तुम्ही देशाचे अभिमानी, पण देशी तिथि टाकून परदेशी तारखाच कऱ्या हो घेतल्यात ? "

" मी देशाचा अभिमानी असलों तरी देशाचा अंध भक्त नाही." दाजीचें आत्मसमर्थन सुरू झालें. " आणि तुम्हाला सांगतों वैनी, ज्यांत दिडकी खर्च नाही व ज्यांत खरोखर सोय आहे अशा विदेशी गोष्टींचा अंगिकार करण्यांत मला मुळीच दिक्कत वाटत नाही. तिथि आमच्या आहेत, पण त्यांची शाश्वति कुठं आहे ? ज्या पंचांगाच्या पोटीं त्यांचा जन्म, त्या पंचांगांत अितका भरमसाट गोंधळ आहे, की अेकाचा पाडवा तो दुसऱ्याचा शिमगा, अेकाची अेकादशी तर दुसऱ्याची द्वादशी ! त्यापेक्षा पाश्चात्य दिनगणना सोयीची नव्हे काय ? जानेवारी १ तारीख म्हणजे त्रिभुवनांत जानेवारी १ तारीख ! मला माझीं हीं व्रतं आणि सण हिंदुस्थानांतच नव्हे तर सर्व जगांत ठराविक दिवशीं ठराविक पद्धतीनं साजरे केले जावेत, अशी जागतिक चळवळ करायची आहे. आणि वैनी, मीं ही यादी तिथि संपल्या म्हणून आखडती घेतली नाही, तर दरमहा अेक सण आणि अेक व्रत अेवढंच बस् आहे. हे बारा दुणे चोवीस दिवस व अुत्सव-सप्ताहाचे दिवस म्हणजे पुरा अेक महिना होतो व अकरा महिन्यांच्या ठराविक जीवनक्रमाला अेवढा फेरबदल पुरेसा आहे. "

" पण आपलीं जुनीं व्रतं आणि श्राद्धपक्ष यांची हकालपट्टी करायला कशाला हो हवी होती ? "

" याचं अुत्तर मीं मघाशीच दिलं आहे. केवळ स्त्रिया, केवळ पुरुष किंवा हिंदु यांचीं अलगअलग व्रतं-वैकल्यं मला सपशेल नामंजूर आहेत. स्त्री-पुरुष, हिंदु-अहिंदु या सर्वांना ह्या गोष्टी सारख्याच आवडीनं करतां याव्यात म्हणून माझी योजना आहे. आणि तुम्ही आजपर्यंत जीं करीत आलां, पण ज्यांतला हेतु कधी लक्षांत घेतला नाही, त्या व्रतांतील खरं साध्य ज्ञान, बल आणि शीलसंवर्धन हेंच नव्हे काय ? माझ्या व्रतांत याच गुणांची अुपासना मीं सांगितली आहे. आता श्राद्धपक्षाविषयी म्हणाल तर सध्याची श्राद्धपद्धति मला पूर्ण अमान्य आहे. मेलेल्या पितरांची तृप्ति हा श्राद्धांतील मुख्य अुद्देश नव्हे, तर मृत आणि श्रेष्ठ पूर्वजांविषयी आपणास वाटणारी कृतज्ञता प्रदर्शित करणं म्हणजेच श्राद्ध, असं मी समजतों. हें कृतज्ञताप्रदर्शन आपणास अिष्ट व सोयिस्कर वाटेल त्या प्रकारानं करावं. तें स्त्री-पुरुषांनी, हिंदु-अहिंदूंनी अेकाच दिवशीं करावं म्हणून ता. १२ डिसेंबरची ' महत् द्वादशी ' मीं मुद्दाम घातली आहे. "

दाजी थांबला. पण त्याला बोलायचें होतें तें बोलून झालें म्हणून नव्हे, तर " बाहेर कोणसं आलंय् " अशी सरलाबाअीने वर्दी दिली व मला अुठणेंच भाग पडलें म्हणून. मी अुठलों तशी तीहि अुठली " अुशीर झाला " म्हणून, आणि दाजीहि अुठला " लायब्ररींत जाअून येतों " म्हणून. अशा प्रकारें चांगलीच कडाडलेली आमची चहापार्टीची बैठक आकस्मिकपणें खलास झाली !

त्यानंतर दोन दिवस विशेष कांही घडलें नाही. नाही म्हणायला दोन प्रसंग असे आले, की ते दिसायला क्षुल्लक असले तरी त्या वेळीं दाजीने आपला दाजीपणा दाखवलाच.

दुसऱ्या दिवशीं लक्ष्मीपूजन असल्याने मला पानसुपारीचें आमंत्रण देण्यासाठी भाअीचंदशेठजी आले होते. माझ्याजवळ दाजीस बसलेला पाहून शेठजी म्हणाले, " पाहुण्यांनाहि घेअून या लक्ष्मीपूजनाच्या पानसुपारीला. "

शेठजींकडे तिरस्काराने पाहात दाजी आंत निघून गेला! शेठजींना तें जरा चमत्कारिक वाटलें असेल. माझ्याकडे आलेल्या सद्‌गृहस्थाशीं त्याने असें वर्तन केल्याबद्दल मीं आपली नापसंती व्यक्त केली तेव्हा दाजी म्हणाला, "हें लक्ष्मीपूजनाचं खूळ मला नामंजूर आहे! अन् त्याच्या समारंभाचं कोणतंहि निमंत्रण मी अस्संच धिक्कारीन."

दुसरा प्रसंग पाडव्याच्या जेवणांतला. त्या दिवशीं सरलाबाअीने ओवाळावें व दाजीने तिला ओवाळणी घालावी अशी तिची अिच्छा सरलाबाअीनेच दाबून टाकली होती. कारण दिवाळीच अमान्य असणारा दाजी ओवाळून घेणार नाही; मग हात दाखवून अवलक्षण करून घेण्यांत काय अर्थ आहे, हा सरलाबाअीचा विचार तिलाहि निमूटपणें मान्य करावा लागला. तरीपण दाजीला केव्हातरी चांगलेंच बोलून घ्यायचें ही तिची अिच्छा अधिकच तीव्र झाली आणि आमचीं जेवणें अर्धीअधिक झाल्यावर दाजीने जेव्हा लसणाची चटणी मागितली तेव्हा ती चिडक्या स्वरांत म्हणाली,

"अिश्श, हें हो काय भाअूजी तुमचं! चांगल्या जिलब्या खातांखातां लसणाच्या चटणीची कसली लहर आली तुम्हाला?"

"मिष्ट जिलब्यांबरोबर खमंग चटणी कांही वाअीट नाही लागायची, वैनी."

"आणखीसुद्धा पुष्कळ गोष्टी चांगल्या लागतील; पण वाटेल तेव्हा वाटेल तें मागितलं म्हणून वाढायचं की काय? आधी चातुर्मास आणि त्यांत आज पाडव्याची मेजवानी जेवतां आहां."

"पाडव्याची मेजवानी!" तिचेच शद्ब अुच्चारीत दाजी ताडकन् पानावरून अुठला आणि हात धुवावयास जात म्हणाला, "पाडव्याची मेजवानी मला साफ नाकबूल!"

आणि ती "असं हो काय? भारीच बाअी तुमचं!" असे केविलवाणे अुद्‌गार काढीत असतांच तो आपल्या खोलींत आधून

लवंडलासुद्धा! बाकी तो अगदींच अर्धपोटी अुठला नव्हता म्हणून बरें!

दुसऱ्या दिवशीं भाअूबीज. आज तिच्या सत्तेचा दिवस होता. आजचा दिवस बहीण म्हणून दाजीला ओवाळण्याचा परिपाठ तिनें ठेवला होता व दाजीहि सख्ख्या बहिणीपेक्षा अगत्यानें तिला निर-निराळ्या वस्तूंची ओवाळणी घालीत आला होता. हा प्रघात या वर्षी मोडणार असें तिनें आपल्या मनाशीं ठरवून टाकलें. कारण पाडव्याची मेजवानी झिडकारून अुठणारा भाअू, भाअूबीजेची भीड थोडीच ठेवणार?

तिच्या अुद्विग्न मनाची पुरी कल्पना येअूनसुद्धा तिची थोडी मौज करण्याचा मोह मला आवरतां आला नाही. मीं म्हटलें,

"अुद्या ओवाळणीचा बेत सकाळीं ठरलाय् की संध्याकाळीं? आणि मेजवानी कशावर बसवायची अुद्या?"

"दुसऱ्या गोष्टी नाहीतच का बोलायला?"

या अेकाच वाक्यांत तिची निराशा आणि तिच्यामुळे आलेली चीड अितकी स्पष्ट दिसत होती, की मीं आणखी कांही बोलणें म्हणजे जखमेंत मीठ भरणें होय असें मला वाटलें.

भाअूबीजेचा दिवस अुगवला. मी चहाला लौकर येत नाही म्हणून रोज माझ्यावर टीका करणारा दाजी, आज मी तोंड धुअून स्वयंपाकघरांत येअून बसलों तरी आला नव्हता!

"अजून अुठली नाही वाटतं स्वारी?" मीं विचारलें.

"अुठलेत तर काय झालं!" तिनें माहिती दिली.

"मग खोलींतसा बसलाय् आज?" मीं आश्चर्य दर्शविलें.

"चाललं असेल कांहीतरी लेखन नाहीतर वाचन." हा तिचा अजमास.

"मग बोलावून तरी आण."

माझी ही सूचना तिच्यापेक्षा सरलाबाअीलाच होती आणि तिनेहि ती ताडली. कारण पतिराजांना बोलावून आणण्यासाठी ती

त्याच्या खोलीकडे गेलेली दिसली. अर्ध्याच मिनिटांत ती परत आलेली पाहून तिने विचारलें,

" का ग? अेवढं कसलं गड ध्यायचं काम चाललंय् आज यजमानांचं ?"

" खोलींत नसायचंय् अन् कोटटोपीहि दिसत नाही आहे!"

" म्हणजे! गेला तरी कुठं हा अेवढ्या लौकर!" सरलाबाअीने दिलेल्या माहितीनंतर मीं म्हणालों; आणि त्यानंतर दाजीविना सुरू झालेल्या चहाच्या कार्यक्रमांत आमच्या शंकाकुशंकांची चर्चा सुरू झाली.

आठ वाजले, नऊ वाजून गेले, साडेनवाच्या दुसऱ्या चहाची वेळ झाली तरी दाजीचा पत्ता नाही, हें पाहून ती अधीर झाली व बाहेर जाऊन मीं त्याचा शोध करून यावें अशी तिची सूचनाहि आली. पण माझ्या मनांतून तो निष्फळ खटाटोप करावयाचा नसल्याने मीं तिची सूचना ऐकल्या न ऐकल्यासारखें करून रोजच्याप्रमाणे चहासाठी पाटावर जाऊन बसलों.

" भाअूजी आल्यावर घेतला तर ?" तिने विचारलें.

" माझी कांही हरकत नाही." असें म्हणून मीं पुढील किटलीवर गाळणें ठेवलें.

" मग आता कशाला ही घाअी ?" तिने विचारलें.

" हा चहा दाजी येईपर्यंत थांबवायचा ?" मीं म्हटलें, " हा झाल्यावर पुन्हा दाजीबरोबर." मी समजून न समजल्यासारखें दाखविलें. माझ्या या चहाबाजीबद्दल मानेला ऐसपैस वळसा देऊन तिने नापसंती दर्शविली; पण मिनिटभरांत भरलेला कप मात्र पुढे आला. मी चहापान करून अुठतांच कसलाहि आडपडदा न ठेवतां तिने मला बजावलें,

" आता आंघोळीच्या आधी शोध करून यावं भाअूजींचा. ते बाहेर गेले की घरीं यायची शुद्ध नसते त्यांना."

दाजीच्या शोधाला म्हणून नव्हे, तर कुठेतरी घटकाभर फेरफटका करून यावें म्हणून मी बाहेर पडण्याच्या तयारीला लागलों.

दाजीचा शोध करायचा म्हणजे करायचा कुठे ? अंधारांत चाचपडण्यासारखंच होतें तें. पण मी जात नाही म्हणून ती ऐकणार होती थोडीच !

मी पोषाख पुरा करून स्लिपरमध्ये पाय अडकवीत होतों, इतक्यांत—

" मनाजोगा एक जिन्नस मिळेल तर शपथ ! नांवाला शहर, पण खेड्यापेक्षा खेडं आहे हें ! " दाजीचा गहजब माझ्या कानांवर आला.

मीं मागे वळून पाहिलें. हातांत न्यूस पेपरमध्ये गुंडाळलेले लहानशा ट्रंकेएवढें एक पुडकें घेतलेला दाजी माझ्यापुढे अुभा !

" कुठं रे गेला होतास अेवढा वेळ ? आणि आणलं आहेस काय हें ? "

" पाहिजे होतं तें मिळालं नाही म्हणून मिळालं तें घेअून आलोंय् ! " असें म्हणून दाजी तडक आंत शिरला आणि " चला, आटपा वैनी लवकर ! " हें त्याचें फर्मान माझ्या कानांवर आलें.

चढवलेला जामानिमा अुतरून मी लगबगीने आत गेलों. दाजी आता कोणतें नवल दाखविणार याची मला अत्यंत अुत्कंठा वाटत होती.

देवघरांत ती पूजेची तयारी करीत होती. तिच्यापुढेच पाट ओढून घेअून दाजी बसला. त्याचें पुडकें त्याच्या मांडीवर होतें. ती त्याच्याकडे चकित दृष्टीने पाहात होती. स्वयंपाकघराच्या दारांतून सरलाबाअीहि पतिराज काय करतात यावर चोरटी व भीतियुक्त नजर लावून उभी होती.

" हं, आणा वैनी. "

" अहो, पण व्हायला तरी नको का ? दुसरा चहादिखील नुकताच झाला. "

" चहा नाही म्हणत मी. आधीं आरती अन् मग चहा. "

" काय आरती ! ती कसली बाअी ? "

" आरती ओवाळणीची. आज भाऊबीज ना ? "

" म्हणजे ! भाऊबीज आहे तुमच्या यादींत ? "

" माझ्या नाही, पण तुमच्या यादींत आहे. अन् म्हणूनच मला तुम्ही ओवाळा. "

" पण पाडवासुद्धा होताच की आमच्या यादींत ! "

तिचे हे शब्द अैकतांच माझी छाती धडधडूं लागली. तिच्या या डिवचण्याने कालची पुनरावृत्ति होते की काय, अशी धास्ती मला वाटूं लागली. पण तसें कांही झालें नाही. दाजी म्हणाला,

" तें कांही का असेना, मला भाऊबीज साजरी करायची आहे. ओवाळा मला. "

" पण घाअी कां अशी ? चहा घ्या, आंघोळ करा तेलबील लावुन, मग पानावरच ओवाळीन की मी. "

" तें नाही कबूल. " दाजी म्हणाला, " भाऊबीजेचा मुख्य कार्यक्रम म्हणजे ओवाळणी, तो प्रथम. मग चहा अन् जेवण. हं चला, आटपा झटपट. "

दाजीच्या शद्वाला विरोध वावडा असल्याचा तिला चांगला अनुभव असल्यामुळे तिने मुकाट्याने आरती तयार केली, दाजीच्या कपाळावर कुंकवाचा ठसठशीत टिळा लावला, डोक्यावर अक्षता टाकल्या आणि हसतमुखाने ओवाळलें.

मांडीवरील पुडकें तिच्या पायाशीं ठेवून दाजीने तिला साष्टांग नमस्कार घातला आणि म्हटलें,

" गरीब भावाची ही ओवाळणी गोड मानून घ्या. हिचा अुपयोग करून आनंदाचा आस्वाद घ्या आक्का. "

आक्का !

या शब्दासरशी तिला असें कांही हसूं आलें ! हातांतील आरती सरळपणें खाली ठेवतांठेवतां पुरेवाट झाली तिची !

" आज डब्बल मेजवानी दिली पाहिजे बरं का. " मी माझें हसूं आवरून म्हणालों, " अेक भाऊबीजेची अन् दुसरी तुझ्या बारशाची. आज नवं नांव ठेवलं तुला. "

" कांहीतरी नवल काढतां तुम्ही, भाऊजी. "

" नवल नव्हे हें. आजचं नातं भावाबहिणीचं. धाकटा भाऊ वडील बहिणीला ' आक्का ' म्हणतो यांत नवल कसलं ? हस–! चहा होऊं दे झटपट. "

पति-आज्ञा प्रमाण मानणारी आर्यमहिला ( दाजीने सोयी-साठीं केलेला सरलेचा संक्षेप ) चहासाठीं स्वयंपाकघरांत गेली आणि दाजी कपडे उतरण्यासाठीं आपल्या खोलींत गेला. आम्ही दोघें त्या ढीगभर ओवाळणीच्या पृथक्करणाला लागलों.

" पातळबितळ आहे वाटतं ? "– ती.

" भांडं असावं कांहीतरी. जड लागतंय् अन् खडखडतंय्हि. " मी.

पुडकें उलगडलें, आणि !–

प्रथम बाहेर निघाली फिनेलची बाटली !

" इश्श ऽऽ " तिचा शेरा उमटला.

" अजून संपलं नाही– " असें म्हणून मीं चिजा बाहेर उपसल्या. मनःशुद्धि नांवाचें एक हिंदी चोपडें, धुण्याच्या साबूचा बार आणि अंगाला लावण्याच्या साबणाच्या सुगंधी वड्यांची पेटी. आणखीहि एक चीज त्यांतून निघाली ! एरंडेलाची निळी बाटली !

इतक्यांत दाजी तेथे हजर झाला.

" असल्या ओवाळणीपेक्षा नुसती सुपारी घालायची होतीत ! " तिने नापसंतीच्या स्वराने म्हटलें.

" सुपारी कशाला ? दातांत अडकायला ? त्यापेक्षा मीं घातलेली ओवाळणीच अधिक सयुक्तिक आहे. आक्का, आज तारीख किती आहे ? अकरा नोव्हेंबर ! "

" बरं मग ? " ती बोलूं इच्छीत नाही असें पाहून मीं विचारलें.

" मग काय ? अकरा नोव्हेंबर म्हणजे माझ्या नव्या सांप्रदायाप्रमाणं निर्मल एकादशी. शरीर, मन, कपडे, घर सर्व कांही निर्मल करणं हें आजच्या व्रताचं तंत्र आहे. माझ्या ओवाळणींतल्या



आणखी अेक चीज त्यांतून निघाली !— अेरंडेलची निळी बाटली !

(पान १५८)

या वस्तु तें अुत्तम प्रकारें साध्य करतील. जुन्या परंपरेच्या भाअूबीजेशीं नव्या निर्मल अेकादशीची जोडणी करण्याचा शुभयोग आज मला मिळाला. तुमच्या या गचाळ गावांत मला हवा तितका अुत्तम माल मिळूं नये याबद्दल वाअीट वाटलं, त्यामुळें मिळतील ते जिन्नस घ्यावे लागले."

सरलाबाअीने आणून ठेवलेल्या चहाचा समाचार घेण्यांत दाजी गर्क झाला. मी तोंडाला रुमाल लावून तिच्याकडे पाहात बिनआवाजी हास्य करूं लागलों आणि "अहाहा! काय पण विचित्रपणा!" या अर्थी चेहरा करून तिने आपल्या बंधुरायास भाअूबीजेच्या दिवशीं नुसत्या हातानेच दुसऱ्यादा ओवाळलें!

★ ★ ★



# यज्ञमंडपांत

वळकटीचा लोड करून अेका टोकाप दाजी व दुसऱ्या टोकास मीं रेलले होतों. समोर ती रेशमाचें चित्र भरीत बसली होती व दारांतून बैठकीतील आमचें संमेलन दिसेल व वादविवाद अैकूं येअील अशा बेताने सरलाबाअी बसली होती.

आमच्या वाद्‌विवादाचा आजचा विषय ‘ शिष्टाचार ’ हा होता.

शिष्टाचाराकरिता आपलीं मतें व आवडी-निवडी विसराव्या लागतात व प्रसंगीं त्रासहि सोसावा लागतो, असा पूर्वपक्ष मीं केला होता. अर्थात् दाजीने अुत्तरपक्ष पत्करून ठासून सांगितलें, की “ आपल्या आवडीनिवडी विसराव्या लागतात हें कबूल, त्रास सोसावा लागतो हेंहि कबूल, पण मतं सोडावीं लागतात हें मात्र साफ नाकबूल ! कोणत्याहि कारणासाठी आपलीं प्रामाणिक मतं सोडणं म्हणजे तीं आपलीं खरीं प्रामाणिक मतंच नव्हेत असं लबूल करण्यासारखं आहे. ”

या प्रश्नावर वादविवाद झाला. सून अुवाच करून दिल्यानंतर मीं श्रोत्याची भूमिका पतकरली आणि दाजी व ती वादीप्रतिवादी बनलीं. नेहमीप्रमाणे कोणीहि हार खाण्याचें चिन्ह दिसेना. अखेर तिने असा अेक सवाल घातला, की त्याचा जाब देण्यापूर्वी दाजी क्षणभर गोंधळलेला दिसला. तिचा सवाल असा होता–“ स्वतःच्या मताबद्दल तुम्ही अितकं हें सांगतां भाअूजी, पण समजा, तुमच्या

घरीं तुमचे हेडमास्तर नाहीतर कुणी मुनसब, मामलेदार आले अन् त्यांनी सिगरेट शिलगावली तर तुमचं बैठकींत धूम्रपान न करण्याचं मत कितपत टिकून राहील ? शिष्टाचार म्हणून तुम्ही गप्प बसालच की नाही त्या वेळीं ? ''

या साध्या प्रश्नानें आपला पाडाव होऊं द्यायला दाजी थोडाच तयार होणार ! क्षणभर विचार करून तो म्हणाला, '' अगदी कांहीतरी बोलायचं म्हणून बोलतां तुम्हीं वैनी ! मतं हीं महत्त्वाच्या प्रसंगांनी पारखायचीं असतात. विडी-सिगरेटसारख्या किरकोळ गोष्टींत त्यांचं कसलं प्रदर्शन करायचं ? ''

'' बारीक गोष्टींनीच मोठ्या पराक्रमाचा अंदाज बांधायचा असतो, भाऊजी. विंचू बघतांच थरकाप उडणारा वीर साप मारायला किती धैर्यानं धावून जाईल हें दिसतंयच ! ''

हा वाद थांबण्याचें कांहींच चिन्ह दिसेना. चहाचें निमित्त करून वादीप्रतिवादींत फूट पाडायचीहि आशा नव्हती. कारण तो कार्यक्रम आधींच उरकला होता. फिरायला जाण्याची गोष्ट काढावी तर अजून पांचहि वाजले नव्हते. पण मला पडलेला हा पेच अनपेक्षितपणें सुटला. सुटला कसला !– एका पेचांतून सुटून त्यापेक्षाहि कठीण अशा दुसऱ्या एका पेचांत मी अडकलों !

घोट्यापासून चार बोटें वरच येईल इतकें आखूड धोतर आणि तेंहि मळकट, हरदासी अंगरखा, विटलेल्या पण रेशमी काठांचें उपरणें, गबाळा धुरकट रुमाल असा पेहराव; साधारणपणें तीन आठवडे तरी वाढलेली दाढी, करड्या कंकणीदार मिशा व दुबोटी आडवें गंध आणि अंगरख्यांतून गळ्यापाशी बाहेर आलेलें करदोट्याइतकेंच काळवटलेलें जानवें असा थाट– असे एक पोक्त गृहस्थ बैठकींत अवतीर्ण झाले. येतांक्षणीं माझ्या व दाजीच्या मध्यभागीं आसन ठोकून त्यांनी मला फर्माविलें, '' मोटारअड्ड्यावरून माझी पडशी तेवढी आणवा पाहूं अगोदर. ''

हा सारा प्रकार पाहून मला काय वाटलें असेल याची कोणासहि कल्पना येण्यासारखी आहे. ज्याचें आजन्मांत कधी तोंड पाहिलें नाही असा अेक प्राणी घरांत घुसतो आणि वर हुकमत गाजवतो ! मी त्याच्या तोंडाकडे नुसता पाहातच राहिलों !

" अैकूं आलं ना मीं काय सांगितलं तें ?" तो गृहस्थ त्रासिक स्वरांत म्हणाला, " पळशी मला तावडतोब हवी आहे, म्हणून म्हणतों ती लवकर आणवा. बघत काय बसलां नुसते आ करून ? तुम्हां अलीकडल्या लोकांत रीतरिवाजाचा बाजा ! आणि बायकांनी तर ताळच सोडलाय् शिंच्यांनी ! खुश्शाल पुरुषांच्यापुढं मांड्या ठोकून बसतात ! आम्ही असले थेर मुळीच चालूं द्यायचे नाही कधां. "

त्या जमदग्नीचा हा तडाखा अर्थातच तिला अुद्देशून होता. या तडाख्याला भिअून नव्हे, पण त्याचा तिटकारा वाटून ती आंत चालती झाली. माझा संताप दाबून ठेवतांठेवतां माझ्या नाकीं नव आले. दाजीदेखील या प्रकाराने शांत कसा राहिला याचें मला नवल वाटलें ! त्याच्या स्वाभाविक तिखटपणाने त्याने या अुपटसुंभाला धक्के देअून हाकलून लावावयास हवें होतें खरें म्हटलें तर.

" मीं आपणाला ओळखलं नाही. आपण कोण, कुठून आलां, कां आलां, हें कळलं तर बरं होअील. " मीं भीतभीत प्रश्न केला.

" मला असं प्रश्न करणारं तुमच्याशिवाय नाही कुणी भेटलं आजपर्यंत ! " व्याह्याला पाणक्या म्हटल्याबद्दल जितका संताप येअील तितक्याच संतापाने ते महाशय बोलूं लागले–

" हा महामहोपाध्याय मीमांसामार्तंड पुणेकरशास्त्री अखिल हिंदुस्थानांत सर्वांना मशहूर आहे ! तुम्ही मला कुणी आगांतुक समजतां होय ? पण मी तुमच्या घरीं आगांतुकी करायला आलों नाही. हें बघा– "

असें म्हणून त्यांनी अंगरख्याचे बंद सोडले आणि आंतल्या बंडीच्या खिशांतून अेक पाकीट काढून माझ्यापुढे टाकलें.

मी तें अुघडून वाचूं लागलों.

दाजी दोन्ही हातांच्या पंजांचा मानेला टेकू देऊन तुळशीकडे पाहात होता. चालू प्रकार आपल्या गावींहि नाही असेंच जणू तो भासवीत होता.

पण जवळ आल्यावर अग्नि सर्वांना सारखेच चटके देणार. मी पत्रवाचनांत गढलेला पाहून महामहोपाध्यायांनी आपली दृष्टि दाजीकडे वळवली.

"अहो, पसरलांत काय असे? चटकन् जाऊन माझी पडशी आणलीत तर!"

"तुम्ही यांचे पाहुणे आहांत; माझे नव्हे!" अेवढेंच म्हणून दाजी अुठला आणि आंत चालता झाला!

मीं पत्र वाचलें. ज्यांनी मला अनेक वेळां अनेक प्रकारें साहाय्य केलें आणि जे माझ्याकडे सदैव ममत्वाने पाहातात, त्या श्रीमंत काकासाहेब राजेबहाद्दुरांचें तें पत्र होतें. पुणेकरशास्त्री हे अेक वैदिक पद्धतीचा यज्ञ करणार असून त्याचा पुरस्कार श्रीमंतानी केला होता. मीहि स्थानिक लोकांकडून शास्त्रीबुवांना कांही द्रव्यसाहाय्य मिळवून द्यावें, अशी अिच्छा त्यांनी प्रदर्शित केली होती. दुसरीहि अेक कामगिरी त्यांनी मला सांगितली होती. ती म्हणजे, आमच्या या भागांत विपुलतेने मिळणारीं औदुंबर, पिंपळ, खैर अित्यादि प्रकारचीं थोडीं लाकडें यज्ञकार्यार्थ शास्त्रीबुवांना मिळवून देण्याची.

श्रीमंतांच्या शब्दाचा मान राखणें हें मला अवश्य वाटल्याने मी अुठलों आणि कामास लागलों. शास्त्रीबुवा मला अेकसारखे हुकूम फर्मावीत होते.

असल्या घमेंडखोर शास्त्र्याच्या नादाला श्रीमंतांसारख्या अनुभवी आणि बहुश्रुत माणसांनी लागावें याचें मला नवल वाटत होतें. श्रीमंत जुन्या परंपरेचे अभिमानी असले, तरी तिचे बडे भक्त खचित नाहीत. देशकालपरिस्थितीची चांगली जाणीव त्यांना आहे. आजच्या कालास असल्या यज्ञयागांत काळ, शक्ति आणि संपत्ति खर्च करण्यापेक्षा आधुनिक ज्ञानविज्ञानाची आराधना केली पाहिजे याची पूर्ण जाणीव




“तुम्ही यांचे पाहुणे आहांत, माझे नव्हेत !” (पान १६४)

त्यांना आहे आणि या भौतिक ज्ञानदानासाठी त्यांनी हजारो रुपये खर्चले आहेत. मग पुणेकरशास्त्र्यांचा यज्ञ त्यांना कां आवडला ?

हा प्रश्न मला कांही केल्या सुटेना. अखेर त्यांच्या महत्पदामुळे व कोणाची कसलीतरी भीड पडल्यामुळे किंवा अितरांना न कळण्या-जोग्या कांही कारणांमुळे त्यांना ही जबाबदारी पत्करावी लागली असेल, अशी मनाची समजूत घालून मी पुणेकरशास्त्र्यांच्या हुकुमाच्या अंमलबजावणीस लागलों.

व्यवसायधंद्यानिमित्त मला शेकडो प्रकारच्या लोकांचा पाहुणचार करावा लागतो आणि मर्जीहि संभाळावी लागते. शंभर तऱ्हेच्या शंभर माणसांशीं आतापर्यंत मला प्रसंग आला असेल, पण पुणेकरशास्त्र्यांचा नमुना मला अपूर्व वाटला ! संध्याकाळींसुद्धा स्वयंपाकापूर्वी स्नान करण्याची शिक्षा त्यांनी तिला फर्माविली ! लोखंडी खिळे ठोकलेला पाट बसावयास चालत नसल्याने मला शेजारच्या घरांतून चांदीच्या फुल्या मारलेले पाट आणावे लागले. म्हशीच्या दुधाचें त्यांना वावडें वाटल्यामुळे गायीच्या दुधाची भिक्षा मीं दहा घरांत मागितली; पण दाही ठिकाणीं निराशा झाल्यामुळे म्हशीचेंच दूध पाण्याने पातळ करून गायीचें म्हणून त्यांना पाजावें लागलें ! कधी बाहेर न काढलेला कद मला त्या दिवशीं परिधान करावा लागला आणि हा ब्रह्मसमंध सुखे-पणाने घराबाहेर कसा पडतो या फिकिरींत मला प्रत्येक क्षण काढावा लागला.

अेका कीर्तनांत अैकलेल्या दुर्वासाख्यानाची मला आठवण होअूं लागली. कृष्णाच्या सर्वांगास खीर चोपडून त्या ऋषिवर्यांनी त्यांची जी विटंबना केली तिचें वर्णन हरिदासबुवांनी रसभरित केलें. अितकी मर्जी राखूनहि दुर्वासमहाराज पुरे संतुष्ट झाले नाहीत आणि खीर न चोपडतां कोरड्या राहिलेल्या पायाच्या तळव्यांतच तुझा मृत्यु आहे, असा शाप त्यांनी श्रीकृष्णास ठोठावला ! नाना प्रकारचीं कपटकार-स्थानें करून लोकांना सतावणाऱ्या कृष्णाची हेबलंडी अुडवणाऱ्या दुर्वासा-बद्दल मला त्या वेळीं मोठें कौतुक वाटलें. वास्तविक त्या हतभागी

प्राण्याची मला कीव यायला पाहिजे होती असें मला आता वाटूं लागलें. आवें त्याच्या वंशा तेव्हा कळे म्हणतात तें असें !

आमचे कलियुगांतील दुर्वासमहाराज नाराज न होण्याबद्दल मी किती खस्ता खात होतों हें वर सांगितलेंच आहे. तरीपण त्यांना संतापाचे झटके अेकदोनदा आलेच ! पहिला मोठा आणि घर दणाणून सोडणारा झटका पाणी पिण्याच्या भांड्यामुळे आला ! सर्वांप्रमाणेच पितळेचीं भांडीं त्यांच्या पानाशींहि ठेवलीं होतीं. पाण्याचे गडवे आणि भांडीं अगदी तुकतुकीत ठेवण्याची तिची नेहमीच हौस असल्याने आज तीं अस्वच्छ असतील हें शक्यच नव्हतें. पण पाटावर बसतांच " हीं भांडीं कशाला ठेवलीं आहेत अिथं ? " अशी शास्त्रीबुवांची गर्जना झाली आणि भरलेला तांब्या कोपऱ्यांत भिरकावला गेला ! तांब्या-मागोमाग भांड्याने पलायन केलें हें सांगायला नकोच ! माझ्याकडे करुद्ध नजर फेकून महामहोपाध्याय कडाडले, " ब्राम्हणाला पितळेचीं पात्रं निषिद्ध आहेत हेंहि कळूं नये तुम्हाला ? तुम्हाला हा निषिद्धाचार करायचा असला तर खुशाल करा; पण मला नका बाटवूं आपल्याबरोबर ! मला तांब्याचीं नाहीतर चांदीचीं भांडीं द्या आणून. "

दाजी कोण्या वेळीं कसला तिरसटपणा करील याचा नेम नस-ल्याने तो पै-पाहुण्यांत न आलेलाच बरा असें मला नेहमी वाटे. पण आज त्याने यावें आणि या मीमांसामार्तंडाला आपला प्रभाव दाखवावा असें मला फारफार वाटूं लागलें. पण संध्याकाळपासून त्याचें मला दर्शनहि झालें नाही. " कठिण समय येतां कोण कामास येतो ? " हा चरण मनांतल्या मनांत घोळत मी जेवीत होतों.

जेवतांना शास्त्रीबुवांनी आपल्या आज्ञा सुनावण्याचें काम चालू ठेवलें होतें. दहा गाड्या औदुंबरकाष्ठें, दहा गाड्या पिप्पलकाष्ठें आणि यज्ञोपकरणें बनवण्यासाठी तीन गाड्या खदिरकाष्ठें त्यांना हवीं होतीं. अेक डबाभर मध आमच्याकडून त्यांना हवा होता !

मागला भात यायला आणि आचवावयास स्वयंपाकघरांतून दाजी बाहेर यायला अेकच गाठ पडली. रोज नुसता शर्ट घालून

जेवायच्यास बसणारा दाजी आज कोटहि घालून बसला होता आणि तशा स्थितींत खरकट्या हाताने त्याला बाहेर पडलेला पाहून सोवळ्या शास्त्रीबुवांचें पित्त भडकलें तर नवल कसलें ?

" ब्राम्हण ना हे ? " त्याच्याकडे पाहून शास्त्रीबुवांनी मला प्रश्न केला.

दाजीने तो प्रश्न अैकला. तो मनापासून हसला आणि " मन माझें क्रोधें भडके पाहूनि यास सामोरें " हें पुंडलिक नाटकांतलें गाणें गात बाहेर चालता झाला.

" आजारी आहे तो, म्हणून बसला होता कपडे घालून. " अशी सारवासारव करून मीं शास्त्रीमहाशयांचा दुसरा झटका शमविला.

भोजनोत्तर पाहुण्यांची निजवानिजव करून मी घरांत गेलों आणि आमची खासगी सभा सुरू झाली.

" काय मेला हा भाजाकार ! "– सरलाबाअी.

" ही ओली आग लवकर घालवायची हं. "–ती.

" यो यजमानाय पुरेपुरे करोति सः पुणेकरः | "–दाजी.

" राअिट यू आर. "– मी.

" सांगा वैनी, शिष्टाचारांत कर्तव्यपालन की मरण ? "

" पुरे हो भाअूजी तुमचं ! तुम्हीसुद्धा शिष्टाचार म्हणून मूग गिळून बसलांतच ना ? कां हो नाही खरडपट्टी काढलीत तुम्हाला सारं दिसत असून ? "

" काय संबंध माझा तुमच्या घरांत लुडबूड करण्याचा ? तुम्ही यजमान, ते पाहुणे ! खुशाल चालू दे गोंधळ हवा तसा ! वैनी, शिष्टाचार अुभयपक्षीं पाळावा लागतो. अेकानं शिष्टाचाराचं व्रत घ्यायचं आणि दुसऱ्यानं नादिरशाही जुलूम चालवायचा म्हणजे काय दुर्दशा होते ती पाहिलीत ना ? अुद्या अुठल्याबरोबर चंबू-गवाळं अुठवायचा हुकूम दिला पाहिजे तुम्हीं या राजेश्रींना. "

शेवटची सूचना दाजीने मला अुद्देशून दिली होती. मला ती मान्य होती; पण श्रीमंतांचा मान राखण्यासाठी मला ती अमलांत

आणतां येण्याजोगी नव्हती. शिवाय, अेका दिवसासाठी कशाला वाअीटपणा घ्या, असा अेक विचार माझ्या मनांत घोळत होता.

दुसरे दिवशीं नागरिकांना या पवित्र कार्याची माहिती देण्यासाठी शास्त्रीबुवांचें व्याख्यान धवलनाथ मंदिरांत ठरविण्यांत आलें. शास्त्रीबुवांच्या मोठमोठ्या पदव्या आणि त्यांचें प्रसिद्ध नांव यामुळे श्रोतृसमुदाय खूप जमला. स्त्रियाहि बऱ्याच आल्या होत्या.

वेदशास्त्रसंपन्न धोंडदीक्षित जटापाठी यांची अध्यक्षस्थानीं योजना झाली. प्रारंभीं मीं शास्त्रीबुवांचा औपचारिक रीत्या परिचय करून दिला. त्याचा सारांश— "महामहोपाध्याय मीमांसामार्तंड पुणेकरशास्त्री यांचें नांव व कीर्ति अितकी अफाट आहे, कीं त्यांचा निराळा परिचय करून देण्याची आवश्यकता नाही. आपल्या परमपूज्य वेदशास्त्रांत त्यांचा अधिकार फार मोठा असून वेदप्रणीत कर्माचरणाची त्यांची तळमळ अमर्याद आहे. (या माझ्या बोलण्याचा अर्थ मलाहि समजला नाही!) आता अधिक वेळ घेत नाही. स्वतः शास्त्रीबुवाच आपल्याला आपल्या आगमनाचा अुद्देश निवेदन करतील."

शास्त्रीबुवांचें भाषण सुरू झालें. त्यांची सफाअीदार भाषाशैली श्रोतृवृंदावर छाप पाडणारी होती. "अितर धर्मीय लोक आपल्या धर्मग्रंथास पूज्य मानतात व त्यांतील विधींचें श्रद्धापूर्वक पालन करतात म्हणून ते समाज टिकाव धरूनच नव्हे, तर बलिष्ट आहेत. आपला हिंदुसमाज या बाबतींत अुदासीन आहे. वेदांबद्दल त्यास आदर नाही व वेदविहित कर्मानुष्ठानाची तर त्यास गंधवार्ताहि नाही! या निराशाजनक परिस्थितीमुळेच हिंदूंच्या हिंदुस्थानावर अनेक आपत्ति ओढवतात. जलप्रलय, भूकंप, नवनव्या रोगांच्या साथी, यांचा कहर आपल्या धर्मकर्माच्या अुदासीनतेनेच अुडतो. ही शोचनीय स्थिति बदलून वैदिक पुण्यकर्माबद्दल समाजांत आवड अुत्पन्न व्हावी म्हणून वेदविहित "दर्भास्त्रुव्याग" नांवाचा महायज्ञ आम्ही श्रीक्षेत्र निरुंदवट येथे करणार आहों. त्या ठिकाणीं

सप्तगंगा आणि महानदी सह्यवाहिनी यांचा संगम असून ती अत्युत्कृष्ट यज्ञभूमि आहे. या यज्ञकर्मास वेदाभिमानी राजामहाराजांनी आणि धनिकांनी सक्रिय सहानुभूति दाखवलेली आहे; तशीच सर्वांनी दाखविली पाहिजे. कारण हा दर्भास्त्रुध्याग अतिशय मोठा अर्थात् प्रचंड खर्चाचा आहे. किमानपक्षीं पन्नाससाठ हजार रुपये रोख लागतील. याशिवाय साधनसामुग्री किती लागेल याची कल्पना करा. दोनशे डबे तूप, सात खंडी तांदूळ आणि पांच खंडी तीळ अितकी आहुति या यज्ञनारायणास देण्यांत येअील. अठरा अजापुत्रांची वपा होमिली जाअील. हा यज्ञ अठ्ठावीस दिवस चालेल. अेवढ्या मुदतींत अन्नसंतर्पण, ऋत्विजांची दक्षिणा यांसाठी आपण द्याल तितकी मदत थोडीच." अशा आशयाच्या शास्त्रीबुवांच्या भाषणाने भोळ्या श्रोत्यांवर बरीच छाप पडली. मला नवल वाटलें तें हें, की घरांत सळो की पळो करून सोडणारा त्यांचा कोपिष्टपणा सभेंत कुठेच दिसला नाही! अुलट, त्यांच्या भाषणांत नरमाअी व आर्जवीपणा अुतू येत होता. शास्त्रीबुवा म्हणजे कार्यसाधक प्रचारकाचा सर्वोत्कृष्ट नमुना असें मला वाटलें.

भाषणाचा समारोप करताना शास्त्रीबुवांनी म्हटलें,

"या बाबतींत कोणाला आणखी कांही माहिती हवी असल्यास विचारावी. ती आनंदानं देण्यास मी तयार आहे."

श्रोते अेकमेकांकडे पाहूं लागले; पण कोणीच अुठला नाही. शंका आली तरी विचारण्याचें धाडस फार करून कोणांत नसतें, असा नेहमीचा अनुभव असल्यामुळेच शास्त्रीबुवांनीं तें आव्हान दिलें असावें असें मला वाटलें. मिनिटभर कुजबूज होअून कोणी अुठेना तेव्हा शास्त्रीबुवांच्या चर्येवर सभा जिंकल्याचा विजयानंद दिसूं लागला. पण तो फार वेळ टिकला नाही

"दर्भास्त्रुध्याग या शद्बाचा अर्थ काय?" अगदी मागून सवाल आला.

तो दाजीचा होता!

"कोण तें? अिथं पुढं या." अध्यक्षांनी सांगितलें.

दाजा गंभीरपणें व्यासपीठावर आला. आता कांहीतरी खटका अुडणार असें मी समजून चुकलों. माझ्याकडे कसला दोष न येतां शास्त्रीबुवांची हजेरी घेतली जाणार म्हणून मला अेकपरी समाधान वाटलें. स्त्रीसमुदायांत मीं नजर टाकली. तिच्या मुखावरहि समाधानाचें हास्य चमकत होतें.

"बोला तुमचं म्हणणं."– शास्त्रीबुवा.

"दर्भास्त्रुग्याग याचा अर्थ काय?"– दाजी.

"त्याचा विग्रह करून अर्थ लावतां येत नाही व लावण्याचं कारण नाही. कारण तें वेदकथित विशेषनाम आहे."

"म्हणजे ज्यांत नांवापुरताहि अर्थ नाही असा हा यज्ञ आहे! बरं, याची फलप्राप्ति काय? आपण सांगितल्याप्रमाणे भूकंप, जलप्रलय किंवा रोगांच्या साथी यांचं निवारण हा या यज्ञकर्माचा अुद्देश आहे काय?"

"हा दर्भास्त्रुग्याग अरिष्टशांत्यर्थ नाही. हा अपूर्वासाठीं आहे. वेदांत नित्यकर्म म्हणून सांगितलीं आहेत त्यांत या यज्ञाचा समावेश होतो. अिष्ट फल प्राप्त करून देणारे पुत्रकामेष्टीसारखे यज्ञ वेगळे. त्यांना नैमित्तिक कर्म अशी संज्ञा आहे."

"म्हणजे अर्धापाअूण लाख रुपये खाअून तुमचा हा यज्ञ दृश्य असं कोणचंच फल देत नाही?"

"पण ज्याचा अुपयोग तुम्हाला आज दिसायचा नाही असं फार मोठं अपूर्व फल या यज्ञापासून मिळेल."

शास्त्रीबुवांचा हा खुलासा अैकून घेतल्यावर दाजीने श्रोतृवर्गास अुद्देशून भाषण केलें. त्याला बोलूं द्यावें की नाही याविषयीं अध्यक्ष व व्याख्याते यांची थोडी कुजबूज झाली. पण न बोलूं देण्यास सयुक्तिक असें कोणतेंच कारण त्यांना सापडलें नाही. आणि दाजीचें वक्तृत्व अनिर्बंधपणें सुरू झालें. दाजीचें म्हणणें असें—

"अपूर्व फल मिळेल या वेडगळ आशेवर कोणीं कोणतीहि गोष्ट करूं नये. अिष्ट फल मिळेल या आशेवरदेखील यज्ञासारख्या हमखास

फोल ठरणाऱ्या अुमाभरी करूं नयेत. जलप्रलय, अग्निप्रलय किंवा रोगनिवारणाचं सामर्थ्य आता या यज्ञात अुरलेलं नाही. सध्या अंध-श्रद्धेला जागा नाही. भौतिक शास्त्रांतील नव्यानव्या शोधांनी ती श्रद्धा पार नाहीशी करून टाकली आहे. प्लेगनिवारणास अिनॉक्युलेशन हाच खरा अुपाय आहे. शंभर यज्ञांनीदेखील प्लेगची साथ हटवतां येणार नाही.

" त्यांतून हा यज्ञ तर कोणतंहि प्रत्यक्ष फल देणारा नाही. ज्या-पासून होणारा लाभ दिसत नाही अशा गोष्टींत हजारो रुपयांची होळी करणं मूर्खपणाचं आहे. आम्हांला प्रत्यक्ष अुपयोग दिसला पाहिजे. आणि प्रत्येक पैचा अुपयोग करून घेण्याची आपण शिकस्त केली पाहिजे.

" शास्त्रीबुवा म्हणतात, हें नित्यकर्म आहे. असलं नित्यकर्म सांगणारे वेद मोठे अद्‌भुत असले पाहिजेत! खरोखर, नित्यकर्मं अशीं पाहिजेत, की सामान्य माणसाला आपले नित्याचे व्यवहार संभाळून कसलीहि गैरसोय न होतां तीं करतां यावीं. पण या वेद-विहित नित्यकर्मास अर्धापाअूण लाख रुपये, दोनशे डबे तूप, खंडो-गणती धान्य आणि अेक आगगाडीभर लाकडं लागणार! शिवाय बोकडांची खिरापत निराळीच!

" देशाची सद्यःस्थिति अत्यंत हलाखीची आहे. लोक दरिद्री झाले आहेत. त्यांच्या शिक्षणाची, आरोग्याची सोय असावी तशी नाही. धनिकांचा पैसा त्यासाठी प्रथम खर्च व्हावा. वोंडलंभर दूध मिळत नाही म्हणून गरिबांचीं मुलं तडफडताहेत आणि आम्ही अिकडे दोनशे डबे तूप आगींत ओतायला अुठतों! या तुपाच्या किंम-तींत किती निराश्रित मुलं दूध पितील? शास्त्रीबुवा निरुंदवटच्या यज्ञभूमीवर जे अर्धा लाख रुपये अुधळणार आणि अपूर्व फळ मिळा-ल्याचं काल्पनिक समाधान मानणार, त्यापेक्षा तिथं अेखादी शिक्षण-संस्था अथवा कारखाना काढला तर त्या पैशाचं प्रत्यक्ष फल आपल्या पदरांत पडेल आणि त्यानं आपलं कल्याण होअील. ज्याचा अर्थ

कळत नाही आणि ज्यांत आजची अडचण निवारण होत नाही, असल्या वैदिक यज्ञांचा निषेध केला पाहिजे."

या दाजीच्या विधानानंतर सभेला निराळाच रंग चढला! 'वैदिक यज्ञ' आणि 'निषेध' हे शब्द जवळ आणतांच वक्ते आणि अध्यक्ष डोळे फाडून दाजीकडे पाहूं लागले!

"वेदविधीचा निषेध करणारे कोण हो तुम्ही नास्तिक?" शास्त्रीबुवा कडाडले.

"मी कोण हा प्रश्न कां? मी काय म्हणतों त्यावर अुत्तर देतां आलं तर द्या." आणि माझ्या नांवावांचून तुमचं घोडं अडत असेल तर माझं नांव 'कल्याण दादर घाटकूपर' असं समजून चाला. माझं वय अठ्ठावीस, जन्म ब्राम्हण कुळांत, धर्म हिंदु, अित्यादि अित्यादि माहिती हवी तशी गृहीत धरा आणि सांगा, तुम्हाला माझं म्हणणं खोडून काढायचं आहे काय?"

"देव पूज्य मानणाऱ्या आस्तिकांची ही सभा आहे. अिथं तुमच्यासारख्या नास्तिकांना वादविवाद करतां येणार नाही." अध्य-क्षांनी निर्णय दिला.

"मला नास्तिक म्हणून अध्यक्ष माझी बेअब्रू करताहेत आणि याचा जाब त्यांना न्यायकोर्टांत द्यावा लागेल. मी जाहीरपणें सांगतों, की मी वेद पूज्य मानणारा आस्तिक असून वेदांची देव्हा-ऱ्यांत ठेवून पूजा करावी असं माझं मत आहे. मानवजातीच्या बाल्यावस्थेंत वाट दाखवणारे वाटाडे या दृष्टीनं ते मला पूज्य वाटतात. पण त्यांना देव्हाऱ्याबाहेर काढण्याची आतां आवश्यकता नाही. त्यांच्यावांचून आमचे सर्व व्यवहार सुसूत्र चालतील, अेवढंच नव्हे, तर त्यांच्यावांचून अुत्तम चालतील–"

"ही वेदरिपु राक्षसांची शिकवण आहे." अेक वृद्ध भटजी मध्येच ओरडले.

"कलींतले हे राक्षस!" स्त्रीसमाजांतून अेका आजीबाअीचा स्वर अुमटला.

"भिअूं नका आजीबाअी–" दाजी शांतपणाने सांगत होता, "मी राक्षस असलों तरी मी मानवांचीं कोवळीं मुलं पळवणार नाही की दुसरा कसला अुपद्रव देणार नाही. अुलट माझ्या हातून होअील तितकं मानवजातीचं कल्याण करणारा मी राक्षस आहे असं समजा. मात्र आजीबाअी, तुम्ही गुप्त राक्षसांपासून सावध राहायला शिका. हे राक्षस वेदभक्त असल्याचा बहाणा करतील. वेदविहित कर्मं काटेकोरपणें आचरतांना तुम्हांला दिसतील; पण त्यांचं जगाशीं वर्तन अत्यंत कद्रूपणाचंच असेल. ते पाहुणे जाअून यजमानाची दाणादाण करतील, पितळेचं स्वच्छ भांडं निषिद्ध म्हणून आदळतील, असेल तें गोड मानून न घेतां घरधन्याला आपल्यासाठी भिक्षांदेहि करायला लावतील! फार काय, दयामाया तर राहोच, पण साधी माणुसकीहि यांच्यापाशीं दिसणार नाही. आजीबाअी आणि सभ्यगृहस्थहो, मी तुम्हांला वेदाभिमानी लोकच वेदांचा अुपमर्द कसा करतात हें दाखवून देअीन. आंघोळ न करतां भस्म फासून भिक्षुकीस जाणारे, तंबाखूचा गोळा तोंडांत धरून मंत्र म्हणणारे आणि हवनादि विधि करतांना बीभत्स कोट्या करणारे वेदोनारायण किती दाखवूं तुम्हांला? घोटा पिणारे, वेश्यांचीं घरं पुजणारे –"

हीं दोन्ही विशेषणें अध्यक्षांना लागूं पडतात असा गावांत लोकप्रवाद होता. आणि दाजीला नेमकें येथेच त्यांनी अडवलें, "अुखाळ्यापाखाळ्या काढूं नका. आणि आपलं म्हणणं थोडक्यांत आटपा."

"मी अुखाळ्यापाखाळ्या मुळींच काढीत नव्हतों. माझं विधान सामान्य होतं. माझं म्हणणं अितकंच, की शास्त्रीबुवांचा हा यज्ञ अनावश्यकच नव्हे, तर हानिकारक आहे. या कामास कुणीं कसलीहि मदत करूं नये, असं माझं आग्रहाचं सांगणं आहे. शास्त्रीबुवांनीहि हें यज्ञाचं वेड डोक्यांतून काढून टाकावं आणि या निमित्तानं जमविलेला पैसा जनतेच्या हितासाठी कारणीं लावावा."

अेवढें बोलून दाजी व्यासपीठाखालीं अुतरला आणि श्रोत्यांनी टाळ्यांचा गजर करून त्याच्या म्हणण्याला संमति दर्शविली. शास्त्री-

बुवांनी खुलासा करण्याचा प्रयत्न केला, अध्यक्षांनीहि त्यांना अुचलून धरलें; पण त्यांच्या बोलण्याकडे फारसें कोणीं लक्ष दिलें नाही.

अखेर आपला हा अयशस्वी कार्यक्रम आटोपून खजील झालेले मीमांसामार्तंड संध्याकाळच्या मोटारीनें परत निघून गेले.

पण गोमेचा अेक पाय मोडला म्हणून ती पुरती लंगडी होत नाही. अेक गावचा अेका हात हुकला तरी दुसरीं शेकडो गावें शास्त्रीबुवांना फलद्रूप झालीं. कुठल्या सराफांनी पांचशे, तर कुठल्या राजेसाहेबांनी हजाराच्या देणग्या त्यांच्या पदरांत ओतल्याच. सह्यवाहिनीच्या तीरावर प्रचंड यज्ञमंडप अुभारला गेला, यज्ञकुंडें बांधलीं गेलीं, यज्ञीय द्रव्यांचा डोंगर साठला, बोकडांची दावण लागली, ऋत्विज बंधु आणि भोजनभाअू गोळा झाले आणि ठरलेल्या सुमुहूर्तावर शास्त्रीबुवांचेच कोणी अेक आप्त यजमानाची दीक्षा घेण्यासाठी आसनावर बसले.

तो सोहळा खरोखरच प्रेक्षणीय होता. पुराणांतरीं राजेमहाराजांनी केलेल्या यज्ञांच्या कथा आपण वाचतों. त्या कथा दृश्य रूपानें आपल्यापुढे खरोखरच घडत आहेत हें पाहून भाविक प्रेक्षकांचीं मनें भारलीं जात होतीं. लोक आपापसांत बोलत होते, "पुणेकरांसारख्या अधिकारी पुरुषानं प्रति कृतयुग दाखवलं आज आपल्याला."

कोणी तिथल्या धावपळीवर खूष, तर कोणी मंडपरचनेवर खूष! कुणी भोजनव्यवस्थेवर भाळलेले, तर कुणी आल्यागेल्या राजेराण्यांच्या थाटमाटावर संतुष्ट झालेले! चोहोकडे नुसता आनंदीआनंद नांदत होता!

या यज्ञकर्मांत आपली फूल ना फुलाची पाकळी तरी कारणीं लागावी म्हणून भक्त लोक अहमहमिकेनें कांहीतरी आणून देत होते. कोणी फुलें, कोणी तुळशी, कोणी अुदबत्त्या तर कोणी सुवासिक तेलें—अेक ना दोन! अेका वृद्ध आजीबाअींनी आपल्या धाबळीखालीं दडवून अेक डबा आणला होता. मीं त्यांना सहज विचारलें, "काय? काय आहे हें?"

" हे गव्हले आणले आहेत मीं करून. " आजीबाओी काकुळतीला येअून म्हणाल्या, " बारा कोसांवरून सोवळ्यानं आलें आहें मी! अेवढं पोचवाल का जिकडच्या तिकडं ? "

बाओीच्या भोळ्यॆ भावाचें मला कौतुक वाटलें आणि मी त्यांना मुदपाकखान्याच्या व्यवस्थापकांकडे घेअून गेलों.

यज्ञकार्याला सुरवात झाली. होमहवन चालू झालें. कुंडें धडधडलीं. धूर अुठला. तूप, तांदूळ, तीळ जळूं लागले. माणसें येत होतीं; यज्ञनारायणाचें दर्शन, पूजन करून यथाशक्ति दक्षिणा ठेवून जात होतीं.

होतांहोतां पहिला पशु बळी देण्याचा समय आला. पुरोहितांनी मंत्रपूर्वक अजापुत्राचें संस्करण केलें व त्याला वधयोग्य ठरवून वध-स्थलावर अुभें केलें. ब्राह्मणांचा हा खाटिकखाना पाहण्यास अुत्सुक झालेल्या प्रेक्षकांनी मंडप चिक्कार भरला. व्यवस्था ठेवतांठेवतां स्वयं-सेवक मेटाकुटीस आले !

त्याच वेळीं मंडपाबाहेर ताशेवाजंत्रीं वाजूं लागलीं आणि " वेदोनारायण की जय ! " अशी गर्जना अुठली. आंतील लोकांचें लक्षहि मंडपाबाहेर खेचलें गेलें.

पांढरीं सफेत धोतरें नेसले-पांघरलेले, शुभ्र गंधाचे नाम रेखलेले वीस लोक दोहोंच्या दहा रांगांनी मंडपांत लष्करी शिस्तीनें येत होते. प्रत्येकाच्या हातांत पांढऱ्याशुभ्र आवरणांनी आच्छादलेलीं तबकें दिसत होतीं. सर्वांनी आपापलीं तबकें यज्ञकुंडापुढे ठेवलीं, साष्टांग नमस्कार घातले आणि हात जोडून कांही न बोलतां अुभे राहिले.

त्या वीसांचा म्होरक्या कोण होता ? माहीत आहे ? दाजी !

मला मोठें आश्चर्य वाटलें ! सभेंत यज्ञाचा जाहीर निषेध करणारा गृहस्थ पुन्हा यज्ञाला येतो, सोवळ्यानें येतो, बरोबर माणसें घेअून येतो आणि रिक्त हस्तानें न येतां नजराणे घेअून येतो, हें आश्चर्य नव्हे काय ? पण दाजीनें मला अशीं कित्येक आश्चर्यें दाख-वलीं होतीं !

अितक्या लठ्ठ्याजम्यानिशी आलेल्या माणसांचें आगतस्वागत झाल्यावांचून कसें राहील ? खुद्द मीमांसामार्तंड पुणेकरशास्त्री पुढे आले. त्यांनी दाजीस ओळखलें. त्यांनाहि नवल वाटलें ! त्यांनी म्हटलें,

" हं ! तुम्ही ? अन् असे ? "

दाजी नुसता हसला.

शास्त्रीबुवांनी सर्वांना यज्ञकुंडापाशी नेअून त्यांच्याकडून अग्नि-नारायणास गंध-पुष्पें वाहविलीं.

" आपल्या विजयाचा फायदा घेण्याची सुसंधि ! शास्त्रीबुवा थोडीच दवडणार ! त्यांनी होमहवन थांबवलें, मंडळींना शांत केलें आणि भाषणास प्रारंभ केला,

" वेदाभिमानी स्त्री-पुरुषहो ! वेदोनारायणाची अलौकिक शक्ति किती अद्भुत आहे याचा अेक मासला मी आपणांस दाखवीत आहें. हे गृहस्थ ( दाजीच्या खांद्यावर हात ठेवून ) प्रारंभीं यज्ञविरोधी होते; पण आज त्यांचं यज्ञभक्तांत रूपांतर झालं ! हें रूपांतर कुणीं केलं असं आपणांला वाटतं ? मीं ? नाही. तर साक्षात् यज्ञदेवतांनी कुणाला न कळत हें कार्य केलं आहे. आणि लोकांना यज्ञकार्यावर बहिष्कार घालावयास सांगणारे हे गृहस्थ आज लोकांना बरोबर घेअून यज्ञपूजेस सादर झाले आहेत. "

शास्त्रीबुवांनी भाषण संपवतांच टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला आणि " वेदमाता की जय ! " " यज्ञनारायण की जय ! " अशा गर्जना अुठल्या.

पुन्हा शांतता झाल्यावर दाजी भाषण करूं लागला.

" वेदमूर्ति विप्रवर्य आणि वेदभक्त सभाजनहो ! शास्त्रीबुवांनी सांगितलेली हकीकत सर्वथैव खरी आहे. यज्ञयाग हे सद्यःकालाला अनावश्यक व हानिकारक आहेत असं माझं मत होतं. सर्वारिष्टशांतीकरिता यज्ञयाग करीत बसण्यापेक्षा शास्त्रीय शोधांची कास धरणंच योग्य, असं मला प्रथम वाटत होतं आणि आताहि वाटतं. यज्ञकर्मांत खर्च केला जाणारा पैसा, काळ व श्रम लोककल्याणाच्या व्यावहारिक

गोष्टींच्या कारणीं लावला जावा असं पूर्वीप्रमाणंच अद्यापिहि माझं मत आहे.

"पण हे यज्ञयाग अगदी निरर्थक आहेत अेवढं माझं मत मात्र आता बदललं आहे. या यज्ञकर्माच्या पुनरुज्जीवनानं आपल्या समाजाचा फार मोठा फायदा होणार आहे. बुद्धकालापासून अहिंसा तत्त्व आचरणांत येअूं लागल्यानं लोक स्वाऱ्या-शिकाऱ्यांपासून अलिप्त राहूं लागले आणि अर्थातच मृगयेबरोबर येणारं मांसभक्षणहि सुटलं. मांसभक्षक समाजापेक्षा आमचा शाकाहारी समाज हीनबल ठरूं लागला. अशा काळीं मांसाशनाची प्रथा धार्मिक रीतीनं सुरू होणं आवश्यक आहे. आणि ही चाल पाडण्याचं कार्य या शास्त्रीबुवांच्या यज्ञानं होअील असं वाटल्यामुळं मी माझा अितर विरोध विसरून यज्ञोपासक बनलों. पण मला या बाबतींत या ऋत्विज मंडळींना अेक सूचना करावयाची आहे. या यज्ञांत ज्या पद्धतीनं बोकड मारले जाणार आहेत, ती पद्धत त्रासाची आणि क्रूर आहे. शिवाय त्यांचं मांस ज्या पद्धतीनं भाजलं-शिजवलं जातं ती तऱ्हाहि हिडीस आणि ओंगळ आहे. मांस सोलावं कसं, शिजवावं कसं आणि वाढावं कसं याची आधुनिक कला आपण स्वीकारायला हरकत नाही- नव्हे, ती अंगिकारलीच पाहिजे. अेवढ्याचसाठी माजी गव्हर्नरांकडून प्रशंसापत्र मिळवलेले माझे मित्र हे सगनाजी आणि ताजमहालसारख्या सुप्रसिद्ध हॉटेलांत जबाबदारीचीं कामं केलेले हे देवजी धर्माजी यांना आपल्या सर्व आयुधांनिशी मीं अिथं आणलं आहे."

दाजीच्या फौजेने झाकणें काढलीं. मीटचॉपर, सुऱ्या, वगैरे लखलखीत हत्यारें तबकांत होतीं, तीं प्रत्येकाने हातांत घेतलीं!

"भ्रष्टाकार! भ्रष्टाकार! चांडाळ यज्ञमंडपांत!" ब्राम्हण मंडळी चवताळून अुठली. प्रेक्षक मात्र प्रेक्षकच होते. त्यांनी पक्ष कोणाचाच घेतला नाही.

पुणेकरशास्त्री चडफडत म्हणाले, "राक्षसा! या म्हारड्यांना या पवित्र भूमींत कां आणलंस?"

"काय हरकत आहे? तेहि हिंदु आहेत आणि स्वच्छ आहेत. शिवाय तुम्ही जें काम अडाणीपणानं करणार आहां, तेंच काम सुबकपणानं करायचं कौशल्य त्यांच्या अंगांत आहे." दाजीने अुत्तर दिलें.

आता निरंदवटचा गंगाघाट पानपत बनतो की काय, अशी भीति वाटूं लागली; पण त्यांचे तल्लख सुरे पाहून भटजीमंडळींनी बोटें मोडत आणि दात खात माघार घेतल्यामुळे तो प्रसंग टळला.

जसा वाजत-गाजत आला तसाच वाजत-गाजत दाजी निघून गेला.

अस्पृश्य-स्पर्शाने विटाळलेली यज्ञभूमि व यज्ञकुंडें आता शुद्ध कशीं करावयाचीं याची वाटाघाट ऋत्विजवर्गांत सुरू झाली.

कांही संशयी मंडळींना वाटलें, असा प्रथमग्रासे मक्षिकापात झाल्यावर कार्य पुढे न चालवणेंच अिष्ट. व्यवस्थापकांपैकी बऱ्याच जणांचें असें मत पडलें आणि त्या दर्भास्त्रुख्याग यज्ञाची सुरवातीबरोबरच परिसमाप्ति झाली!

दुपारीं कार्यकर्त्यांची सभा भरून जमलेला द्रव्यनिधि महाराष्ट्र युनिव्हर्सिटीला द्यावा असा ठराव करण्यांत आला. त्या द्रव्यनिधीपैकी पांच हजार रुपये आपल्या मेहनतीचा मोबदला म्हणून घेण्याचा ठरावहि त्याच वेळीं पास करून घेण्यास पुणेकरशास्त्री चुकले नाहीत.

जमलेली शिधासामुग्री ऋत्विजमंडळींना वांटण्यांत आली. कोल्हे काकडीला राजीच!

यज्ञ फिसकटला, पण कोणाचें कांही बिघडलें नाही.

सर्वांत खूष झाले असतील तर ते बोकड. चारदोन दिवसांचें दीर्घायुष्य तरी त्यांना दाजीमुळे मिळालें.

दाजीची अन् माझी भेट झाल्यावर तो म्हणाला,

"विध्वंसक मार्गानं विधायक सुधारणा करायला झालं तरी डोकं लागतं!"

★ ★ ★



# लग्नमंडपांत दाजी

आम्ही दोघेंहि दाजीकडे पांडवगावीं आलों होतों. अुन्हाळयाची सुटी हें मुख्य कारण होतेंच; पण दुसरेंहि अेक कारण होतें. माझे मित्र आणि दाजीचे हेडमास्तर बन्याबापू गोरे यांनी आपल्या मुलीच्या लग्नसमारंभास सहकुटुंब हजर राहण्याबद्दल मला अितक्या आग्रहाचें आमंत्रण अूर्फ फर्मान सोडलें होतें, की तें चुकविणें मला शक्यच नव्हतें. लग्नसमारंभाला तर गेलेंच पाहिजे, मग आधी चारआठ दिवस जाअून दाजीची फार दिवसांची तक्रार कां काढून टाकूं नये, या अुद्देशाने आम्हीं आधी येअून त्याच्याकडे तळ टाकला होता.

पहिले चारपांच दिवस सांगण्यासारखें विशेष कांही घडलें नाही. विशेष कांही घडावयाचें म्हणजे कोणत्यातरी मुद्द्यावर दाजीचा व आमचा (मुख्यतः तिचा) वादविवाद व्हावयाचा. पण अशा वाद-विवादाला तसा विषयच मिळाला नाही. आज तसा विषय मिळाला तो म्हणजे बन्याबापूंच्या घरचें केळवण. आम्ही सर्वच मंडळी लाडवां·वर ताव मारून येअून आराम करीत होतों. ती सहज म्हणाली,

"बन्याभाअूजींना मुलीसाठी दोनअडीच हजारांचा तरी खर्च येणार."

" मुलीसाठी नव्हे ! " दाजीने विरोध केला. " बापूसाहेब आपल्या मूर्खपणामुळं हा दंड भरणार असं म्हणा हवं तर. "

मी समजून चुकलों, की आता सभा चांगलीच रंगणार !

" मुलीचं लगीन म्हणजे मूर्खपणा झाला वाटतं ? मग बायकोला लुगडीं घेणं हादेखील मूर्खपणाच म्हणाल तुम्ही ! " तिने सवाल टाकला.

" अर्थाचा अनर्थ करून आडरानांत नका शिरूं तुम्ही, वैनी. मुलीचं लग्न करणं हा खरा मूर्खपणा म्हणत नाही मी. पण तें लग्न ज्या पद्धतीनं केलं जातं ती पद्धत वेडगळ आहे आणि त्या वेडगळपणानंच पैशाची नासाडी होते हा माझा मुख्य आक्षेप आहे. आजचं हें केळवणच घ्या. काय संबंध आहे याचा लग्नाशीं ? निष्कारण गाव गोळा करायचा आणि पंगती उठवायच्या ! "

" अहो, पण लग्नकार्याच्या या प्रकारांत दुसरा अेक अुद्देश न कळत साधायचा असतो. अन् त्यासाठी असे समारंभ अवश्य असतात हें लक्षांत घ्या की ! आपले आप्तेष्ट आणि स्नेहीसोबती यांचं हें ग्यादरिंग अनायासं होतं या निमित्तानं आणि ग्यादरिंग म्हटल्यावर मेजवान्या अन् हौसामौजा चालायच्याच. "

" हौसामौजा चालल्या तर अेक सोडून चार दिवस केळवण करायला मी आनंदानं मान्यता देअीन; पण आमच्या या लग्नमंडपांत हौस किंवा मौज यांना अजीबात मज्जाव असतो ! तुम्ही संमेलन म्हणतां वैनी, पण आजचंच अुदाहरण घेअून पाहा. बन्याबापूंची बायको किंवा बन्याबापू आपण जमवलेल्या मायेच्या माणसांशीं ख्यालीखुशालीचा अेक शब्द तरी बोलले का ? वरपक्षाची अुस्तवारी, आचारीपाणक्यांची मनधरणी, वाजंत्र्यांशीं घासाघीस, बायकोची नवऱ्याशीं आणि नवऱ्याची बायकोशीं धुसफूस आणि मुलांलेकरांवर कावाकावी, याहून त्या लग्नमंडपांत काय पाहिलंत तुम्हीं ? या संमेलनांत हौस किंवा मौज कुठं दिसली तुम्हांला तें तरी कळूं दे अेकदा ! "

दाजीचा हा रोकडा सवाल तिला निरुत्तर करणारा होता.

गोंधळलेल्या प्रतिपक्षांवर अधिक निकराने हल्ला चढवावा हें लढवैय्याला माहीत असतें. दाजी वाक्‌युद्धांतील लढवय्या असल्याने तिच्या अुडालेल्या गोंधळासरशी त्याने प्रश्नांची फैर सुरू केली,

"बोला वैनी, तुमच्या या लग्नकार्यांत सुख कुणाला होतं? ज्याच्या घरीं कार्य त्याची दुर्दशा तर विचारूंच नका! पण आजू-बाजूच्या परिवारालाहि तुमचीं हीं कार्यं सळो की पळो करून सोडीत असतात! लोकांच्या घरच्या लग्नमुंजीची झळ प्रथम शेजाऱ्या-पाजाऱ्यांना बाधते. मनांत नसलं आणि सोय नसली तरी केळवण करावं लागतं! जेवण नाही तर फराळाचा तरी बेत केलाच पाहिजे! आणि लुगडं नाही दिलं तरी खणनारळाचा भूर्दंड सोसलाच पाहिजे! नजीकच्या आतिष्टांना केळवणाचा छळ सोसावा लागतो तर दूरच्या नातलगांना भाड्यातोड्यापायीं खड्ड्यांत पडावं लागतं. आहेर सर्वांच्या राशीला आहेच! म्हणजे येनकेनप्रकारेण हीं तुमचीं कार्यं प्रत्येकाला पीडत असतात. मनांतून रडत आणि वरकरणीं हसत आम्ही तीं साजरीं करीत असतों."

"मग काय नवरा-नवरींना धरून आणावं अन् म्हणावं, 'झालं रे बाबांनो तुमचं लग्न—' असं का म्हणणं आहे तुमचं, भाअूजी?"

"थोड्याफार अर्थानं तसंच. पण नवरा-नवरीला धरून आण-णारे तुम्ही कोण? नवरा-नवरी स्वतःच्या पसंतीनं अेकत्रित आलीं पाहिजेत आणि तुम्ही बिनतक्रार आणि विनाविलंब त्यांचं दांपत्यपण मान्य केलं पाहिजे. त्यांच्या या निवडीनं त्यांच्या अुत्तर आयुष्यांत कांही हानि होणार असेल तर ती त्यांना तुम्ही दाखवा आणि ती चुकवण्याचा मार्गहि त्यांना दाखवा. हानि पत्करूनदेखील तें जोडपं लग्नाचा आग्रह धरील तर तोहि तुम्हीं पुरवला पाहिजे. तात्पर्य अेवढंच, की लग्न हा ज्या दोन व्यक्तींचा प्रश्न, त्यांना तो आपल्या अिच्छेप्रमाणं खुशाल सोडवूं द्या. तुम्ही कशाला लुडबूड करतां त्यांत? पण तुम्हांला देवाला धाब्यावर बसवून गुरवांचा गोंधळ

माजवायची खोड लागली आहे त्याला तुम्ही तरी काय करणार? तुमच्या लग्नसमारंभांत नवरा-नवरी कुठं कानाकोपऱ्यांत दडलेलीं असतात, घालाल तें खातात, नाचवाल तशीं नाचतात; आणि तेजी येते व्याही-विहिणींना आणि करवल्यांना!"

दाजींचें हें व्याख्यान मूळ मुद्दा सोडून थोडेंथोडें बाजूस सरकूं लागलें असा भास मला झाला. दुसरी गोष्ट म्हणजे तें लांबूंहि लागलें. तेव्हां मीं मध्येच म्हटलें, "अरे पण गृहस्था, अेवढा पाल्हाळ लावला आहेस त्यापेक्षा विवाहसमारंभ कसा साजरा व्हावा हें सांग म्हणजे झालं."

"राअिट यू आर!" दाजी ताबडतोब अुद्‌गारला. "या गोष्टीचा मीं आधीच विचार करून ठेवला आहे. अनुरूप वधूवरांनी परस्परांची निवड केली की तसाच भयंकर धोका नसेल तर वडील मंडळींनी त्या योजनेला मान्यता द्यावी. त्यानंतर अेक दिवस मुक्रर करून स्थानिक आप्तेष्टांना बोलवावं. त्यांच्यासमोर अुभं राहून वधूवरांनी परस्परांचा जन्माचा जोडीदार म्हणून स्वीकार केल्या-बद्दल जाहीर कबुली द्यावी आणि निमंत्रित मंडळींनीहि 'शुभं भवतु' असा आशीर्वाद देअून समारंभ संपूर्ण करावा. बोला किती वेळ लागेल या गोष्टीला अन् खर्च तरी कितीसा येअील? लग्न-समारंभाला अेक तास आणि अेक रुपाया भरपूर आहे असं मी म्हणतों."

"अगदीच खिरस्ताळलां तुम्ही भाअूजी! खिरस्ती लोकांत तुम्ही म्हणतां तशीं लग्नं होतात; पण त्यांतसुद्धा थाटमाट आणि पैशांची अुधळपट्टी असतेच. युरोपियन लोकांचं अनुकरण तुम्हांला ज्यांत त्यांत करायला हवं; पण आपल्या धर्माप्रमाणं ज्या गोष्टी करायच्या त्या केल्याच पाहिजेत हें कसं विसरतां तुम्ही अगदीच?"

"मला कुणाचं अनुकरण करायचं नाही, वैनी. तुम्ही म्हणतां तसा मी खिरस्ताळलों नाही. फार काय, मी कोणत्याच प्रकारें धर्माळलों नाही. मी फक्त व्यवहारी दृष्टीचा मनुष्य आहें. यातायात

वाचवतां येत असेल तर वाचवावी, पैशाची व्यर्थ नासाडी करूं नये, अमोलिक आयुष्याचा काळ व्यर्थ अुधळूं नये, अेवढी माझी साधी आणि सरळ अिच्छा आहे.

"दुसरी खरी गोष्ट सांगतों तुम्हाला, वैनी. लग्नकार्यांत आपण ज्या गोष्टी करतों, तो शंभर टक्के आचरटपणा आहे हें मनांतून माहीत असतं; पण तें जनांत कबूल करण्याअितकी छाती असत नाही. म्हणून धर्माच्या मोठ्या नांवाखाली आपण आपला खुळेपणा दडवूं पाहतों. तुम्ही धर्मवाद्यांना माझा अेक साधा आणि सरळ प्रश्न आहे—धर्म शुद्ध, सात्विक, शांत आणि आनंदमय असला पाहिजे, हें तरी तुम्हाला मंजूर आहे ना? मग हवा तो धुडगूस घालायला तो तुम्हाला कसं सांगेल?"

"धुडगूस!" तिलासुद्धा दाजीच्या या शद्वाची मौज वाटली; पण ती आपलें धर्मसमर्थन पुढे चालवीत म्हणाली, "माणसं तुम्ही म्हणतां तसा धुडगूस घालीत असलीं, तर त्याचा दोष कांही धर्माकडं नाही. धर्म तुम्हांला फक्त अमुक विधि करा म्हणून सांगतो—"

"धर्म सांगत नाही— सांगत होता असं म्हणा वैनी पाहिजे तर! धर्म हा माणसांच्या स्वास्थ्याकरिता आहे. दहा हजार वर्षांच्या पूर्वीच्या माणसांचं स्वास्थ्य ज्या धर्मविधींनी साधलं, तेच धर्मविधि आजच्या माणसांना सुखदायक होणार नाहीत, म्हणून ते निरर्थक आहेत असं आपण मानलं पाहिजे आणि त्यांना अर्जाबात छाट दिला पाहिजे. तुम्ही मुंजीचं अुदाहरण घ्या. ब्राम्हणांव्यतिरिक्त अितर जाती या मुंजीच्या केंचींतून सुटल्या आहेत, हें त्यांचं नशीबच समजलं पाहिजे. ब्राम्हण आज आपलीं पोरं वनांत वेदाभ्यासासाठी पाठवीत नाहीत, तीं माधुकरी मागत नाहीत, अग्निकार्य करीत नाहीत, ब्रम्हचाऱ्याचे निर्बंध त्यांना नसतात. तीं गोड खातात, वाटलं आणि साधलं तर दिवसा झोपतात, त्यांच्याबरोबरच मुलीहि शिकत असल्यामुळं त्यांना त्यांचीं तोंडं पाहावींच लागतात, आणि सर्वांत मोठी गोष्ट म्हणजे प्राण

कंठाशीं आला तरीदेखील जी भाषा बोलूं नये असं दहा हजार वर्षांचा जुना धर्म फर्मावतो, ती यावनी भाषा ब्राम्हणपुत्र अभ्यासतात! अशा स्थितींत हें मुंजीचं अवडंबर कशासाठी माजवायचं? पण विचार कोण करतो?"

मध्येच दाजीला कसलीशी आठवण झाली व ताड्कन् अुठून धावतच तो आपल्या बैठकींत गेला. तो कसलीतरी नवी चूष घेअून येणार ही माझी कल्पना खोटी ठरली नाही. जुन्या वर्तमानपत्रांचे चारपांच अंक हातीं घेअून तो परत आला व म्हणाला, "हे पाहा वैनी, लोकांच्या अडाणीपणाचे जगजाहीर झालेले पुरावे!"

असें म्हणून अेका राजपुत्राच्या अुपनयनसमारंभाचीं सचित्र वर्णनें त्याने आम्हांला दाखवलीं. समारंभास अितके राजेरजवाडे जमले, अितक्या राण्या व राजकन्या गोळा झाल्या, अक्षतीच्या मिरवणुकींत ज्यांना वाड्यांतल्या वाड्यांत चालण्याचाहि सराव नाही असे हे राजेलोक पायीं फिरले, अमक्या बाअीसाहेबांचे तमक्या राणीसाहेबांनी पाय धुतले व त्यांची सोन्याचांदीच्या गव्हले-मालत्यांनी ओटी भरली– या साऱ्या वेडगळ प्रकारांचें विडंबनात्मक स्वरांत वाचन करून दाजी चित्रचिकित्सेकडे वळला. चंद्रकोरीवर आरूढ झालेले युवराज, देवकप्रतिष्ठापनेस बसलेले ते राजदंपति, आशीर्वादाचा कृपाकर त्यांच्या मस्तकीं ठेवणारे ते अखिलब्रम्हांडनायक सद्गुरुमहाराज अित्यादि चित्रें दाखवून दाजी म्हणाला, "आता सांगा तुम्हीच, या प्रकारांत ज्याला धर्माचार म्हणतां येअील असा कोणता भाग आहे?"

ती कांही अुत्तर देअूं शकत नाही असें पाहून दाजी अधिक अुमेदीने म्हणाला, "श्रीमंत लोकच तेवढे असमंजसपणें वागतात असं समजू नका तुम्ही. मध्यम अैपतींतले पण विद्वान लोकहि सुधारणा म्हणून आचरटपणा करतात. हा पाहा त्याचा मासला–" असें म्हणून दाजीने त्याच वर्तमानपत्रांतील अेका शास्त्रीबुवांच्या मुलाच्या मुंजीची हकीकत वाचून दाखवली. अनावश्यक रूढाचारावर

बहिष्कार घालून शास्त्रीबुवांनी अुपनयनविधि सुटसुटीत केला. हिंदूंच्या मंगलकार्यांत अहिंदु वादकांना न बोलावण्याची अिष्ट प्रथाहि त्यांनी पाळली. या दोन्ही गोष्टी अभिनंदनीय असल्या तरी करढोल-हलग्यांच्या कडकडाटांत त्यांनी मिरवणूक काढली हें मात्र हास्यास्पद झालें असें दाजीचें म्हणणें. वडार, डोंबारी किंवा अलावा, शिमग्यांतलीं सोंगें ज्या वाद्यांत मिरवतात त्याच वाद्यांत शास्त्रीबुवांच्या सुसंस्कृत परिवाराने मिरवण्यांत सौंदर्य काय आणि रसिकता तरी काय? मुळींच मिरवणूक काढली नसती तर काय अुपनयनविधि अपुरा राहिला असता? आणि काढायचीच होती तर हलगी-करढोलांवांचून हिंदी वादकांनीच वाजवलेलीं दुसरीं मंजुळ वाद्यें काय मिळालीं नसतीं?

दाजींचीं हीं मतें तिलाहि पटलीं. ती म्हणाली, "खरं आहे तुमचं म्हणणं, भाअूजी. तसल्या कर्कश तडतडाटांत मी तर मुळीं-मुळीं मिरवलें नसतें. अिश्श!"

"मग सांगतों काय वैनी, या लग्नामुंजीच्या ख टा टो पां त लग्नामुंजींपेक्षा निराळ्याच गोष्टी साधायच्या असतात लोकांना! आपलं प्रचंड वैभव बरोबरीच्या राजेरजवाड्यांना दाखवून चकित करावं आणि ज्यांच्या पैशावर आपण चैन करतों, त्या प्रजाजनांना तो अरभाट तमाशा दाखवून दिपवावं आणि 'पाहा तुमच्या या राजाची योग्यता, लोकप्रियता आणि राजमंडळांतील मान्यता! असा राजा तुम्हांला मिळाला हें तुमचं महद्भाग्य समजा! अशा राजाविषयी कुरकुरूं नका. कांही मागूं नका. देतां येअील तितकं त्याला मात्र द्या!' अशी भावना दुबळ्या लोकांत बिंबवावी, हाच या युवराजाच्या व्रतबंधसमारंभाचा मुख्य अुद्देश. प्रजाजनांच्या मनांवर हें दडपण घालण्यासाठीच दोनतीन लाखांचा चुराडा अुडाला. शेकडो शिक्षण-संस्था अर्धपोटीं आयुष्य कंठीत आहेत हें या राजेसाहेबांना ठाअूक आहे. म्हणजे त्यांना पैशाच्या सदुपयोगाचे मार्ग माहीत आहेत. तरीपण ज्याअर्थी ते पैशाची अशी धुळधाण करतात, त्याअर्थी त्यांत

कांहीतरी अिंगित असलं पाहिजे. आणि तें अिंगित हेंच, की स्वतःचा अलौकिकपणा अंकेतांच्या मनांवर बिंबवून त्यांना कायमचं बावरून सोडावं. वैदिक धर्माभिमान, सनातन धर्मप्रेम या साऱ्या थापा आहेत, हे नुसते दाखवायचे-फसवायचे दात आहेत. पण वैनी, जग आता अितकं भोळं राहिलं नाही. त्याला पक्कं कळलेलं आहे, की दुसऱ्याला फसवण्याच्या नादांत हे राजेश्री स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीलाच फसवीत आहेत."

दाजीची कथा पुरी करायची वेळ झाली अशी सूचना चहाची खिरापत आणून सरलाबाअीने दिली.

सरलाबाअीने आणलेल्या चहाप्रमाणेच दुसरेंहि अेक कारण झालें आणि चालू चर्चा निरनिराळ्या विषयावर गेली. चोवीस-पंचवीस वर्षांचा अेक देखणा व दणकट तरुण दाजीकडे आला. दाजीने हसतहसत त्याचें स्वागत केलें. तोहि अगदी गट्टींतल्या दोस्ताप्रमाणे दाजीशीं गप्पागोष्टी करूं लागला.

"विज्या, लेका ! दोन हजारांचा टप्पा गाठलास की नाही अजून ?"

"आलोंय् जवळजवळ मास्तर. त्या माणिकशेठचं लग्न तेवढं मिळालं की झालीच म्हणा माझी प्रतिज्ञा पूर्ण !"

"मग याच मोसमांत देणार का बार अुडवून ?"

"तें तुमचं काम आहे मास्तर. मी माघार घेणार नाही अेवढं मात्र सांगतों तुम्हाला."

असेंच थोडें बोलणें होअून तो तरुण निघून गेला आणि दाजीने आम्हांस त्याची पुढीलप्रमाणे माहिती सांगितली—

तो दाजीच्या हायस्कुलांत शिकलेला आणि दाजीच्या मर्जीतला अेक हुशार विद्यार्थी. पोरका असून त्याने पुष्कळांचें प्रेम संपादन केलें व आपलें शिक्षण पुरें केलें. मॅट्रिकमध्ये वर नंबर आल्यामुळे त्याला शिष्यवृत्त्या मिळाल्या व तो कॉलेजमध्येहि गेला. अिंटर पास झाला आणि मग त्याला वाटलें, की बी. अे. होअून आपल्या

विद्वत्तेंत विशेष कांही वाढ होणार आहे असें नाही, व बी. अे. होअून तरी चरितार्थाचें साधन पुढे चालून येणार आहे असेंहि नाही. मग आयुष्यांतील अैन अुमेदीचीं दोन वर्षें वाया दवडण्यांत तरी काय अर्थ? त्या दोन वर्षांचा अुपयोग निर्वाहाचा मार्ग निवडण्याकडे केलेला काय वाअीट? त्याचा हा विचार दाजीला पसंत पडला आणि त्याच्या प्रोत्साहनाने त्याने कॉलेजला रामराम ठोकून 'विजय सेवा समिति' स्थापन केली.

विजय हें त्या तरुणाचें नांव. त्याने गावांत अुनाडपणें भटकणारे तनिचार छोकरे हाताशीं घेतले व प्रथमतः येअील तें काम पतकरण्यास प्रारंभ केला. लोकांचा बाजार करून देणें, लग्नकार्यांत स्वयंपाकपाणी करणें, वाढणें, आजाऱ्याची शुश्रूषा करणें, थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, पुढे येअील त्या कसल्याहि कामाचा अव्हेर विजयसमितीने केला नाही. हलकें म्हणून कोणतेंहि काम नाकारावयाचें नाही, हा विजयचा पहिला नियम. मोबदला थोडा कमी मिळाला तरी चालेल, पण निरुद्योगी राहावयाचें नाही हा कटाक्ष.

विजय समितीचे पहिले कांही दिवस प्राथमिक जुळवाजुळव व स्वतःच्या प्रसिद्धीकरणांत गेले. आता त्याचा जम छान बसला. कामाचा तुटवडा तर नाहीच, पण जादा मदतनीस घेअूनहि पतकरलेलें काम अुरकतांअुरकता त्रेधा अुडूं लागली. त्यांत त्याने या वर्षापासून लग्नमंडप तयार करून व सजवून देण्याचें काम सुरू केलें असल्याने त्याला स्वस्थता तिळाची मिळत नसे. बन्याबापूंच्या घरचा लग्नमंडपहि विजयनेच अुभारला होता. खरोखर अुत्तम झाला होता तो.

विजयसंबंधी अेवढा पूर्वेतिहास सांगितल्यावर दाजी म्हणाला, "वैनी, पाहिला आहेत का असा अेखादा हिंमतवान मुलगा?"

"काय घेअून बसलां आहांत, भाअूजी—" ती म्हणाली, "बी. अे. होअून बापाच्या बोकांडीं बसणारे अजागळ मात्तर हव्ते तितके पाहिलेत मीं!"

"पण या विजयसारखा स्वाभिमान सोडीत नाहीत ते. सुशिक्षितांनी हमाली करायची? छट्! अुपाशी मेलं तरी चालेल; पण पोझिशन नाही खराब होतां कामा!"

माझ्या या व्याजोक्तीने दाजीला चांगलाच चेव आला व तो म्हणाला, "तरुणांनाच पोझिशनचं वेड नसतं असं नव्हे, तर सुशिक्षित आणि अनुभवी माणसंहि या पोझिशनच्या आहारीं गेलेलीं असतात. आमच्या हेडमास्तरांचंच पाहा. त्यांनी निवडलेला जावअी अडाणी आहे. त्याचं अिंग्रजी शिक्षण पोस्टमनपेक्षा अधिक नाहीं. प्रकृति तितपतच आहे म्हणे. आणि फोटोवरून मी म्हणेन, कीं जावअीबुवा आफ्रिकन नसले तरी मद्रासी खचित आहेत. पण त्यांचे दोन मोठे गुण हे, की त्यांच्या पत्रिकेंतील बरेचसे गुण गोरे मास्तरांच्या मुलीशीं जमल्याचा दाखला कुठल्याशा ज्योतिर्भूषणांनी दिला व दुसरा, ते अेका श्रीमंत बापाचे पांचांपैकी अेक वारस आहेत. या गुणांवर मोहित होअून मास्तरसाहेब या नररत्नास कन्यादान करायला सज्ज झाले आहेत. आमचा विजय माझ्यापेक्षाहि गोऱ्यांच्या अधिक माहितीचा आहे. त्यांच्या घरच्या सर्व माणसांना तो परिचित आहे. त्याची हुशारी, धडाडी आणि वागणुकींतला गोडवा याबद्दल मास्तरांप्रमाणं मास्तरीणबाअीहि कौतुक करतात. विजयबद्दल त्यांच्या मुलीची नाखुषी नाही ही गोष्ट मीं अजमावून पाहिली आहे. आणि म्हणूनच 'विजयला जावअी कां करीत नाही?' असा हलकच अेकदा प्रश्न टाकला; पण त्या प्रश्नासरशीं मास्तरसाहेबांचा चेहरा कोयनेल प्याल्यासारखा झाला! विजयला ना घर ना दार, हा त्याचा पाहिला दोष! तो आचारीपाणक्यांचं हलकं काम करतो हा त्याचा दुसरा दोष! कां आहे की नाही मजा! पण बरं का वैनी, मी कांही विज्याला फार वेळ लग्नाशिवाय राहू देणार नाहीं. दोन हजारांची पुंजी स्वतःपांशी साठवल्यावांचून लग्न करायचं नाही असा त्याचाच पण आहे म्हणून, नाहीतर यापूर्वीच केला असता त्याला चतुर्भुज. आणि कुठलीतरी अन् कसलीतरी घूस नाही बांधणार मी त्याच्या गळ्यांत! चांगली मातबराची फक्कड पोरगी विज्याची बायको झाली पाहिजे."

दाजी हें पूर्ण जिव्हाळ्याने बोलत होता व त्याचा हा जिव्हाळा अनाठायींहि नव्हता.

बन्याबापूंच्याकडचें अक्षतींच्या मिरवणुकीचें बोलावणें आल्यावरून मी व ती तिकडे गेलों. दाजी मिरवणुकीस "धिंड" हा शब्द वापरीत असल्याने तो स्वतः येथील हें शक्य नव्हतें. प्रश्न होता सरलाबाअीचा. पण पतीची मर्जी हेंच तिचें सुकाणू असल्याने तीहि 'कसंसंच वाटतंय् ' म्हणून घरीं बसून राहिली.

जगांत चोहोकडे चालतात असेच प्रकार बन्याबापूंच्या घरीं चालले होते. श्रीमंतपूजनापासून वधूवरपक्षांच्या चकमकी सुरू झाल्या. करणीसकट हुंड्याची सगळी रक्कम आधी मिळाली पाहिजे, हा वरपक्षाचा हट्ट वधूपक्षास पुरवावा लागला. वधूपक्ष अेकदम शरण गेला असें मात्र कोणी समजूं नये. त्यानेहि दोन हात केले. पण सामनेवाला मूळचाच भारी असल्याने त्याचा टिकाव लागला नाही. पैशाची भरपाअी कार्यसमाप्तीनंतर करावयाची असल्याने आधी पैसे आणून ठेवले नाहींत ही सबब वरपक्षाने जमेस धरली नाही व अखेर बन्याबापूंस पंधराशे हुंडा व साडेचारशे मानपान असा अेकोणीसशे पन्नास रुपयांचा चेक फाडावा लागला. आज रात्र झाली व अुद्या रविवार म्हणून दोन दिवस पैसे पदरांत पडत नाहीत व तेवढ्या मुदतीचें आपलें व्याज बुडतें म्हणून बारा आणे की रुपाया व्याह्यांनी रोख वसूल केला! चेक घेण्यापूर्वी बँकेंत भरपूर शिल्लक असल्याची खात्री पासबुकावरून पटवून घेण्यास ते चुकले नाहीत.

व्याह्यांनी अशी लूट मारूनसुद्धा विहिणींचा खंडणीवसुलीचा सपाटा सुरूच होता. गोळा घातलेल्या अेकूण अेक बायकांना खणानारळाच्या ओट्या सकतीने द्यावयास लावूनदेखील वरमाअीची हौस फिटली नाही आणि भाडोत्री मोलकरणींच्या मुलीसुद्धा विहिणीच समजून वधूपक्षाने त्यांचा मानपान केला पाहिजे असा तिने तगादा लावला. मुलीची आअी ही अेक दीनदुर्बल बकरी आणि वरमाअी म्हणजे क्रूर वाघीण असा प्रकार सुरू होता. तावडींत सापडलेल्या

या बळीचे करता येतील तितके हाल करून ती कृत्त्या आपली हौस पुरवीत होती. लग्नादिवशीं सकाळीं वधूपक्षाकडून गेलेल्या आंबोणांत आधुनिक पद्धतीप्रमाणे चहाच्या किटल्या, बिस्किटांचे पुडे आणि संत्रीं-द्राक्षादि फळफळावळ मुबलक होतीं. तरीपण जुन्या धर्तीप्रमाणे भाजीच्या काड्या, वांग्यांचीं देठें आणि भोपळयाच्या साली नाहीत म्हणून वरमाओीने तें आंबोण लाथेने अुडवून दिलें व वर शेरा मारला, "तुमचे साहेबी थेर मला कशाला दाखवतां? आपली जुनी पद्धत तीच आम्हाला बरी!"

वरपक्ष अशा प्रकारें सूड अुगवीत होता आणि वधूपक्ष मनांतल्या मनांत जळफळत तो छळ सहन करीत होता. केवळ पैशाचा प्रश्न असता तर कोणीं कांही मनावर घेतलें नसतें. शे-पन्नास रुपये आरतेपरते खर्च झाल्यास बन्याबापूला कांही वाटलें नसतें; पण पैशापरी पैसा जाअून वर सोसावा लागणारा छळवाद दुःसह होता; अपमानास्पद आणि चीड आणणारा होता. सुबुद्ध माणसांमध्येहि पशुत्वाचा संचार कसा होतो हें पाहावयाचें असेल तर वरपक्षीय लग्नघरीं अेक फेरफटका मारावा. मी कसलीशी चौकशी करण्यासाठी अेकदा वरपक्षाच्या जानवशांत गेलों तेव्हा मला कांही दृश्यें दिसलीं.

वरमाओी मंगलकार्याच्या त्या अुत्सवांत हेल काढून रडत बसल्या होत्या! कारण त्यांचा अपमान झाला! वधूघरच्या आचाऱ्याने त्यांना 'बाओीसाहेब' म्हणून हाक मारण्याअैवजी नुसतें 'विहीणबाओी' म्हणून संबोधिलें! या अवमानित महामायेची मनधरणी आणि क्षमायाचना स्वतः बन्याबापू, त्यांची पत्नी, वडील बहीण वगैरे मंडळी करीत होती!

बी. अे. झालेल्या अेका वरपक्षीय विद्वानांनी दुधाची भरलेली कासंडी दुसऱ्या मजल्यावरून खाली गटारांत ओतली! कारण वधूपक्षाने शिधासामुग्री पुरविण्याचा करार होता; आणि तिकडून आलेलें दूध पांच मिनिटें अुशिरा तर आलेंच, शिवाय तें गायचें असावें.

असा संशयहि आला; त्यासरशीं त्या पंडितांनी त्याला गटार दाखविलें ! "गायीच्या दुधाचा चहा प्यायला आम्ही काय भिकारडे आहों की काय ?" असें ते तावातावाने विचारीत होते !

अुपाध्येबुवांनाहि वरपक्षीय नादिरशहाचा कैफ चढला होता. विड्याचीं हिरवीं पानें त्यांनी भिरकावलीं ! त्यांना पिवळींजर्द पिकलीं पानें, कस्तुरीमिश्रित कातगोळ्या आणि सुवासिक सातारी जर्दा हवा होता !

हा प्रकार अैकून दाजी संतापाने लाल होअील अशी माझी कल्पना होती; पण ती सपशेल चुकीची ठरली ! तो पोटभर हसला आणि म्हणाला, "साधतं तर साधून कां घेअूं नये ? त्यांनी अशी लूट केली नसती तर त्यांना मूर्ख म्हटलं असतं मीं. मालकाच्या नरमाअीचा फायदा न घेणारा कारभारी जसा अक्कलशून्य ठरेल, तसंच वधूपक्षाच्या पिळपिळीतपणाचा फायदा न घेणारा वरपक्षहि अक्कलशून्य ठरेल. दोन्ही पक्ष स्नेही नसून दावेदार आहेत हीच जिथं शिष्टसंमत कल्पना, तिथं होतो आहे हा प्रकार योग्य आहे असंच मानलं पाहिजे !"

पण दाजीच्या या समजुतीला धक्का देणारा प्रकार संध्याकाळीं घडला आणि वाअीटांतूनच चांगलें निपजतें म्हणतात असा योग दाजीने जुळवून आणला.

गोरजमुहूर्तावर विवाहसमारंभ साजरा व्हावयाचा होता. साडे-पांचच्या सुमारास रुखवत व नवरदेवास निमंत्रण रवाना झालें. पान-सुपारीस बोलाविलेले प्रतिष्ठित नागरिक जमूं लागले. त्यांचें स्वागत करून योग्य जागीं बसवण्याचें काम दाजी करीत होता. बन्याबापू हायस्कूलचे हेडमास्तर असल्याने नगराध्यक्ष, सिटी मॅजिस्ट्रेट, मुन्सफ मामलेदार, रजिस्टर, डॉक्टर, वकील आदिकरून राजमान्य लोकहि न विसरतां अुपस्थित होते.

पण वास्तविक वेळ टळली तरी नवरदेवांचा पत्ता नाही ! पुन्हा सूचना धाडली, तो अिसमहि तिकडेच ! थोड्या वेळाने रुखवत

घेऊन गेलेल्या बन्याबापूंच्या पत्नी परत आल्या आणि घरांत जाऊन बसल्या ! त्यांच्या लाल झालेल्या नाकडोळ्यांवरून त्यांची वरमाओीने चरपूस संभावना केल्याचें स्पष्ट दिसत होतें ! काय झालें म्हणून चौकशी सुरू झाली. जितक्यांत वरपितेच त्या दूधओतू ग्रॅज्युओेटासह मंडपांत दाखल झाले आणि कडाडले, " कुठं आहेत गोरे ? "

फौजदारापुढे गुन्हेगाराने जावें तसेच बन्याबापू दाखल झाले.

" तुम्हाला काय चेष्टा वाटली होय अशी सादिलवारी चालवली आहेत ती ? " व्याह्यांची सरबत्ती सुरू झाली– " तें काय रुखवत की भिकाऱ्यांना भिक्षा ? चुरमुरे–डाळयाचे लाडू शेराचे तरी असायचे होते ! बदाम-खारकांच्या अन् हळकुंडांच्या लाडवांचीदिखोल तीच तऱ्हा ! पन्नास तुकडे असतील फार तर ओकेकांत. आणि रुखवताचीं ओकंदर शितरं किती ? सारीं पाऊणशे ! शंभर आणायला काय झालं होतं तुम्हाला ? तुम्ही ओक असाल दळभद्रे, पण आम्हाला आमचा लौकिक संभाळला पाहिजे. "

मुख्य व्याह्यांना दम लागल्यामुळे त्यांचे सुशिक्षित साथीदार बालूं लागले– " हें पाहा गोरे, चुकलांच तुम्ही. आता ती चूक दुरुस्त करीत असाल तर पुढचं सगळं सुरळीत होओील. मुख्य विहिणबाओींचा तिळपापड झाला आहे तुमच्या या कंजूषपणानं. त्या लग्नाला साफ येत नाही म्हणताहेत ! आणि आओी आल्याशिवाय नवरदेवहि यायला तयार नाहीत ! आता त्यांची समजूत काढायची असेल तर दंड म्हणून दोनशे रुपये ठेवा त्यांच्यापुढं आणि साधा मुहूर्त. तुमचा मूर्खपणाच तुम्हांला नडतोय् हा ! "

कोणाच्या झालें तरी सहनशक्तीला सीमा असते. दोन दिवस झालेला छळ, सोसलेला मनस्ताप आणि थोरथोर स्नेही मंडळींपुढे होत असलेला हा अपमान, यांमुळे बन्याबापूंचें शांत डोकेंहि तापलें. त्यांचे ओठ आणि हातपाय थरथरूं लागले ! ते काय आता त्या ओुर्मट लोकांच्या नरडीचा घोट घेतात की काय असें प्रेक्षकांस वाटलें.

दाजीने त्यांना बाजूस नेऊन बसवलें व आलेल्या हल्ल्याला सामना देण्यास तो स्वतः सिद्ध झाला.

" मुहूर्ताची वेळ जवळ आली. नवरदेवांना आणा. लग्नानंतर सर्व भानगडी संपवूं. "– दाजी.

" बिलकुल होणार नाही. "– पाहुणे.

" आपले हुंड्याचे अन् मानपानाचे पैसे आधीच चुकते झाले आहेत. " – दाजी.

." म्हणून काय झालं ? जनरीतीप्रमाणं व्हायच्या गोष्टी व्हायलाच पाहिजेत. ठरलेल्या गोष्टी केल्या म्हणजे झालं नाही. " – पाहुणे.

" ठरलेल्या गोष्टी आम्हीं बरोबर केल्या आहेत आणि सज्जनरीतीप्रमाणं दुसऱ्याहि पुष्कळ गोष्टी केल्या. अधिक कांहीअेक करण्याची आमची अिच्छा नाही. "—दाजी.

" मग आमचा मुलगा लग्नाला अुभा राहणं शक्य नाही. तुमच्या मुलीपेक्षा बापसवाअी बायका मिळतील याला सत्राशेसाठ. " –पाहुणे.

" खुशाल मिळूं देत ! सत्राशेसाठापेक्षा सोळा हजार अेकशेआठ बायका करून आपले चिरंजीव कृष्णदेवाच्या पंक्तीला बसले तरी आमची हरकत नाही ! आपले चिरंजीव लग्नाला येत नाहीत हा निर्णय नक्की समजायचा का ? "–दाजी.

" नक्की, नक्की, नक्की ! " पाहुणे गरजले आणि पगडी सावरीत परत निघाले. शांत झालेले बापू आर्जवाकरिता पुढे येतांना दिसतांच दाजी कडाडला, " खबरदार मास्तरसाहेब पुढं याल तर ! तुमच्या या शेळपटपणानंच घाण केली सारी ! "

" बरं आहे. लग्न मोडून आमचं नुकसान नि नाचक्की केल्याबद्दल कोर्टांत खेचतों तुम्हांला ! " असें सुचवून व्याही चालते झाले.

थोडा वेळ मांडवांत खूप खळबळ अुडाली. सर्वांना शांत बसावयास सांगून दाजीने बन्याबापूंना म्हटलें, " मास्तरसाहेब, या चांडाळांच्या तावडींतून तुमची जिवापेक्षा जतन केलेली लेक सुटली

याबद्दल आनंद माना. त्यांची कायद्याची धमकीहि व्यर्थ आहे. आम्हीं आमच्या अटी पूर्णपणें पाळल्याबद्दल त्यांची कबुली आहे आणि आमच्याकडून लग्नाला नकार नसून त्यांनीच तो दिला आहे! मुनसफ-मॅजिस्ट्रेटसारख्या अधिकारीवर्गापुढं त्यांनी तो दिला आहे आणि म्हणून कायद्याची बाधा होण्याऐवजी आपणास त्याची मदतच होईल."

"अहो, पण दाजीमास्तर, असा लग्न फिसकटल्याचा बभ्रा झाला तर मुलीचं लग्न होणं कठीण जाईल!"

"मुळीच होणार नाही. जावई निवडण्याची तुमची कल्पना निवळली असेल तर कसलीच भानगड येणार नाही."

"माझ्या सर्व जुन्या कल्पना मीं सोडल्या आहेत. आता तुमचा विचार प्रथम ऐकला असता तर बरं झालं असतं, असं वाटूं लागलंय् मला."

"मग अजून कुठं बिघडलंय्?" असें म्हणून दाजी वन्याबापूंना घेऊन आंत गेला आणि दहाच मिनिटांत हसतमुखाने बाहेर येऊन म्हणाला,

"सर्व स्त्रीपुरुषांनी शांतपणें आता साजरा होणारा विवाह-समारंभ पाहावा आणि वधूवरांना शुभाशीर्वाद द्यावा.'

सर्वजण उत्कंठेने बोहल्याकडे दृष्टि लावून बसले.

विजय आणि प्रभा हातांत हात घालून विवाहवेदीवर उभीं राहिलीं.

कुलोपाध्यायांनी त्यांच्या डोकीवर मंगलाक्षता उधळीत म्हटलें, "शुभ मंगल साऽऽवधाऽऽन —"

एकदोन मंगल श्लोक म्हणून झाल्यावर दाजी बोहल्यापाशी जाऊन म्हणाला, "मी माझं अभीष्टचिंतन करायला इथं आलों आहें. माझीं मंगलाष्टकं ठरीव चालीचीं म्हणजे शार्दूलविक्रीडितांतलीं नाहीत. तें वृत्त मला नापसंत आहे. आनंदाप्रमाणं गोपिकाबाईचा पुत्रशोकहि त्यांत होतो म्हणून मीं स्वतंत्र आणि नवी वृत्तयोजना केला आहे. माझं अभीष्टचिंतन शूर्पणखा जातीवर होणार आहे."




लेंढार मुलांचें घरा। करितसे जीव घाबरा।
तुम्हि संततिनियमन करा। तयाने सुख भोगा निर्मळ ॥ (पान १९८)

अेवढा खुलासा करून दाजी वाचूं लागला—

वरोत शुभमंगल । वधूवर
वरोत शुभमंगल ॥ ध्रु० ॥

ही बाला गुणशालिनी
अनुरूप तिला वर गुणी
हें मीलन मज पाहुनी—
वाटतो मोद मना निर्मल ॥ वरोत० ॥ १

सूर्यास प्रभा ती जशी
माधुरी मधूसह जशी
व्हा अेकरूप तुम्हि तशीं
प्राशुनी शुद्ध प्रीतिचें जल ॥ वरोत० ॥ २

पति म्हणजे नादिरशाहा
बायको बटिक जणु पहा
घातकी नको भाव हा
अुभयहीं रहा सखे सोज्वल ॥ वरोत० ॥ ३

जरि पडे कुणाचें अुणें
घ्या खपवुनि सोशिकपणें
नच भितां कान अुपटणें
तीच ती चूक जरी होअिल ॥ वरोत० ॥ ४

धन यत्नानें मेळवा
राहुनी दक्ष वांचवा
नच कंजुषता दाखवा
की कधी दिसूं नका ओंगळ ॥ वरोत० ॥ ५

आरोग्य सदा राखणें
मोकळी हवा सेवणें
तें माफक खाणें-पिणें
तुम्हांला खणखणीत राखिल ॥ वरोत० ॥ ६

'हो तुम्हांस पुत्राष्टक'
म्हणातिल ते भटभिक्षुक
परि तुम्हां प्रजा माफक
आस ही माझ्या हृदयांतिल ॥ वरोत० ॥ ७

लेंढार मुलांचें घरा
करितसे जीव घाबरा
तुम्हि संततिनियमन करा
तयाने सुख भोगा निर्मल ॥ वरोत० ॥ ८
वरोत शुभमंगल । वधूवर
वरोत शुभमंगल ॥

दाजीच्या मंगलाष्टकांतील पहिला भाग जरी नावीन्यपूर्ण म्हणून नवलाअीचा वाटला तरी शेवटीं त्याने आपली दाजीगिरी दाखवलीच! शेवटचें कडवें अैकतांच कांही शिष्टांच्या तोंडून अुद्गार निघाले, "और वली आहे हं!"

विजय-प्रभा-विवाह सर्वांनाच पसंत पडला. नियोजित वर-राजांची गुर्मी जिरली आणि जेव्हा ते स्वपरिवारासह आपण होअून लग्नमंडपांत दाखल झाले, तेव्हा साखरपुडे आणि फुलें, विडे वांटा-यचें काम सुरू झालें होतें!

"या. आल्यासारखे पानसुपारी घेअून जा." दाजीने पुढे होअून पाहुण्यांस खिजविलें.

"हा मेल्यांनो!" म्हणून वरमाईने बैठक मारली!

"या शिंच्याचा विवाहयोगच कच्चा!" व्याही हळहळले!

"आता कां मला बोलतां? मीं 'नाही' म्हटलं होतं वाटतं?" चिरंजीव पुटपुटले.

"घबरो मत बेटा!" दाजी खवचटपणें म्हणाला, "तुम्हाला सत्राशेसाठ बायका द्यायची धमक तुमच्या वडिलांना आहे. बिनहुंड्यानं आणि बिनकरणीनं पाहिजे असेल तर आमच्या सोनभटजींची सोनी आत्तासुद्धा तयार आहे."

चेष्टासुद्धा कधीकधी खरी होते ती अशी. व्याही तयार झाले आणि त्याच रात्रीं मुहूर्त निघून सोनभटांची सोनी त्याच मंडपांत श्रीमंतांची सून झाली !

सर्व समारंभ आटोपल्यावर झोपावयास घरीं जातांना ती म्हणाली, " लग्नांत विघ्न आणलंत म्हणून त्या वेळीं तुमचा अस्सा राग आला होता मला ! "

" मग आता विघ्नांतून ऐकाऐवजी दोन लग्नं लावल्याबद्दल काय बक्षीस देतां मला ? "

दाजी कृतार्थतेने हसला आणि आम्हीहि हसलों.

★ ★ ★



# दैवाच्या तडाख्यांत दाजी !

आतड्याची माया कांही औरच असते. तिला दोष दिसत नाहीत. तसें नसतें तर मामांनी (दाजीच्या) असें मृत्युपत्र कसें केलें असतें ?

त्यांनी आपली जंगम जिनगी निरनिराळया गरजू लोकांना दान केली होती; पण स्थावर अिस्टेट म्हणजे राहतें घर आणि चारपांचशे रुपयांचें अुत्पन्न सौ. सरलाबाअीस दिलें होतें. तिने त्याचा तहहयात अुपभोग घ्यावा व नंतर त्याची मालकी तिच्या संततीकडे जावी, अशी आज्ञा मामांनी त्या व्यवस्थापत्रांत लिहून ठेवली होती.

अनपेक्षितपणें मला मामांचें बोलावणें आलें आणि मीं जातांच त्यांनी तें अिच्छापत्र माझ्या हातीं दिलें. सरलाबाअीतर्फे त्या अिस्टे-टीची व्यवस्था पाहण्याचें काम मजवर सोपविण्यांत आलें होतें.

ज्या भाच्याने मामांची वास्तपुस्त कधी केली नाही, त्याच भाच्याच्या बायकोमुलांचा मामांना कळवळा यावा, हें मला आश्चर्य वाटलें आणि मीं तें बोलूनहि पण दाखविलें. मामा म्हणाले, "तुम्हाला प्रेमळ बहीण असती आणि तिचं लेकरू अुघडं पडलं असतं, म्हणजे तुम्हाला माझ्या कृतींतलं इंगित कळलं असतं. दाजी कितीहि विक्षिप्त आणि हेकड असला, तरी तो माझ्या ताईचा मुलगा आहे. यांत काय तें समजा."

म्हाताऱ्याला अधिक बोलवेना. घसा भरून आला आणि डोळेहि डबडबले. कितीतरी दिवसांमागे मरून गेलेल्या बहिणीची स्मृति अितकी ताजी कशी राहिली आणि तिने त्या जराजर्जर हृदयांतहि कालवाकालव कशी केली, याचें मला नवल वाटलें. प्रेमबंधनें किती दृढ आणि अभंग असतात हीं !

तरीपण अुत्पन्नाचें दान मामांनी सरलाबाईच्या नांवें करून दाजीला बाजूस कां टाकावें, हें कोडें मला सुटेना. आणि शेवटीं जेव्हा मीं मामांना त्याचा खुलासा विचारला, तेव्हा मामांनी अुशीखालून एक पत्र काढून माझ्या हातीं दिलें.

तें पत्र दाजीचें होतें. तें पुढे देतों–

"पूज्य मामा,

"आपलें पत्र पोंचलें. मीं नोकरी सोडून आपल्या सन्निध राहावयास यावें, हा आपला मनोदय वाचून आपल्या प्रेमळपणाची जाणीव झाली आणि मन गहिंवरलें. पण त्याबरोबरच प्रेमाने माझा वध करण्याचा आपला हा विचार मला दुःसह झाला.

"स्वावलंबी माणसास परावलंबी आणि अैतखाअू बनविणें हा त्याचा वधच नव्हे तर काय ?

"माझ्या बालपणीं जेव्हा मी स्वतःच्या पायावर उभा राहण्यास असमर्थ होतों, तेव्हा आपण मला पुत्रवत् संगोपिलें हें योग्य झालें. मामा, त्या काळीं तुमचा मायेचा आधार मिळाला नसता तर माझ्या जीविताचें तारू कुणीकडे भरकटलें असतें याची कल्पनाहि करवत नाही. त्या बालपणीं तुमच्या प्रेमाचें अमृत मी अितकें प्यालों आहें, की आता माझ्या पोटांत आणखी अेका बिंदूमहि अवकाश राहिलेला नाही.

"आपल्या आतापर्यंतच्या प्रेमाचें अुतराअी कसें व्हावें ही हुरहूर माझ्या मनाला सदैव त्रासवीत आहे. आणि मी आपणास असें विनवूं अिच्छितों; की आपण तेथील मोह सोडून येथे यावें. आपल्यास शुश्रूषण्याचें भाग्य आम्हांस लाभलें तर आम्ही दोघेहि स्वतःस अभिनंदूं.

"आपला तेथील पसारा हा आपल्यास तेथेच खिळवणारा विषय आहे हें मी जाणतों; पण त्याला त्यागिण्याचें मनोधैर्य आपण अवश्य दाखवावें. ज्या मिळकती आपण संग्रहिल्या व उपभोगिल्या, त्या आपल्यामागेहि आपल्याच माणसांनी उपभोगाव्या, ही विचार-सरणी अुदार नाही. निदान आपलें म्हणून कोणासतरी हटका-वयाचें व त्याची पात्रापात्रता न अजमावतां त्यालाच त्या जिंदगीची मालकी अर्पायची, यांत कल्याणापेक्षा अकल्याणच जास्त. दत्तक-पुत्र घेअून अगर भाच्यापुतण्यांना पैदा करून संपत्ति अपात्रीं अर्पिणें ही गोष्ट व्यक्तीला आणि समाजाला हानिकारक आहे. समाजाच्या कित्येक गरजा इतक्या तीव्र आहेत, कीं विशिष्ट कुलांतच संपत्ति कोंडण्याची लोकांची प्रवृत्ति नष्ट झाली तर त्या पुष्कळ अंशीं दुरावतील. म्हणून म्हणतों, मामा, आपल्या संपत्तीचा कोंडमारा करण्याची कल्पना सोडून द्या. व्यक्तीची चैन पाहूं नका, समाजाचें हित पाहा. गरज आणि पात्रता यांचा मेळ घालून संपत्ति विभागली तरच समाज सुखी होतो.

"मग मामा, हें समाजऋण फेडून केव्हा येतां अिकडे राहायला? आपलें अनुमतीचें पत्र येतांच मी आपल्यास नेण्याकरिता येअीन.

आपला

**दाजी.**"

माझें तें पत्र वाचून होतांच मीं मामांकडे नुसतें पाहिलें. बोललों मात्र कांहीच नाही. कारण कठीणच होती ती गोष्ट. दाजीचे विचार खरें म्हटलें तर वावगे नव्हते. पण त्याचा कैवार घ्यावा तर मामांना रुचणार नाही आणि त्याला दोष देणेंहि सयुक्तिक होणार नाही, अशा कात्रींत मी सापडलों होतों. माझी ती मुकी अवस्था पाहून मामा म्हणाले,

"पाहिलांत ना किती तऱ्हेवाअीक गृहस्थ आहे तो! पण अेवढ्यावरच तुमचं सगळं आश्चर्य खलास नका करूं. यासाठी ठेवा राखून थोडं–"

असें म्हणून मामांनी दुसरें अेक पत्र अुशीखालून काढून मला दिलें. तें पत्र असें—

“ आदरणीय मामा,

“ तुमच्यामागे तुमच्या घरांत दिवा लागावा अशी तुमची अिच्छा स्वाभाविक असली, तरी ज्या पद्धतीने तो लागावा अशी तुमची अपेक्षा, ती पद्धत समंजसपणाची म्हणतां येणार नाही. मामाच्या घरांत भाच्यानेच दिवा लावावा असा तुमचा अट्टाहास कां? शिवाय मामा जसे मरून जाणार आहेत तसा भाचाहि मरून जाणार आहे. आणि तुमच्याप्रमाणे तुमच्या भाच्याचाहि वंश खुंटला, तर घरांत अक्षय दिवा लावण्याची कामगिरी करणार कोण? याकरिता आकुंचित दृष्टि सोडून विचार व्यापक करा, म्हणजे तुमच्या घरांत सतत दिवा लागण्याचा सोपा अुपाय तुम्हाला सापडेल. तुमचें भाचेपद अेखाद्या शिक्षणसंस्थेला द्या आणि तिला आपली जिंदगी द्या. व्यक्ति अल्पायु असली तरी संस्था चिरायु असते. ती संस्था तेलाच्या चिमण्यांनी जरी नाही, तरी ज्ञानमय प्रदीपांनी तुमचें घर प्रकाशित राखील.

“ तुम्ही हा संपत्संन्यास घेतल्याचें कळतांच तुमचा दाजी तुम्हाला घेअून जायला आलाच.

मामा, मी तुमचा

दाजी.”

दाजीने अितका तिटकारा दाखवला म्हणून त्याच्या पत्नीच्या नांवें स्वसंपत्तीचें दान मामांनी केलें. तो लहरी आणि विकारविवश स्वभावाचा आहे ही गोष्ट मामांना माहीत असल्याने ते त्याच्या पत्राने रागावले नाहीत; आणि माणसाला अत्यावश्यक असणारें आर्थिक स्वास्थ्य त्याच्याच घरीं ठेवण्याचा अुद्देश त्यांनी अशा प्रकारें साधला.

मीहि व्यवहारी मनुष्य. दाजीची स्वार्थनिरपेक्षता माझ्या ठिकाणीं नाही. स्वतः सुस्थित राहून जमेल तेवढी समाजसेवा करावी

असें मला वाटत असल्याने दाजीकुटुंबाची झालेली ही तरतूद मला अिष्ट अशीच वाटली. मीं दाजीच्या वताने मामांचे आभार मानले आणि ती आनंदवार्ता तिला सांगण्यासाठी जवळजवळ धावतच घरीं आलों.

पण घरीं येतों तों दुसरी अेक आनंदवार्ता घेअून ती माझी मार्गप्रतीक्षा करीत असल्याचें मला आढळून आलें.

"पेढे काढा अगोदर!" तिला हास्याच्या अुकळ्यांवर अुकळ्या फुटत होत्या.

"पण कशाबद्दल तें तरी कळूं दे?"

माझ्या या अधीर प्रश्नाने ती फिरून हसूं लागली आणि तिनें नुकतेंच आलेलें अेक कार्ड माझ्यापुढे टाकलें. पत्रावर अेक आर्या आणि खाली कवीचें नांव, गाव व तारीख याहून अेक अक्षरहि नव्हतें. तें पत्र जसेंच्या तसें देणें अवघड नसल्याने मी पुढे देत आहें—

"सावधता हो विफला,
सरला पुत्रास जन्म दे परवा।
विबुजीम नामिलें त्या,
तत्कल्याणार्थ आशि द्या बरवा॥

पांडगांव,
ता. ३० अेप्रिल १९३५ **दाजी.**"

आजचा दिवस केवढा आनंदाचा! अेकामागून अेक आनंदाच्या बातम्या येअूं लागल्या! त्या आनंदाच्या भरांत दाजीच्या आर्येचा अर्थ लावण्याचें व स्वतःजवळची बातमी तिला कळवण्याचें अवधानहि मला राहिलें नाही.

"तरी मला संशय आलाच होता बन्याभावजींच्या अिथल्या लग्नाच्या वेळीं. 'कांही झालाय् वाटतं गडबडगुंडा?' म्हणून विचारलं, तर ताकास तूर नाही लागूं दिलीन्. सरलाबाअीदिखील भाअूजींचीच प्रतिमा आहे हं अल्लपणात! आधीच कळलं असतं तर डोहाळजेवण तरी केलं असतं. ..."

आयुष्यांतील अेका मोठ्या सुखाला आपण मुकलों असा निराश सूर तिच्या भाषेंत अुमटला! काय आश्चर्य आहे पाहा! मिळालेल्या आनंदाचा आस्वाद घेण्याअैवजी गमावलेल्या सुखासाठी हळहळण्यांतच माणसाचें मन गुंतलेलें असतें. आपल्या अत्यंत आवडत्या दाजी-दंपतीस पुत्रप्राप्ति झाल्याचें शुभवर्तमान पुढे अुभें असतां त्यांत रंगण्या-अैवजी तिचें मन राहिलेल्या डोहाळजेवणाभोवतीच घिरट्या घालूं लागावें हें मला चमत्कारिक वाटलें आणि मीं म्हटलें,

"अगदी व्यवहारशून्य आहे हा दाजी! गरोदर बायकोपेक्षा वैनीलाच डोहाळजेवणाची हौस अधिक असणार हें समजायला हवं होतं त्याला. बरं, डोहाळजेवण नाही तर नाही, बारसं तरी करूं द्यायचं होतंन्! तेंहि आपणच करून टाकलं या बहाद्दरानं!"

"अिश्श! आज तर चौथा दिवस आणि अितक्यांत कसं करतील बारसं?" माझ्या म्हणण्यांतील खोच लक्षांत न घेतांच ती म्हणाली.

"पोळ्यांपुरतं बारसं नसेल केलं, पण नांवापुरतं तरी केलंच आहे. त्याच्या पत्रांतली पहिली ओळ वाचूनच संपवलं वाटतं पत्र? दुसऱ्या ओळींत हें काय आहे?"

तिने वाचलें—

"**विबुजीम** नामिलें त्या—"

आणि म्हटलें, "अगबाअी! खरंच की!"

त्यानंतर आम्ही अुभयतांनी बराच वेळपर्यंत त्या दोन शब्दांचें पृथक्करण, अर्थसंशोधन केलें. दोन्ही शब्द आम्हांस अपरिचित होते आणि त्यांच्याशीं कसून झगडा केला तरी त्यांनी आम्हांस दाद दिली नाही. साहजिकच "कळेल केव्हातरी" अशी मनाची समजूत घालून आम्ही दुसऱ्या विचाराकडे वळलों.

तिने पहिला प्रश्न केला, "सरलाबाअीच्या बाळंतपणाची व्यवस्था कुठं केली असेल?" आणि नंतर अेकामागून अेक नव्यानव्या प्रश्नांची सरबत्ती चालू केली. करायला कोण आहे? तिच्या माहेरचें कोणी बोलावलें आहे काय? पांचवीची पूजा आणि षष्ठीची

पूजा त्यांनी केली की नाही ? रोज भटजी येऊन शांतिपाठ म्हणतात की नाही ? पोराला वेळ कशी काय लागली आहे ? शांतवित करायला पाहिजे की काय ?– एक ना दोन, शेकडो प्रश्न ती विचारीत होती. जणू माझ्या रूपाने दाजीच तिच्यापुढे बसला आहे असें तिला वाटत होतें !

तिचें शंकासमाधान करणें अर्थातच मला शक्य नव्हतें. दाजीच्या प्रत्यक्ष भेटीवाचून ती गोष्ट अशक्य असल्याने तिला आपली जिज्ञासा आवरून धरण्याची मीं सूचना केली. तेवढ्यावर ती स्वस्थ बसेल ही माझी कल्पना; पण ती साफ चुकल्याचाच मला अनुभव आला ! दाजीच्या घरची वस्तुस्थिति प्रत्यक्ष जाऊन पाहून आलें पाहिजे असें तिच्या मनाने घेतलें. आपल्या ' मुलुखावेगळ्या ' स्वभावामुळे दाजी बाळंतिणीची अनास्था करीत असेल, अशी शंका तिला येणें अगदीच अस्वाभाविक नव्हतें.

आणि अखेर भवति न भवति होऊन पांडवगावीं जाऊन येण्याचा आमचा बेत मुक्रर झाला आणि दुसऱ्याच दिवशीं आम्हीं तो अंमलांतहि आणला.

गांधारी सूतिकागृहांत सरलाबाईला ठेवण्यांत आलें होतें. तेथे जाऊन आम्ही बाळबाळंतिणीचा क्षेमसमाचार घेऊन आलों. दोघेंहि मजेंत असलेलीं पाहून व विशेषतः छोकरा चांगला निकोप दिसल्यामुळे तिचा जीव भांड्यांत पडला. मात्र दाजीवरील तिचा घुस्सा अद्यापि ओसरलेला दिसत नव्हता.

घरीं आल्यावर आमची भोजनोत्तर बैठक भरली, तेव्हा तिने पहिलाच प्रश्न केला,

"मग उद्या पहिल्या गाडीनं निघायचं ना ?"

"जशी हुजुरांची आज्ञा !" मीं उत्तर दिलें.

आमच्या या प्रश्नोत्तरांनीं दाजी चमकला. तो उद्गारला,

"म्हणजे ? म्हणताय काय वैनी हें ? आल्याबरोबर जायच्याच गोष्टी काढल्यात तुम्हीं !"

इतका वेळ ठेचून भरलेल्या सुरुंगाला बत्ती लागली. त्याचा स्फोट झाला—

"आगांतुकांनी थोडक्यांत चंबूगवाळं आटोपलं म्हणजे बरं असतं भाऊजी. आम्हीं काय तुमचीं सोयरीधायरीं का स्नेहीसोबती ? तशीं असतों तर बायकोच्या बाळंतपणाच्या वेळीं तरी आमची मदत घेतली असतीत. डोहाळजेवणाचं अेक राहो मेलं, पण करायच्या आहेत काय त्या बाराशे भानगडी घेअून ? हुज्जार वळसे अन् एकच गाठ. ती म्हणजे एवढीच, की तुम्हांला कुणाची गरज नाही. लोक मूर्ख म्हणून तुम्हाला चिकटायला जातात ! आम्ही आपलीं म्हणत होतों, की सरलाबाईला मूल व्हावं आणि घरचं मनुष्यबळ नाही म्हणून आपण बाळंतपण करावं. पण बाळंतपणाची वर्दी बारसं झाल्यावर आम्हांला लागते आहे ! माणसं असून नसल्यागत-"

"वैनी-" तिला मध्येच अडवून दाजी म्हणाला, "आधी माझ्या प्रश्नांचीं उत्तरं द्या. मला कोट शिवायचा आहे, तर मीं कुणाकडं जावं ?"

या विचित्र प्रश्नाचा रोख न उमगल्यामुळे ती नुसती दाजीकडे पाहात राहिली. दाजीने दुसरा प्रश्न केला,

"माझं कपाट दुरुस्त करायचं असलं तर मीं कुणाची मदत घ्यावी ?"

"ती अधिकच बुचकळ्यांत पडलेली दिसली. दाजीने खुलासा केला,

"कपड्याच्या बाबतींत शिंपी आणि कपाटाच्या बाबतींत सुतार हींच लायक माणसं होत. माझ्या मायेची सख्खी आअी असली तरी ती कोट पाहिजे तसा शिवूं शकणार नाही ; आणि पाठचा प्रेमळ भाअू असला तरी कपाट दुरुस्त करूं शकणार नाही. कामाला कळवळ्यापेक्षा कौशल्याची जरूर असते, वैनी. म्हणूनच कोणतंहि काम तज्ज्ञांच्या हातीं सोपवून निश्चिंत राहाणं हा शहाणपणाचा मार्ग ठरतो. प्रसूति-कार्याला डॉक्टर आणि नर्स हींच योग्य माणसं होत. म्हणूनच मीं

स—ला गांधारी सूतिकागृहांत रवाना केलं; तुमच्या अगत्याचा मला आणीव नव्हती म्हणून नव्हे. वैनी, माहीत आहे तुम्हाला, सुश्रिणींच्या अडाणीपणामुळं किती बाळंतिणी नाहक मरतात त्या? परवाच कुठल्याशा स्थानिक सरकारच्या वार्षिक अहवालांत मीं वाचलं, की अेका वर्षांत त्या शहरीं अेकशेअेकूणअेंशी बाळंतिणी सेप्टिक-पॉयझनिंग होअून मेल्या! शहरांत साधनसामुग्रीची अनुकूलता असून ही तऱ्हा, मग खेड्या-पाड्यांत कसा कहर चालत असेल याची कल्पनांच करा तुम्ही. माझं तर असं म्हणणं आहे, की प्रत्येक बाळंतपण सर्टिफाअिड सूतिका-गृहांतच झालं पाहिजे."

"अरे, मग जितकीं घरं तितकीं सूतिकागृहं लागतील की! आणि तिथला खर्च कसा झेपणार गोरगरिबांना?"

"There you are!" माझ्या शंकेवर दाजी अुत्तरला.

"प्रसूतिगृहांची तरतूद सरकार, म्युनिसिपालिट्या आणि पोटभरू डॉक्टर करतील. खर्चाचा प्रश्न नागरिक सोडवतील. बायको शाबूद राहायला हवी असेल तर खर्चाला डरून कसं भागेल? आणि यांत दुसरा अेक अप्रत्यक्ष फायदा होअील तो नाही तुमच्या ध्यानांत येत? खर्चाच्या दृष्टीनं का होअीना, पण बाळंतपण हा बाअू वाटूं लागला म्हणजे तो प्रसंग मुळी येअूंच न देण्याकडं किंवा आला तरी कमींत कमी कसा येअील याकडं माणसाची आपसूक दृष्टि राहील. संतति-नियमन हें आपल्यास अपरिहार्य होअून बसलं आहे आणि तें साध्या मतपरिवर्तनानं जारी करीत बसण्यापेक्षा असल्या कायद्यांनी केलं पाहिजे. तोंड अुघडायचं असेल तर नाक दाबावं लागतं. मी तर म्हणतों, की प्रत्येक प्रसूति दवाखान्यांत तर झाली पाहिजेच, पण तिच्यावर थोडाफार करहि बसविला पाहिजे. त्यावांचून चालू असलेली भरमसाट प्रजावृद्धि-"

"अहो पण राजेश्री, स्वतः कांदा खाअून दुसऱ्याला वेलदोडे चावायला शिकवतां आहां तुम्ही. स्वतःची बायको बाळंत झाल्याला आठवडा तरी अुलटूं दे की पुरता! मग झोडा संततिनियमनावर लेक्चर!"

"मुळीच जरुरी नाही. माझी बायको बाळंत झाली हा मी तरी कुठं लाभ समजतों आहे? तो शापच आहे खरोखर! आणि तो बाधूं नये अशी दक्षताहि मीं ठेवलीं होती. तथापि मनुष्य प्रमादशील आहे आणि मी त्याला अपवाद नाही. विबुजीमच्या जन्माची वार्ता तुम्हाला कळवतांना मीं पहिलं वाक्य 'सावधता विफल झाली' असं लिहिलं, त्याचा अर्थ आता तरी लक्षांत आला ना?"

या विषयाची अधिक वाच्यता नको म्हणूनच की काय, ती दुसरा विषय काढून म्हणाली,

पण काय हो भाऊजी, 'विबुजीम' आणि 'नामिलें' म्हणजे हो काय?"

"अर्थ सरळ आणि स्पष्ट आहे. भाषेंत सावरकरी सुधारणा यथागोड व्हावी असं आताशा माझं मत बनूं लागलं आहे. अिंग्रजींत 'Name' हें नाम आणि क्रियापद या दोन्ही कारणीं उपयोजिलं जातं, तसंच मराठींत 'नाम' हें उपयोजिलं जावं म्हणून मीं 'नामिलें' हा शब्दप्रयोग 'नांव ठेवलें' या अर्थी केला आहे."

"तें एक असो, पण 'विबुजीम' म्हणजे काय आहे कोडं?"

"कोडं नसून आमचं नामदारिद्र्य झाकण्याचं तें एक साधन आहे. मराठ्याच्या घरीं मुलगा जन्मला कीं गोविंदा, गोपाळा नाहीतर कृष्णा, विष्णु व्हायचा; आणि पोरीच्या वांट्याला गंगा, गोदा, यमुना यायची हें निश्चित. यावरून आपली मराठी मायबोली नांवापुरतीदेखील समृद्ध नाही असं आपण अजाणतां दर्शवतों. आपली मराठी भाषा संवर्धण्यासाठी नवनवी शब्दनिर्मिति आपण सदैव केली पाहिजे, म्हणून मीं हें अभिनव नांव बनवलं आहे. यांत आणखी एक विशेष आहे. कोणत्याहि समाजांत पाहिलं तरी आपल्या धर्मवीरांच्या वा साधुसंतांच्या नांवावर एकदेशीय निष्ठा दिसते. पण माझी दृष्टि तशी संकुचित नाही. 'विबुजीम' मध्ये विश्वव्यापकत्व आहे. आजपर्यंत जगांत जे युगप्रवर्तक महात्मे होऊन गेले, त्यांचा

संगम या विबुजीममधे झाला आहे. एके काळीं सर्व जगाला प्रकाशमान करणारे वेद ज्यानें निर्मिले तो विधाता हा पहिला युगप्रवर्तक; त्या वैदिक संस्कृतीलाहि कांही काळ हतप्रभ करून जग झुलवणारा भगवान् बुद्ध हा दुसरा युगप्रवर्तक; तिसरा महात्मा जीझस ख्राइस्ट आणि चौथा पैगंबर महंमद. या पुरुषचतुष्टयाच्या आद्याक्षरांनी आमचा विबुजीम निर्मिला गेला आहे."

नामप्रकरणाचें विवेचन आणखीहि रंगणार असा अजमास होता, तो खरा ठरला. तिने विबुजीम हें नाम नावीन्यपूर्ण आहे हें कबूल केलें; पण नित्योपयोगाच्या दृष्टीने तें गैरसोयीचें आहे अशी तक्रार पुढे केली. 'विबु' अशी हाक कानाला कशीशीच लागेल आणि 'जीम' म्हणून हाक मारली तर ती मडमिणीच्या मुलासारखी वाटेल, ही तिची तक्रार दाजीने लागलीच दूर करून टाकली. कोणतेंहि नांव सवयीने तोंडवळणीं आणि कानवळणीं पडतें असें त्याचें म्हणणें. हणमंत नांव असलें तरी कोणी 'हण' आणि 'मंत' अशीं शकलें करीत बसत नाही, तर 'हणम्या' असा कर्कश किताब त्याला बहाल करतात. सवयीने त्यांना आणि त्यालाहि तो गोड वाटतो. त्या न्यायाने 'विबु' किंवा 'जीम' हींसुद्धा गोड वाटतील. पण दाजीची सूचना अशी, की विबुजीमचे अर्धेअर्धे तुकडे न पाडतां त्याच्या आद्यंताचा 'विम' असा नवाच घाट बनवा. तो कसाहि वापरला तरी बेश दिसेल. 'विमु' किंवा 'विमा' असें कोणतेंहि संबोधन गोड आहे. आणि अगदी गावंढळ पद्धतीने त्याला 'विम्या' म्हटलें तरीहि विन्यासारखाच 'विम्या'हि खपून जाईल. शब्दावर कोटि करण्याची दाजीची आवड या वेळींहि उमटली. तो म्हणाला, "नाहीतरी आपल्या समाजांत विम्याचा प्रसार व्हायलाच पाहिजे आहे."

दाजीचें म्हणणें तिला न पटून आपण त्याला 'बाळ' म्हणणार असें तिने जाहीर केलें.

" अगदी निरुपयोगी नांव, वैनी. चारदोन वर्षं विम्याला बाळ म्हटलेलं शोभेल; पण उद्या हें बाळ आडवांतिडवं पसरलं आणि त्यालाच बाळं होऊं लागलीं म्हणजे कसं वापरायचं तुमचं नांव? यापेक्षा तुमच्या ' बाळग्याचा ' ' भाल्या ' करा हवा तर. "

दाजीचा आणि तिचा संवाद मला नेहमीच मनोरंजक वाटतो; पण तो अेकाच गोष्टीवर फार वेळ चालल्यास त्यावर कंटाळवाणेपणाची झाक मारूं लागते. म्हणून अधूनमधून विषयांतर करणें मला भाग पडतें. या वेळींहि तसेंच झालें. मीं म्हटलें,

" बरं, डिंकाचे लाडू करणार ना? सामान काय काय हवंय आणायला? "

" डिंकाचे लाडू! " बॉंब म्हणतांच पोलीस दचकावा तसा दचकून दाजी अुद्‌गारला, " कशासाठी करणार आहां हे लाडू, वैनी? "

" कशासाठी म्हणजे? बाळंतिणीसाठी. "

" साफ नामंजूर! आमची बाळंतीण तुमचा लाडू अुष्टावणारहि नाहीं. "

" तें कां? बहिष्कार घातला आहे की काय आमच्यावर? "

" तुमच्यावर नाही, पण लाडवांवर खचित घातला आहे. तुमचे हळीव-डिंकाचे लाडू, सुंठीच्या वड्या अन् शेकभाज या अडाणी युगांतल्या चाली पूर्ण हद्दपार करण्याचा माझा निश्चय आहे. तज्ज्ञ डॉक्टर सांगतील तो आहार आणि अुपचार करायचा अेवढंच मी जाणतों. "

" पण डिंकाचे लाडू बाळंतिणीला मुद्दाम देतात. ते पौष्टिक असतात. चांगलेचांगले वैद्यदेखील सांगतात तसं. "

ज्या वेळीं त्या वैद्यांचं शास्त्र निर्माण झालं तेव्हापासून त्या शास्त्रांत आता नवीन शोध अनंत लागले आहेत, आणि त्याच्या आज्ञा पाळणं हेंच सुरक्षितपणाचं आहे. वैनी, आजीबाअी–फॅशनचीं बाळंतपणं आता थांबवलीं पाहिजेत. हवा-प्रकाशाला सर्वस्वी मज्जाव

असलेल्या त्या ब्लॅक होल्समधे बाळंतिणीचा कोंडमारा करायचा, तेल-हळदीचं लिंपण, सकाळ-संध्याकाळच्या शेगडीची जाळपोळ, हळीव-डिंकाचा चरिंदा आणि तुपाचा मारा यामुळं–"

"बाळंतिणी कशा कडबूगत फुगतात. नाहीतर दवाखान्यां-तल्या अुपासमारीनं वाळून गेलेल्या आजच्या खारका! अिश्श! आमची मनी पहिल्या खेपेला आली आणि आमच्या आईनं तिचं असं बाळंतपण केलं, की न्यायला आलेल्या नवऱ्याला ओळखता येईना आपली बायको हीच का म्हणून!"

"हीच आपत्ति माझ्या बायकोवर कोसळायला नको आहे मला. बाळंतपण म्हणजे कांही आजार नव्हे. पण तो आजार समजून औषधं चारायचीं आणि जेव्हा विश्रांति एवढया एकाच गोष्टीची आवश्यकता असते तेव्हा सकाळसंध्याकाळ अंगाला लावायच्या निमित्तानं तिला घामाघूम करायचं. विश्रांति, मोकळी हवा आणि हलका आहार हेच बाळंतिणीला योग्य उपचार. या उपचारांनी ती खणखणीत आणि निकोप राहाते आणि तुमच्या भरमसाट खादी-मुळं बाळंतीण नवऱ्यालाहि ओळखूं न येण्याअितकी फुगली, तरी तो ढिगारा आरोग्यापेक्षा रोगांनीच भरलेला असतो. तुमच्या मनुताअी अितक्या तय्यार होत्या, तर सहा महिन्यांत झिजून गेल्या म्हणून तुम्हीच सांगत होतां ना?"

"अहो, पण तिला दृष्ट बाधली–"

"दृष्ट बाधली! होय, तुमची बाळंतपणाविषयी असलेली वेड-गळ दृष्टीच तिला बाधली! तें कांही नाही वैनी, मीं मघाशी सांगि-तला तो अेकच अुपाय या साऱ्या आपत्तीचं निरसन करूं शकेल. बाळंतपण हें दवाखान्यांतच झालं पाहिजे, हा कायदा सरकारनं जारी करावा. त्यामुळं मुलांचा लोंढा थोडा तरी कमी होअील आणि होतील तीं मुलं आयांसकट शाबूत राहतील."

"येत्या शिशुसप्ताहांत तुम्ही या विषयावर अेक व्याख्यान द्या भाअूजी. शिशुसंगोपनावर नामांकित डॉक्टर अुगीच काथ्याकूट करीत बसतात. त्यापरीस–"

"अेका वाक्यांत मी शिशुसंगोपनाचा सर्वोत्तम अुपाय सांगून टाकीन. शिशुसंगोपनाचा अुत्तम अुपाय म्हणजे संततिनियमन!"

"खासा न्याय! पिकावरची कीड मारायला शेतच पेरूं नये; किंवा सुशिक्षितांची बेकारी नाहीशी करायला शाळा-कॉलेजंच बंद करावीं असं सांगण्यासारखं आहे हें!"

आपण बिनतोड युक्तिवाद केला अशा आविर्भावाने ती हसलेली पाहून दाजी म्हणाला,

"माझ्या म्हणण्याचं तुम्हाला हसूं येतं; पण थोडा विचार केलांत तर तें किती बरोबर आहे हें तुम्हाला दिसेल. तुमचे शिशु-सप्ताह सालोसाल होतात ते मीहि पाहतों आहे. 'मुलाला धुतलेले कपडे वापरा, गायीचं दूध पाजा, मोकळ्या हवेंत आणि सूर्यप्रकाशात त्याला हिंडवा, त्याला रडवूं नका, अफू घालूं नका, ग्लॅक्सो चारा, डॉक्टरकडून त्याची तपासणी वरचेवर करून घ्या,' अित्यादि गर्जना व्याख्यानांच्या, चित्रांच्या आणि भिंतपत्रिकांच्या द्वारां तुम्ही करतां. कलेक्टरला गव्हर्नरचा दट्टया असतो म्हणून तो मामलेदार-महाल-कऱ्यांना तंबी भरून हे समारंभ साजरे करतो. गरिबांचीं पोरं धट्टीं-कट्टीं व्हावीं हा हेतूच नसतो मुळी. टाअिम्सचे दोन स्तंभ भरले म्हणजे झालं. वैनी, तुम्हीच सांगा, हे अुपाय चांगले असले तरी अंमलांत आणणं कसं शक्य आहे? अुदाहरणच घेअून बोलूं आपण. श्रीयुत वाळकेश्वर हे शाळामास्तर. दरमहा पगार रुपये पंचवीस. शिकवण्या करून पांचसात रुपये जादा कमाअी. वट्टांत तीस रुपये धरूं. ते, त्यांची पत्नी आणि त्यांचीं पांच मुलं. म्हातारी आअी मरून गेली आणि घरीं आलेली अेकहि बहीण त्यांना नाही असं धरलं तरी लहानमोठीं सात तोंडं भरण्याचं सामर्थ्य या तीस रुपयांत आहे का? ग्लॅक्सो आणि गायीचं दूध पोरांना पाजायचं तर या आअीबापांनी वायुभक्षण करण्यावांचून गत्यंतर नाही. धुतलेले कपडे वापरावेत हें कबूल; पण ते धुवायचे कुणी, केव्हा आणि कसे? परीट पैसे मागतो अन् त्यांचीच तर टंचाअी! वाळकेश्वर शाळा शिकवण्यात

गर्क तर बायको वेळेवर स्वयंपाक करायच्या फिकिरींत! मोठ्या चिमींच्या स्वाधीन मधला बंड्या करायचा अन् छोट्या बाळीला गोळी देऊन पाळण्यांत पाडायचं, यापेक्षा ती बिचारी काय करूं शकणार? वाळकेश्वराच्या राज्यांत पौष्टिक पदार्थांना मज्जावच! पण पोरांना पोटभर मोकळी हवा चारण्यासहि त्यांची माय असमर्थ असते. घराबाहेर पडायचं म्हणजे अुरांत धडकी भरते बिचारीच्या! कारण तिला तीन तंत्रं संभाळत वाटचाल करावी लागते! बंड्याला बोट धरून चालवलं तरी बाळीची बैठक कमरेवर जाम असते; आणि होअू घातलेला नवा अवतार पोटांत गोळा आणीत असतो! अशा मायबापांच्या बालबच्चांना तुमचे शिशुसप्ताह काय कामाचे? तुमचे शिशुसप्ताह नर्स व पर्सवाल्या लोकांना झकास. पण असे भाग्य-वंत आपल्या देशांत कितीसे आहेत? सारा भरणा वाळकेश्वरांचा! त्यांचं शिशुसंगोपन म्हणजे संततिनियमन. समजा, वाळकेश्वरांना अेकच अपत्य असतं तर त्याचं संगोपन त्यांनी तुमच्या सप्ताही पद्धतीनंहि केलं असतं. पैसा मोजका असला तरी अपूर्वाअी मुबलक राहिली असती. पैशाअितकंच अपूर्वाअीचंहि महत्त्व आहे."

दाजींचें हें व्याख्यान मला आवडलें आणि तें तिलाहि आवडलें असलें पाहिजे याची मला शंका नव्हती. तरीपण ती म्हणालीच,

"कांहीतरी मुलुखावेगळं असतं भाअूजींचं..."

आम्ही पांडवगावीं चारपांच दिवस राहिलों. आमचे रोज नवेनवे वादविवाद होत आणि निरनिराळे बेतहि ठरत. पण शेवटीं मुक्रर झाला तो बेत असा—

भिरिपतळांत तीन आठवडे राहून सरलाबाअीने तिथचा निरोप घ्यावा. नंतर तिला दाजीने आमच्याकडे आणून पोचवावें. मामांचा नातू आणि त्यांनी देअून ठेवलेल्या देणगीचा भावी धनि त्यांच्या नजरेखाली आणण्याचें कार्यहि यांत साधावयाचें होतें. दाजीला हा अुद्देश कळवावयाचा नव्हता. कारण आपल्या पत्नी-मुलाला मामांनी अिस्टेट दिली हें कांही त्यांनी सत्कृत्य केलें नाही, असें दाजींचें अजूनहि मत होतें.



दुसऱ्या दिवशीं दाजी आमच्या घरीं सहकुटुंब सहपरिवार येऊन दाखल झाला.

( पान २१६ )

ठरलेल्या दिवशीं दाजी आमच्या घरीं येऊन सहकुटुंब सह-परिवार दाखल झाला.

" सांभाळा हें लटांबर, वैनी ! " घरीं शिरतांच आपला बिम्प्या तिच्या हातीं देत दाजी म्हणाला.

ती त्या नव्या पाहुण्यांत अितकी गुंग होअून गेली, की दाजी-सरलाबाअीला 'या बसा' म्हणण्याची अुमकाहि तिला राहिली नाही. पण—

" आता आम्हाला परवानगी ? " या दाजीच्या प्रश्नाने ती भानावर आली आणि म्हणाली,

" म्हणजे ! सुट्टीच आहे ना आता ? मग घाअी का अशी वाघ मागं लागल्यागत ? कुठं तारीखबिरीख नेमलीय् की काय ? "

" होय, कांही अंशीं तसंच. प्रापंचिक जबाबदारींतून मी आता नैतिक दृष्टया मुक्त झालों आहें असं मला वाटतं; आणि म्हणूनच मीं आता समाजकार्याला वाहून घ्यायचं ठरवलं आहे. "

' म्हणजे ! गोरक्षणप्रचारक होणार आहां की खादीभांडार काढणार आहां ? "

" मातींत टाकण्याअितकं माझं आयुष्य मूल्यशून्य नाही. महा-राष्ट्राला लागलेला अेक कायमचा डाग धुअून काढण्याची माझी महत्त्वाकांक्षा आहे."

" कोणचा डाग बाअी तो ? "

अुभ्याअुभ्या हें व्याख्यान चालू देणें मला अिष्ट वाटेना. कारण स्वस्थपणें चहा पीतपीत बोलण्यांत दाजी आपला विषय चांगला रंगवील असा माझा कयास होता व तो खराहि ठरला.

महाराष्ट्रांत बुद्धि आहे आणि कर्तबगारीहि कमी नाही; पण घरकोंबडेपणामुळे त्याच्या या गुणांचें तेज मुळीच फाकत नाही. घर सोडण्याचा मद्रासी गुण महाराष्ट्रांत आला तर अटकेवर भगवा झेंडा नाचविण्याचा पराक्रम आजहि महाराष्ट्र करून दाखवील. आणि आपण हें सोदाहरणाने सिद्ध करून दाखविणार, असें दाजी म्हणत होता.

बाहेरच्या देशांनी येऊन महाराष्ट्र धुवून नेण्याचा सपाटा चालविला असतां आपण त्यांचाच कित्ता गिरवला पाहिजे असें त्याचें म्हणणें. हिंदुस्थानांतून कवडीहि न नेतां परदेशांतलें मूठभर तरी सोनें आपण हिंदुस्थानांत आणूं ही दाजींची प्रतिज्ञा. अेका दाजीने अशी पायवाट पाडली की शेकडो दाजी तीच वाट चालतील आणि जाणाऱ्या सोन्या-सारखा येणाऱ्या सोन्याचा प्रवाहहि हिंदुस्थानांत– आणि तो घरकोंबडा म्हणून हटाळला गेलेल्या महाराष्ट्राच्या प्रयत्नाने वाहूं लागेल, हें दाजीचें मनोराज्य! महाराष्ट्राला सुवर्णगंगेचा भगीरथ अशी पदवी संपादन करून देण्याचा चंग दाजीने बांधला होता.

दाजीचे टोलेजंग बेत चालत, त्यांतलाच हाहि अेक असेल अशी प्रथम माझी समजूत होती. पण या वेळचीं त्याची तयारी कांही औरच होती. गेले दोन महिने पत्रव्यवहार करून त्याच्या साहाय्याने त्याने आपला कार्यक्रम मुकर केला होता. मुलतानला जीवनराम मीरचंदानी आणि कंपनी या नांवाची अेक मोठ्या भांडवलाची व्यापारी संस्था नुकतीच स्थापन झाली असून हिंदुस्थानांतला पक्का माल परदेशांत विकायचा तिचा अुद्देश आहे. अफगाणिस्थान, बलुचिस्थानसारख्या नजीकच्या आणि प्रगतिपथावरील देशांत आपलीं जाळीं पसरण्याचा कंपनीचा अुद्देश असून तो सफल करण्यासाठी कंपनीने सरहद्दीवरील मोठमोठ्या शहरीं आपलीं ठाणीं ( Branches ) सुरू केलीं होतीं; व त्यांत काम करण्यासाठी हिंमतवान हिंदु तरुण पाहिजेत, अशी मागणी जाहीर केली होती. ही मागणी दाजीच्या दृष्टीस पडली आणि त्याने आपली अनुमति कंपनीस कळवली. कंपनीने त्यास मुलाखतीस बोलावलें होतें आणि त्यासाठी दाजी आज रात्रींच्याच गाडीने निघणार होता.

टांग्यांत बसण्यापूर्वी त्याने आम्हां अुभयतांचा सप्रणाम निरोप घेतलाच, पण बायकोस आपल्यासमोर अुभी करून म्हटलें,

“स, बिम्याला संभाळ. आता तुझी मुख्य जबाबदारी तीच आहे. माता होतांच पत्नीची अवतारसमाप्ति होते. आता तूं

दाजीची पत्नी राहिली नाहीस तर विम्याची माता बनली आहेस हें ध्यानांत धरून आपलं कर्तव्य योग्य प्रकारें पार पाड. आता दाजी तुझ्या हिशेबीं मेला असंच तूं समजलं–"

त्याचें वाक्य पुरें ऐकायला सरलाबाई तेथे राहिली नाही व तीहि नापसंती दर्शवीत म्हणाली, "वेळींअवेळीं काय हव्वं तें बोलवतं तरी कसं तुम्हाला, भाऊजी? बरं चला, तो टांगेवाला लागलाय् ओरडायला. सुखरूप पोचल्याचं पत्र पाठवा, अन् पत्ताहि कळवा न विसरतां."

तिकडची परिस्थिति पूर्ण अजमावल्यावांचून आहे या नोकरीचा राजीनामा न देण्याचा पोक्त सल्ला मीं दिल्यावर दाजी टांग्यांत बसला.

तिसऱ्याच दिवशीं 'सुखरूप पोचलों. कंपनीशीं अनुकूल करार-मदार झाले, पत्रव्यवहार कंपनीच्याच पत्त्यावर करावा,' अशी दाजीची तार आली आणि जीव भांड्यांत पडल्यासारखा झाला.

आणखी तीनचार दिवस गेले आणि दाजीचें सविस्तर पत्रहि आलें. त्यांत त्याने प्रवासांत आलेले अनुभव दिलेले होते, मारवाडी मॅनेजरच्या गमती दिल्या होत्या आणि हिंदी भाषेच्या बिनसरावामुळे आपली कसकशी मौज उडाली हें सांगून त्याने लिहिलें होतें–

"काबूल, कंदाहारला शाखा सुरू करावयाच्या असल्याने कंपनीचे असि. मॅनेजर लाला मलिकराय आजच दौऱ्यावर निघणार असून त्यांचा सेक्रेटरी म्हणून मीहि जाण्याबद्दल मला हुकूम मिळाला आहे. आमचा दौरा क्वेट्टा– खिलातवरून व्हावयाचा आहे. कारण तिथल्या शाखांची तपासणीहि करावयाची आहे. माझें हें पत्र आपल्या हातीं पडेल तेव्हा मी क्वेट्टयास ब्रँचचे हिशेब तपासत बसलों असेन."

दाजीचें हें पत्र वाचून आम्हांला मौज वाटली आणि दाजीबद्दल अभिमानहि वाटला. "आमचे भाऊजी आहेतच तसे! लाथ मारतील तिथं पाणी काढतील!" असें म्हणून तिने मांडीवरील विम्याला उचलून त्याचा मुका घेतला.

अितक्यांत अेजंटाकडून ताजा टािअम्स आला आणि मीं तो रोजच्या अुत्सुकतेने अुघडला. ती अेक ओळ वाचतांच माझ्या अुरांत धस्स झालें आणि टािअम्स हातांतून गळून पडला !

" काय झालं ? " तीहि दचकून अुद्‌गारली.

काय अुत्तर देणार मी तिला ?

वेळ आली म्हणजे काळ आपला बळी कुठूनहि ओढून नेतो म्हणतात तें खरें नाही काय ? नाहीतर भूकंपांत गाडला जाण्यासाठी दाजी आपल्या पायाने धावत कां गेला असता तिकडे ?

मीं क्वेट्टयास व मुलतानास जीवनराम मीरचंदानी कंपनीला तार करून दाजीची खुशाली विचारली; पण जबाब नाही ! अखेर सरकारला तार केली तेव्हा चार दिवसांनी अुत्तर आलें, की " सदर कंपनीची टोलेजंग अिमारत जमीनदोस्त झाली असून तिच्याखाली खूप मंडळी गाडली गेली असली पाहिजेत. कंपनीच्या चालकांचा कांहीच पत्ता लागत नाही ! "

तिचे डोळे सारखे पाझरताहेत; पण सरलाबाअीला धीर देण्यासाठी तिला अुसना धीटपणा दाखवावा लागत आहे. पण अशाने का तिचें समाधान होणार ? गरीब बिचारी ! तिच्या मनःस्थितीची मला कल्पनाहि करवत नाही ! " अजून तारेचा जाब नाही " असें धडधडीत खोटें सांगून मी वेळ मारून नेतों आहे. साधेल तितके दिवस साधेल !

शेवटीं गोड घास घेअून जेवण संपवावें असें म्हणतात; पण दुर्दैवाने दाजी-चरित्रावर या कटु प्रसंगाचा पडदा पाडण्याची पाळी माझ्यावर आली आहे. दाजीच्या या प्रयाणाने माझ्या आयुष्यांतील अेक मोठें स्नेहाचें, प्रेमाचें ठिकाण नाहीसें झालें आहे. दिसायला तऱ्हेवाअीक असला तरी त्याच्या अभिनव विचारांनी माझी दृष्टि व्यापक होण्यास मदत झाली आहे. घटकाभर खटका अुडाला तरी त्याने आपला सुहृदभाव कधीच ओसरूं दिला नाही. अुलट दिवसगतीने त्याचें प्रेम अधिकाधिक दृढच होत राहिलें. अडीअडचणीच्या वेळीं

हक्काने हाक मारावी असा माझा हा दोस्त आज तरी मला पारखा झाला आहे !

दाजीच्या या अपघाताने त्याचे वाचकमित्रहि हळहळल्याशिवाय राहणार नाहीत. कोणाचें सांत्वन कोणीं करायचें असा हा बाका वखत आहे. दैववादाला जाणते लोक थारा देत नाहीत; पण अशा प्रसंगीं त्या दैवावरच भिस्त ठेवण्यावांचून काय करतां येणार आहे ? त्या दैवाने आपली वक्रदृष्टि बदलून दाजीला शाबूत राखावें आणि त्याची आमची पुनर्भेट करावी, अशी आशा उराशीं धरून काळ कंठणें अेवढेंच आपलें काम आता शिल्लक राहिलें आहे.

दैवाच्या मेहेरनजरेने मला दाजी परत मिळाला तर ती आनंदवार्ता मी विनाविलंब जगजाहीर करीन. आणि कुणा शोध-काला त्याचा थांगपत्ता लागला, आणि जर त्याने तो मला कळवला, तर त्याचे अपकार मी कधीहि विसरणार नाही.

★ ★ ★



# दाजीचें अिच्छापत्र

रुपाया हरवला म्हणजे नाणेखुर्द्याचीहि अपूर्वाअी वाटूं लागते. स्नेह्याच्या बाबतींतहि तसेंच. स्नेही आवतीभोवती वावरत असला म्हणजे त्याच्याकडे आपण फारसें लक्ष देत नसलों, तरी तो नजरेआड झाल्यावर त्याच्या किरकोळ गोष्टींचीदेखील वरचेवर आठवण येते, त्याचें कौतुक वाटूं लागतें. दाजीच्या बाबतींत हा अनुभव मला प्रत्यहीं येत आहे.

दाजी नजरेआड झाल्याला आता आठनअू महिने होत आले. या अवधींत असा अेकहि दिवस गेला नाही, की ज्या दिवशीं भाअूजींची आठवण येअून तिचे डोळे ओले झाले नाहीत. दाजी आमच्यामध्ये प्रत्यक्ष होता, तेव्हा त्याला आम्हीं शेकडो वेळां अुपहासिलें असेल, त्याच्या आचरटपणाची हेटाळणी केली असेल, अगर त्याच्याशीं खडाजंगी अुडून त्याच्यावर संतापण्याचे प्रसंगहि आमच्यावर अनेक आले असतील. पण त्या साऱ्या गोष्टी त्याच्याबरोबर संपल्या आणि आता त्याच्याविषयींचें ममत्व व प्रेम अेवढेंच काय तें शिल्लक अुरलें आहे.

मृत्यूचा—! काय म्हटलें हें मीं! त्या दारुण शक्तीचा आणि दाजीचा संबंध जोडण्यास अजूनहि माझें मन तयार होत नाही. दाजी अद्यापि ज्या जगांत आम्ही वावरतों त्याच जगांत आहे, असें आमचें

आशावादी मन मानतें. तो जिवंत असून अज्ञानवासांत कसा व कां राहील अशा शंका येत नाहीत असें नाही; पण प्रेमबद्ध मनाला ही तर्कबद्ध विचारसरणी मानवत नाही. 'नो न्यूज अिज् गुड न्यूज,' म्हणजे मुळीच बातमी कळली नाही म्हणजे सर्व कुशल समजावें, ही विचारसरणी आम्हीं सर्वांनी स्वीकारली आहे.

फलज्योतिषावर माझा विश्वास नाही. ज्या आठवड्यांत हमखास भाग्योदय असें वृत्तपत्रीय भाकित प्रसिद्ध व्हावें, त्याच आठवड्यांत आणि त्यांत अुल्लेखिलेल्या विशेष लाभदायक तारखांस लक्षांत राहण्या-सारख्या ठोकरा मला बसाव्या, असा विपरीत अनुभव अनेकदा आल्यानेच माझी या भविष्यावरील अश्रद्धा बळावली आहे. विचारी मन असें अश्रद्ध बनलें असलें, तरी वेडें मन त्याभोवती अद्यापीहि घुटमळतें आणि प्रत्येक पत्रांतील प्रत्येक भविष्य चाळून अपेक्षित कार्य-सिद्धीच्या, प्रियजनमीलनाच्या वा नष्टधनलाभाच्या तारखांकडे डोळे लावून बसतें. त्या तारखेदिवशीं दारापुढून जाणाऱ्या प्रत्येक टांगा-मोटारींतून दाजी अुतरेल, निदान पोस्टमनच्या पुडक्यांतील अेखाद्या पत्रांतून तरी दाजीचें कुशल वर्तमान येअील, या आशेने माझें मन अस्थिर होतें. पूर्ण निराशेपेक्षाहि ही अस्वस्थता अधिक तापदायक होते.

तिची आणि सरलाबाअीची अवस्था तर विचारायलाच नको. दारावर भिक्षेला येणाऱ्या कुडबुड्या जोश्यापासून प्रख्यात रमल-शास्त्रज्ञ पंडित बदरीनाथजीपर्यंत सर्वांना कौल लावण्याचा दोघींचा क्रम अव्याहत सुरु आहे. नवस, व्रतें, अुपवास या गोष्टींना तर खंडच नाही. अितर वेळीं त्यांचे हे वेडेचार मीं चालूं दिले नसते, पण ही वेळ तशी नाही. फलप्राप्तीच्या विश्वासामुळे नव्हे, पण त्यांच्या मनाला विरंगुळा पडतो म्हणून मी या गोष्टींकडे डोळेझाक करतों आहें. आणि न होअून अेखाद्या अुपायाला गुण आला तर? कुणाच्याहि कोंबड्याने दिवस अुगवला तर मला हवाच आहे.

दाजीच्या आम्हां निकटसंबंधी जिवांचीच अशी स्थिति आहे असें नाही. हजारों वाचक-बंधुभगिनीहि त्याच्या पुर्नभेटीसाठी आतुर

झाल्या आहेत. भूकंपाच्या आपत्तींत तो गुरफटल्याचें दुःखद वर्तमान अैकून कितीतरी मनें विकल झालीं. कित्येकांनी आम्हांस व सरलाबाअीस सांत्वनपर संदेश धाडले. दाजी हा अेक समाजांतील सामान्य घटक आहे अशी आमची समजूत होती ती खोटी ठरली. त्याने दृष्टीआड होण्यांत सामाजिक हानि होत आहे अशीं मतें प्रकट झालीं, त्याच्या हानीमुळे होणारें दुःख जाहीर सभांतून प्रदर्शिलें गेलें, सांत्वनपर आणि पुनर्लाभाबद्दल संदेशहि अध्यक्षांमार्फत आमच्याकडे आले! तेव्हा आम्हांला कळलें, की दाजी हा सामान्य माणसापेक्षा कांहीतरी विशेष आहे. आम्हीं त्याला सामान्य मानलें म्हणजे अतिपरिचयामुळे त्याची अवज्ञाच केली. दाजीच्या मित्रपरिवाराची ही सहानुभूति आणि सदिच्छा औपचारिक आणि केवळ बोलकी नसून खरी जिव्हाळ्याची आहे हें सिद्ध करणारें अेक अुदाहरण घडलें माझ्याकडे अेका अज्ञात मित्राकडून कांही पैसे आले आहेत. दाजीचा शोध लावून देणाऱ्यास बक्षिसादाखल ते द्यावे आणि शोध लागलाच नाही तर चिरंजीव विबुजीमच्या खाअू-खेळण्यांसाठी त्यांचा विनियोग व्हावा, असें त्या अज्ञात सज्जनाचें सांगणें आहे.

दाजी हा खरें म्हटलें तर सुधारक. सनातनी, जुनाट आचारविचारांवर निर्दयपणें हल्ला चढविण्यांत त्याने कधी कसूर केली नाही. अशा स्थितांत सनातनी मंडळींना दाजीबद्दल हळहळ वाटण्याचें वास्तविक कारण नाही. तरीहि अेका वेदमूर्तींचें पत्र मला आलें. त्यांत त्यांनी लिहिलें आहे—

" श्रीयुत दाजींचे विचार मला पटत नसले, तरी त्यांच्या प्रामाणिकपणाबद्दल मला शंका आली नाही. दाजींची मला प्रामुख्याने दिसणारी दुसरी गोष्ट म्हणजे जनहिताबद्दलची त्यांची कळकळ. लोक हसतील म्हणून आपलीं प्रामाणिक मतें दाबून ठेवण्याचा भ्याडपणा त्यांनी कधीच दाखविला नाही. अशीं माणसें फार थोडीं निपजतात; आणि जरी निपजलीं तरी दीर्घ काल लाभत नाहीत. श्रीयुत दाजींच्या शोधाबद्दल पैशाचा खर्च करण्याअितका मातबर मी नाही. तरपिण

अीश्वरानिष्ठेचें अुदंड भांडवल माझ्यापाशी आहे. माझा मोरया दाजीचा पुनर्लाभ संचित करून देअील. त्याची कृपा व्हावी म्हणून मीं श्रीला अथर्वशीर्षाच्या अेकवीस आवर्तनांचा अभिषेक सुरू केला आहे. सोबत श्रीवर वाहिलेलें हळदीकुंकू धाडलें आहे, तें सौभाग्यवती ( ब्राह्मणाच्या तोंडांतून निघालेला शब्द आहे हा ) सरलाबाअींनी प्रत्यहीं लावावें. त्याचप्रमाणे मंगलमूर्तीच्या नैवेद्याचें पंचखाद्य चि. विबुजीमला खाअू म्हणून धाडलें आहे. तें त्याला रोज देत जा. पुढच्या संकष्टीस पुन्हा पाठवीन. विघ्नहर्त्या गणरायाचा प्रसाद वाया जाणार नाही.''
अेवढा मजकूर लिहिल्यावर ताजा कलम घालून भटजींनी पुढील मजकूर लिहिला आहे–

''सौभाग्यवतीने सरलाबाअीस माघांत अंगारकी संकष्टी आहे, ती करावयास सांगितलें आहे.''

त्या सहृदय दंपतीच्या सहानुभूतीने अोथंबलेले शुभ संदेश आले, त्या दिवशीं आमच्या घरीं अश्रूंच्या सरीवर सरी अोघळल्या. सरलाबाअी तर बेशुद्ध पडण्याच्या बेतास आली. दाजीच्या आपत्तीची बातमी कळली त्या पहिल्या दिवशीं रडली नसेल अितकी ती या पत्रवाचनाने रडली ! पुरुषासारखा पुरुष मी. मन दगडासारखें घट्ट करायचें ठरविलें असूनदेखील त्या दोघींची ती अवस्था पाहून मला हुंदका आवरला नाही. सज्जनांची सहानुभूति धीर देते, तशी रडवतेहि !

दाजीविषयी वाटणाऱ्या सार्वत्रिक ममत्वाचें वर्णन कुठवर करूं ? तो कुणाच्या स्वप्नांत येअून आपण अमुक ठिकाणीं आहों असा दृष्टांत देतो, तर कुणाला आपल्याकडे आलेला विमाअेजंट दाजीच असल्याबद्दल भास होतो ! असो.

योगायोगावर भिस्त ठेवून तूर्त तरी दिवस कंठीत आहों. कर्ता पुरुष या नात्याने दाजीच्या बिऱ्हाडाची आवराआवर करून ठेवली आहे. पांडवगावची अडगळ येथे आणली आणि ती व्यवस्थित लावीत असतां पुष्कळशा अुपयुक्त व नावीन्यपूर्ण चिजा मला आढळून आल्या.

वस्त्रपात्र अथवा दागदागिन्यांचा संग्रह दाजीने केलाच नाही म्हटलें तरी चालेल. पण ग्रंथसंग्रह करण्यांत त्याने खूप परिश्रम केले असें माझ्या दृष्टोत्पत्तीस आलें.

दाजीचा दुसरा साठा म्हणजे त्याच्या लिखाणाचा. हीं ढीग-भर दप्तरें म्हणजे असेल कसलीतरी रद्दी असें प्रथम मला वाटलें. आणि तिची वाण्याकडे रवानगी करावी अगर ती गरम न्याच्या कारणीं लावावी, असाहि विचार माझ्या मनांत आला. मीं आंधळेपणाने तसें केलें असतें, तर महाराष्ट्र-साहित्य-भांडाराची फार मोठी हानी झाली असती. माझा विचार बदलण्यास अेकच कपटा कारणीभूत झाला. त्यावर पुढील चार ओळी होत्या—

होत्या रानभरीं तराहनि अुभ्या
वृक्षांसवें वल्लरी
'माजे झाडुर व्यर्थ' बोलुनि असें
गेला करंटा दुरी ॥
जाअूनी जवळीं गुणज्ञ निरखी
ती सृष्टिची दौलत
त्यातें सापडलीं किती नवनवीं
पुष्पें सुगंधान्वित ॥

हा श्लोक दाजीकृतच असावा असा माझा अजमास आहे. कारण या चार ओळींत अेकदोन ठिकाणीं खाडाखोड नि दुरुस्ती केलेली होती. हस्ताक्षर दाजीचेंच होतें. त्याने दुसऱ्या कोणाचा श्लोक अुतरून घेतला असता तर त्यांत खाडाखोड असण्याचा संभव नव्हता. आणि असा अेखादा श्लोक बनवणें दाजीला अशक्य नव्हतें.

दाजीच्या या श्लोकरचनेचा अुद्देश काय, याचा अुलगडा होण्यास आता कांहीच मार्ग नव्हता. आणि मी त्या खटाटोपांत पडलोंहि पण नाही. त्या सुभाषितांतील संदेश माझ्या मनापर्यंत जाअून भिडला आणि 'दाजीच्या दप्तरास केवळ रद्दीचा ढीग समजूं नको, त्यांतहि नवीनवीं सुगंधित पुष्पें सापडणें शक्य आहे,' असें त्याने मला बजावलें.

आणि झालेंहि तसेंच. दाजीचीं दप्तरें म्हणजे अेक ज्ञानभांडारच आहे असा मला प्रत्यय येअूं लागला. दाजीला आम्ही घरकोंबडा म्हणून हिणवीत असूं. चारचौघांत विनाकारण जायचें नाही असा त्याचा खाक्या असे. पण आपल्या घरकोंबडेपणाचा अुपयोग त्याने केवळ झोपा ताणण्यांत किंवा बायकोभोवती पिंगा घालण्यांत केला नाही, असें त्याच्या या लेखनपसंतीवरून निःसंकोचपणें म्हणतां येअील. अमुक संताने लक्ष ग्रंथ लिहिला असे संतवाङ्मयांत अुल्लेख आढळतात. दाजीच्या लेखनांत सुसूत्रता असती व त्याने आपलें लेखन अभंगओवींच्या साच्यांत दाबलें असतें, तर मला वाटतें, त्याची लेखनसंख्या अर्ध्यापाअूण कोटीपर्यंत सहज गेली असती.

दाजीचें लेखन— कांही तुरळक अपवाद वगळल्यास— गद्यमय आहे; तसेंच तें ग्रंथरूप नसून स्फुट आहे. कांही विवेचनात्मक दीर्घ प्रबंध असले, तरी बहुतेक लघुनिबंध आहेत. कांही टिपणें आहेत, चुटके आहेत, संवाद आहेत. त्याचें विवेचन क्लिष्ट नाही. सुबोधता हा त्याचा प्रधान गुण म्हणून सांगतां येअील. त्याचें मतप्रतिपादनहि संदिग्ध अगर गुळमुळीत नाही. आपलें म्हणणें स्पष्ट-पणें मांडण्याचा दाजीचा बेडरपणा त्याच्या लिखाणांतहि प्रकट झाल्यावांचून राहात नाही. दाजीच्या दप्तरांतील अेखादा कपटा डोकें सुंद करून सोडतो, तर अेखाद्या कागदांत हास्यरसाच्या वड्या भरलेल्या आढळतात !

अलीकडे फुरसतीच्या वेळीं हें दाजीचें साहित्यभांडार वाचीत बसण्यांत आम्ही कालक्रमणा करीत असतों. परवा तिने अेक कल्पना सुचविली आणि ती मलाहि पटली. आपल्या वाचनांत आलेले महत्त्वाचे कागद अधूनमधून प्रसिद्ध केल्यास दाजीच्या पुष्कळ मित्र-मंडळींस आनंद वाटेल. लेखनाच्या रूपाने का होअीना, त्याची भेट झाल्याचा आनंद त्यांना होअील. मनुष्य दुधाची तहान ताकावर भागवतोच.

आमची ही समजूत पडताळून पाहण्यासाठी मीं आज दाजींचें अिच्छापत्र पुढे देण्याचें योजिलें आहे. आमची आवड तीच सर्वांची आवड असणें शक्य नाही. तथापि, दाजींचीं हीं रद्दींतील रत्नें लोकप्रिय झाल्याचें आढळल्यास तीं वाचकांना सादर करण्यास मला आनंद वाटेल. लोकांच्या आवडीवरच हें प्रसिद्धीकरण मी अवलंबून ठेवणार आहे.

## माझें अिच्छापत्र

हें अिच्छापत्र लिहून ठेवण्याचें कारण मी अेक प्राणी आहें व प्राणिमात्र मरणाधीन आहे हा त्रिकालाबाधित नियम आहे. दुसरा त्रिकालाबाधित नियम हा, कीं मरणाधीन होण्याचा क्षण कोणालाहि आधी कळत नाही. म्हणून कांहीं अंशीं प्राण्याचें मरण हा अेक प्रकारें अपघातच असतो. हें जर खरें, तर अपघातोत्तर व्यवस्थेची रूपरेखा केंव्हाहि तयार ठेवणें हें प्राप्तबुद्धि मनुष्याचें अवश्य कर्तव्य ठरतें. माझ्यापुरतें हें कर्तव्य मी पुढीलप्रमाणे बजावीत आहें.

या प्रकाराला मृत्युपत्र अशी संज्ञा रूढ आहे, पण ती मला अन्वर्थक वाटत नाही. अिंग्रजींत यालाच 'वुअिल' म्हणतात आणि त्या शब्दांत ध्वनित होणारा 'अिच्छा' हा अर्थ योग्य असल्याने 'अिच्छापत्र' हा समानार्थी शब्द मीं येथे योजिला आहे.

मृत्युपत्रांत लेखक प्रायः आपल्यामागे जगणाऱ्या माणसांस हुकूम फर्मावीत असतो. आपल्या जिंदगीचें दान करतांना तो दुसऱ्यावर नाना तऱ्हेच्या अटी लादतो. त्यामुळे त्यांचें विचारस्वातंत्र्य नष्ट होतें. मी माझें हें अिच्छापत्र अशा फर्मानांनी दूषित करणार नाही. मी फक्त माझ्या अिच्छा नमूद करून ठेवणार आहें. त्या कोणासहि बंधनकारक नाहीत. योग्य वाटल्यास पाळाव्या. मीं आखलेल्या योजनेंत अिष्ट सुधारणा करण्याची मोकळीक मी आधीच देअून ठेवीत आहें.

कलम १– पैसा. माझ्या पश्चात् माझ्या दोन पॉलिसींचे तीन हजार रुपये येतील. प्रॉव्हिडंट फंडाचेहि कांही पैसे येअू शकतील. हे पैसे 'माझे' आहेत असें मीं कधी मानलें नाही. माझी प्रापंचिक गरज अुत्तम प्रकारें भागल्यावर अुरलेला पैसा हा लोकांचा ठरतो. फक्त त्याचा व्यवस्थापक मी. लोकांच्या या ठेवींचा विनियोग लोकहिताच्या दृष्टीनेच व्हावा अशी माझी अिच्छा आहे.

माझ्या आधी मेली नसेल तर माझी प्रपंचमैत्रीण (जी माझी पत्नी म्हणून ओळखली जाते) सरला या पैशाची व्यवस्थापक व्हावी. आणि तिने या पैशाचा यथायोग्य विनियोग करावा. स्वतःच्या चरितार्थासाठी, शिक्षणासाठी वा नैतिक अभ्युदयासाठी तिने हा पैसा वेचल्यास तें निषिद्ध ठरूं नये. या पैशाचा स्वतःसाठी विनियोग करतांना नवऱ्याची बायको अशी हक्कदारीची समजूत करून न घेतां सरलाबाअींनी समाजांतील जगण्याचा हक्क असलेला अेक घटक अशी भावना ठेवावी.

आम्हांवर अद्यापि अपत्यसंगोपनाची जबाबदारी आलेली नाही. ती येअू नये अशी अिच्छा व सावधगिरीहि आहे. तथापि, मनुष्यसहज प्रमाद घडून तशी जबाबदारी आली, तर जितक्या अुत्तम प्रकारें ती पार पाडतां येअील तितक्या अुत्तम प्रकारें ती पार पाडणें हें मी कर्तव्य मानतों. माझ्या पश्चात् सरलाबाअींनीदेखील या कर्तव्याकडे डोळेझाक करूं नये. आमच्या पोटीं आलेला मुलगा अगर मुलगी हा आमचा प्रमाद असला तरी तो त्यांना भोवतां कामा नये. समाजांत नमुनेदार घटक होण्याचा त्यांचा हक्क आहे. आणि तो हक्क बजावून घेण्याची पात्रता त्यांना येअील अशी त्यांची जोपासना आम्हीं केलीच पाहिजे. म्हणून माझें मरणोत्तर प्राप्त होणारें धन या कार्याकडेहि वेचलें जाण्यास माझी हरकत नाही.

अपत्यसंगोपनार्थ झालेल्या खर्चाचा हिशेब व्यवस्थित ठेवला जावा. हेतु अेवढाच, की हा खर्च म्हणजे त्यांना दिलेलें कर्ज आहे व तें त्यांनी अुत्तर आयुष्यांत दुसऱ्या गरजू बालकांच्या पालनपोषणार्थ

खर्चाविषयाचें आहे. आपल्यावरील जबाबदारींची निश्चित माहिती त्यांना असणें अवश्य आहे व अेवढ्यासाठीच त्यांच्यासाठी खर्चिल्या जाणाऱ्या पैन् पैची नोंद झाली पाहिजे.

कलम २– (अ) सरलाबाअींनी माझ्या पश्चात् काय करावें याबद्दल मीं विचार करणें सकृद्दर्शनीं अनावश्यक वाटेल. पण त्यांचा मित्र व मार्गदर्शक म्हणून मला योग्य वाटतील त्या सूचना देअून ठेवण्यास प्रत्यवाय नाही. या सूचना प्रत्यक्ष आचरणात आणणें अशक्य वा अप्रिय वाटल्यास त्यांनी खुशाल बाजूस साराव्या.

त्यांच्यावर अपत्यसंगोपनाची जबाबदारी नसेल तर त्यांनी अेकदम पुनर्विवाह करावा. सरलाबाअींसारखी पत्नी लाभल्यास संसार सुखमय होतो, हा अनुभव मी तिच्या भावी पतीसाठी मुद्दाम नमूद करून ठेवतों. सरलाबाअी माझ्या प्रयाणसमयीं चाळीस वर्षांहून अधिक वयाच्या असतील तर त्यांनी पुनर्विवाहावांचून वाटल्यास राहावें, तत्पूर्वी वैधव्यजन्य ब्रम्हचर्याची सक्ति पाळणें हें दुर्घट आहे, असें माझें प्रांजल मत आहे. म्हणून सरलाबाअींनी विवाहबद्ध होअून अेखाद्या अभाग्यवंताचा विस्कळलेला संसार सुधारावा. या कामीं सौ. वैनी व रा. दादा (ह्यात असल्यास) यांनीहि सरलाबाअीस शक्य तें साहाय्य द्यावें.

(दाजीच्या अिच्छापत्राचें हें कलम आम्हीं प्रथम वाचलें, तेव्हा सरलाबाअी व ती रागाने फणफणल्या, हें मला सांगितल्यावांचून राहवत नाही. तरण्याताठ्या माणसाने सुखासुखी मृत्यूची अशुभ कल्पना डोक्यांत घेअून मृत्युपत्र करणें हीच गोष्ट मुळी त्यांना कशीशीच वाटत होती. "वासना तशीं फळं" असें तिने पुटपुटलेलं मला अेकूं आलें. पण मृत्युपत्र लिहिणें हें विक्षिप्तपणाचें वाटलें तरी वरील पुनर्विवाहाच्या सूचनेने त्यांचा संताप झाला. दाजी दृष्टीआड झाला– नव्हे सृष्टीआड झाला की काय, अशी दाट शंका डोळे वटारून पुढे अुभी राहिली. अशा आजच्या परिस्थितींतहि दाजींव्यतिरिक्त दुसऱ्याची बायको होण्याची कल्पना सरलाबाअीस दुःसह वाटली व ती संतापाच्या आवेगांत म्हणाली, "चुलींत टाका तें भारूड! वाटेल तें

बरकटतांना कांही वाटलं कसं नाही जिवाला ! " आणि त्याच वेळीं क्षुधाशमनार्थ आलेल्या विमूला पदराआड घेण्याअैवजी "पुरे कर की कडकड !" म्हणून अेक धबकाहि घातला. "हें ग काय तुझं ! बापाचा राग लेकावर काय म्हणून ?" असें म्हणून तिने त्यास ओढून घेतलें नसतें, तर त्या बिचाऱ्या अर्भकास आणखीहि थोडा आओीचा प्रसाद मिळाला असता ! असो. आता पुढील भागाकडे वळूं.)

सरलाबाअीस अपत्य असलें तर त्याची व्यवस्था तिने पुनर्विवाहापूर्वी लावावी. आलेले पैसे आणि झालेलें मूल अेखाद्या विश्वसनीय संस्थेच्या अगर व्यक्तीच्या स्वाधीन करून तिला आपला मार्ग मोकळा करून घेतां येअील.

(ब) माझ्या मुलाने (मुलगा अगर मुलगी) काय करावें हें आता सांगतों—

कळूं लागल्यावर मिळेल तसलें शिक्षण संपादन करावें. दुसऱ्यावर भार मुळीच न पडेल अशी खबरदारी घ्यावी. स्वतःच्या पायावर अुभें राहण्यासाठी साधेल तो धंदा स्वीकारावा. धंदा हलका म्हणून बाचकूं नये. केस कापण्याच्या सलूनपासून चामडीं रंगविण्यापर्यंत वाटेल तो धंदा पतकरावा. नोकरी निषिद्ध नाही, पण ती करतांना स्वाभिमानाला मूठमाती देअूं नये. यासाठी संस्थानी अगर अेकतंत्री हुकमतीखालील नोकरी निरुपाय झाला तरच पतकरावी. मिळणाऱ्या मुशाहिऱ्याचा मोबदला मालकास देतांना अेक पै तरी अधिक दिल्याचें समाधान असावें. आणि आपल्या न्याय्य हक्कांवर गदा घालणाऱ्या व अकारण अुपमर्द करणाऱ्या मालकाची योग्य हजेरी घेण्याचीहि हिंमत ठेवावी.

धर्म व नीति यांविषयी माझ्या मुलांनी पूर्ण स्वातंत्र्य अुपभोगावें. याचा अर्थ असा नव्हे, की त्यांनी स्वैराचारी व्हावें. अभ्यासाने व अनुभवाने पटतील तीं अेतद्विषयक मतें त्यांनी निःशंकपणें पाळावीं. असें करतांना दुसऱ्याला अुपद्रव न होअील अेवढी दक्षता त्यांनी ठेवली म्हणजे झालें.

याखेरीज सुचवायची गोष्ट अशी, की पारलौकिक कल्याणाअैवजी व्यावहारिक कल्याण साधून देणारा अेक धर्म आहे, ही गोष्ट माझ्या मुलानें विसरूं नये. मीं त्या धर्मास 'मनुष्यधर्म' अशी संज्ञा दिली आहे व 'माणसानें माणसासारखें वागणें किंवा माणसाला न शोभण्यासारखें वर्तन न करणें म्हणजे मनुष्यधर्म' अशी त्याची सोपी, सरळ व सुटसुटीत व्याख्या ठरविली आहे. हा 'मनुष्यधर्म' बापाच्या ठिकाणीं माझें नांव लावायचें असेल तर पाळलाच पाहिजे.

याचसारखी माझ्या मुलाची अवश्य कर्तव्य गोष्ट म्हणजे स्वदेश-स्मरण ही होय. आपण आपल्या देशाचे आहों, या जाणिवेनें वागणें हें मनुष्यमात्राचें कर्तव्य असल्यानें मी माझ्या मुलास निराळें कांही सांगतों असें नाहीं. देशहित साधतां येअील तितकें साधावें. तसें सत्कृत्य करण्याची संधि नच मिळाल्यास देशहितविघातक गोष्टी करूं नयेत व दुसरे कोणी करीत असतील, तर त्यांना त्या करूं देअूं नयेत.

**कलम ३**– बायको-मुलाची व्यवस्था लावल्यानंतर स्वतः-संबंधीची तरतूद करावयास हरकत नाहीं. कोणी म्हणतील, मेल्या-नंतर तरतुदीची काय आवश्यकता असते ? मागें राहिलेले संबंधी लोक मृतासाठी कित्येक वेडगळ गोष्टी करतात. मृतावस्थेंत आवडी-नावडीहि मृत झालेल्या असतात हें खरें; तरीपण होणाऱ्या गोष्टी मृताच्या जिवंतपणींच्या आवडीशीं विसंगत असतात. माझ्या बाब-तींत तरी मरणपूर्व आवडी आणि मरणोत्तर घडामोडी यांचा गैर-मेळ असूं नये, म्हणून मी पुढील आज्ञा (येथे अिच्छेअैवजी आज्ञा हा शद्ब हेतुपूर्वक विचार करूनच अुपयोजिला आहे) देअून ठेवीत आहे.

१. माझें प्रेत तिरडीवर आवळून स्मशानांत नेतां कामा नये. (हें वाक्य वाचतांच सरलाबाअी व ती पुन्हा संतापल्या आणि या वेळचा त्यांचा संताप मुका नसून बोलका, हालता-चालता होता. "माणसाला शहाणपणसुद्धा जास्त असूं नये. अिश्श !" हे तिचे

अुद्‌गार! आणि " तिरडीपरीस दुसऱ्या हज्जार गोष्टी होत्या जगांत ! " असें बोलून सरलाबाअी तर अुठून चालतीच झाली. तिनेहि तिचेंच अनुकरण केलें. मला अेक प्रकारें बरें वाटलें. असले प्रसंग वा असले विचार स्त्रियांच्या कोमल मनाला मानवत नाहीत, म्हणूनच या गोष्टी त्यांच्या नजरेआड अुरकाव्या असा योग्य प्रघात आहे. दोघी आंत गेल्यावर मी पुढील भाग वाचूं लागलों. पाहिल्या कलमाखाली दाजीने खुलासा केला होता– )

तिरडीची पद्धत भेसूर आहे. प्रेतदेखील भयानक न दिसतां गंभीरपणें आणि कुणाच्या भावना न दुखवतां नेतां येतें, त्यांत सौंदर्य आणतां येतें. पाश्चात्यांची पेटीपद्धति अुत्तम.

२. तशी पेटी माझ्या शवासाठी अुपयोजावी.

३. सौंदर्याप्रमाणे सोयहि पाहिली पाहिजे. म्हणून सांगतों, की ही शवपेटिका माणसांपेक्षा वाहनाकडूनच नेली जावी. जलद जाअील व माणसांची दगदग वांचेल.

४. जाळणें अुत्तम. पण जाळण्यापेक्षा पुरणें सुलभ व कमी खर्चाचें असेल तर माझें शव पुरलें जावें. पुरलेल्या जागेवर कसलेंहि चिन्ह अगर बांधकाम करूं नये.

५. स्मशानयात्रेस फक्त त्याच मंडळींनी यावें, की जे स्मशानांत अचकटविचकट बाष्कळपणा करून किंवा शवाची विटंबना करून आपल्या ग्राम्यपणाचें व माणुसकीहीनतेचें प्रदर्शन न करतील.

६. मंत्राग्नीपासून श्राद्धपक्षापर्यंत कोणतेंहि और्ध्वदेहिक माझ्या नावाने केलें जातां कामा नये. या खटाटोपामुळे सद्‌गति मिळेल किंवा हा खटाटोप न केल्यास मी दुर्गतीस जाअीन असें मला मुळीच वाटत नाही. मी या गोष्टी बिनजरूरीच्याच नव्हे, तर मूर्खपणाच्या व हिडीस मानतों.

७. सरलाबाअीनें माझी विधवा या नात्याने अस्तित्व असेपर्यंत तिने कुंकू लावलेंच पाहिजे. आपल्या वेषभूषेंत कसलीहि कमतरता तिने करूं नये.

८. माझ्या या जगांतील अस्तित्वाची कांही काळ तरी खूण राहावी अशी माझी अिच्छा आहे. ( मी कोणी संस्मरणीय विभूति म्हणून नव्हे. ) म्हणून माझ्या संबंधी माणसांपैकी फक्त अेकाने ( या माणसांत सरलाबाअी, वैनी व दादा यांचा समावेश होतो. असल्यास मुलगा–मुलगी. ) माझी स्मरणघटिका साजरी करावी. दिवस, प्रहर किंवा ताससुद्धा यासाठी दवडूं नये. ही स्मरणघटिका साजरी करण्याचा विधि म्हणजे सार्वजनिक कार्य. आजाऱ्याची शुश्रूषा, श्रमी माणसास हातभार, अज्ञानास ज्ञानदान अित्यादि. हा विधि द्रव्यनिरपेक्ष व धर्मनिरपेक्ष असावा.

९. यानंतर माझ्या स्वसंपादित अशा दुसऱ्या अेका संपत्तीची व्यवस्था लावावयाची. तांब्यां-चांदीच्या नाण्यांनी जी मोजतां येणार नाही अशी विचारसंपत्ति मी प्रसंगोपात संग्रहित करीत आलों आहें. जीवमान असेपर्यंत माझें हें संग्रहकार्य चालूहि राहील. हा वैचारिक संग्रह मी श्रीयुत दादांच्या स्वाधीन करीत आहें. याचा अुपयोग त्यांनी स्वेच्छेने करावा.

माझ्या पश्चात् दादा हयात असतील असें गृहीत धरूनच मीं ही व्यवस्था केली आहे. दुर्दैवाने तसें नसेल तर त्याची जागा वैनी, सरलाबाअी किंवा सज्ञान असेल तर माझी संतति यांपैकी कोणीहि घ्यावी. ज्या कोणाच्या हातीं या संग्रहाची व्यवस्था जाअील, त्याने स्वपसंतीनुरूप (वाटल्यास अितर विद्वानांचा सल्ला घेअून) माझ्या विचारांचें सार्वजनिक अुपयोगार्थ प्रसिद्धीकरण करावें.

१०. हें प्रसिद्धीकरण अर्थोत्पादनाची दृष्टि ठेवून करतां कामा नये. प्रसिद्धीकरणार्थ झालेला खर्च वजा जातां अुरलेली पैन् पै पुढील कार्यांकडे खर्चिली जावीः–

१ महाराष्ट्रांतील सर्वोत्तम युवती. (आरोग्य, विद्वत्ता आणि वेषभूषाकौशल्य या चार विषयांत परीक्षण केलें जावें.)

२ शाबूत दातांचा सर्वांत अधिक म्हातारा महाराष्ट्रीय.

३ चहा, धूम्रपान व कसलींहि मादक पेयें चुकूनसुद्धा सेवन न केलेला कॉलेजविद्यार्थी.

४ पदवीधर राजपुत्र. ( राजपुत्रास असलें किरकोळ बक्षीस अस्वीकारणीय वाटेल; पण त्याच्या आर्थिक मूल्याकडे न पाहतां मानाचें पान या दृष्टीने पाहावें अशी विनंती. )

५ आपल्या मुलामुलीस आपापला जन्माचा जोडीदार निवडण्याचें स्वातंत्र्य देणारा पालक; हुंडा कवडीहि न घेणारा मुलाचा बाप; मिरवणूक, मेजवान्या आणि मानपान यांचें नांवहि न काढतां लग्नकार्य करण्यास राजी असलेली विहीण; विवाह कायदेशीर ठरेल अेवढ्यापुरतेच विधि करून पैसा व वेळ वाचवणारा नवरदेव.

६ भविष्य, कविता आणि अुखाळयापाखाळया न छापणारा संपादक; प्रॉम्प्टरवांचून नक्कल बोलणारा नट; ताटकळत न बसवणारा व अुठाबशा न चारणारा फोटोग्राफर आणि निर्मळ ताटवाट्या व सभंग पदार्थ पुरवणारा हॉटेलवाला.

या बक्षिसाई लोकांच्या यादींत परीक्षक मंडळास संमत होतील अशा दुसऱ्या दुर्मिळांची भर घालण्यास माझी हरकत नाही. तोंडपूजक नसलेला संस्थानी नोकर किंवा ठरलेल्या वेळीं कपडे देणारा शिंपी यांसारख्यांनाहि परीक्षक मंडळ बक्षीस देअू शकेल.

वरील योजना अूर्फ अिच्छापत्र मीं पूर्ण विचाराने आणि धडधाकट अवस्थेंत केलें आहे.

पांडवगांव,
१ अेप्रिल १९३४

दाजी.

या अिच्छापत्राची योग्यायोग्यता दाजीचे वाचक ठरवतील. मी त्याबद्दल बरें-वाअीट कांहीच मत देअू अिच्छीत नाही. तथापि अेवढें मात्र खरें, की अिच्छापत्राच्या रूपाने झालेल्या या दाजीच्या दर्शनाने ती समोर बसून बोलल्याअितकेंच समाधान मीं अनुभवलें. अितरांना काय वाटेल कोण जाणे!

[ भाग १ ला समाप्त ]

